चौथा प्रश्न स्वप्नस्थितीचें व निद्रास्थितीचें स्वरूप सांगत आहे. या स्थितींत प्राण मात्र सदैव जागृत असतात, पण स्वप्नस्थितींत प्राणासह मन अथवा मनोपहित ( मनाची उपाधि असणारा ) जीव जागत असतो. गाढ निद्रेंत मात्र मनासह सर्व इंद्रियें पूर्ण विश्रांति घेतात, आणि उपाधिशून्य जीवात्मा निद्रासुखाचा अनुभव घेतो. या वेळीं तो अज्ञानानें वेष्टित असतो म्हणून त्याला आपण स्वतः ब्रह्म आहों हें कळत नाहीं. सारांश, वासनामय देहाचा उपभोग मन घेतें, तर कारणात्मकदेहाचा उपभोग अज्ञानदशतील जीव घेतो. एवंच सूक्ष्मदेह मी नव्हे व कारणदेहही मी नव्हे, असा बोध स्वप्नस्थितीचें व सुषुप्तिस्वरूपाचें ज्ञान झालेल्या जीवांस होतो.

पांचव्या प्रश्नांत ओंकाराची उपासना सांगितली आहे ही सर्वश्रेष्ठ उपासना आहे. ही उपासना साध्य झाली असतां प्रथमतः अपरब्रह्माचें व पुढें परब्रह्माचें प्राप्तिसाधन आहे.

सहाव्या म्हणजे शेवटच्या प्रश्नांत सर्वांस पूर्णत्व देणारा जो पुरुष तत्संबंधी प्रश्न विचारून उत्तरांत जीव आणि ब्रह्म यांची एकता सिद्ध केली आहे जीव-परब्रह्मा-शिवाय बाकी सर्व वस्तु कालभंगुर आहेत, विकारवश आहेत, म्हणून जीवाचें स्वरूप तें नव्हे, निष्कलत्व व निरंजनत्व हें त्याचें स्वरूप आहे, विश्वाची उत्पत्ति, स्थिति इत्यादि व्यवहारांत सत्य परंतु परमार्थांत असत्य असतात, अशी वास्तविक स्थिति आहे, हे सांगितलें, आणि सर्वत्र ' एकमेवाऽद्वितीय ' हा सिद्धांत सिद्ध केला आहे

या परमेश्वरकृपेनें पहिल्या वर्षाचा कारभार निर्विघ्नपणानें शेवटास गेला आहे. यास्तव पुढें त्या सर्वज्ञ व दयाघन प्रभूची प्रार्थना करू. ' देवा ! हा आरंभिलेला प्रचंड उद्योग पूर्णपणें शेवटास जाईल आणि तत्त्वज्ञानासंबधानें आमच्या पूर्वपूर्वजाचे अंतिम विचार किती उन्नत अवस्थेस पोंचले होते, याची प्रत्यक्ष साक्ष पटून तत्त्व-ज्ञानाचा अभ्यास आणि मोक्षसाधक आचरण यांविषयीं दृढनिष्ठा आमच्या लोकांत जागृत होईल असें कर,' हें मागणें करद्वय जोडून विनम्रपणानें मागतों.

पहिलीं तीन उपनिषदें भाषांतरासह प्रकट केलीं, तीं अशा संकल्पानें केलीं कीं, आपल्या येथें वेदांताच्या संबंधानें मुख्य जे चार पंथ झाले, त्यांची सविस्तर माहिती व्हावी, त्यांचें म्हणणें काय आहे तें समजावें, आणि या वाचनापासून साहजिक-पणें होणाऱ्या निश्चयाला कांहीं अशीं साहाय्य व्हावें, पण आजपर्यंतच्या झालेल्या कारभारावरून अजमास करितां, असें वाटूं लागलें कीं, प्रथमसंकल्पानुसार भाषा-तरांची व्यवस्था चालविली, तर समग्र ग्रंथ वाचकांच्या हातीं पडण्यास कमीतकमी आणखी निदान सहा तरी वर्षें लागतील. भविष्यकाळांत काय काय गोष्टी साठवून ठेविल्या असतात, इच्छा-सामर्थ्य, बुद्धि-सामर्थ्य इत्यादि सामर्थ्यांमध्यें कशी उत्क्रांति किंवा अपक्रांति होत असते, याचें आकलन मानवी बुद्धीला करितां येतच नाहीं.

तेव्हां 'अर्धेन कुरुते कार्यं' या न्यायानें शाङ्करभाष्य मात्र देण्याचा निश्चय केला. शिवाय, माझ्या समजुतीनें श्रीमच्छंकराचार्यांचे सिद्धांत मान्य झाले असतां इतर मतांतील सिद्धांतांचें आकलन स्थूल मानानें सहजच होतें. तेव्हां केवलाद्वैती आचार्यांचे सिद्धांत काय आहेत, ते त्यांच्या भाष्यावरून समजून घेण्याचा व देण्याचा प्रयत्न प्रथम करावा, आणि नंतर इतर आचार्यांच्या सिद्धांताचें सविस्तर भाषांतर करावें, असा निश्चय ठरविला. या एकांगी निश्चयानें बहुश्रुत होण्याची इच्छा धारण करणाऱ्या कांहीं चाणाक्ष वाचकांचा इच्छाभंग होईल, हें मी जाणून आहें. आणि म्हणूनच अशा कांहीं चौकस वाचकांचे थोडेसे तरी मनोरथ पूर्ण करावे, यासाठीं अशी योजना करीत आहें कीं, जेथें जेथें मतमतांतरांत तीव्र विरोध दिसेल, तेथें तेथें विरोधाचा व विरोधकारणांचा निर्देश सकारण करून प्रत्येक उपनिषदाच्या शेवटीं जो मी उपसंहार लिहित असतों, त्यात सारांशरूपानें इतर आचार्यांचें म्हणणें प्रकट करावें. ही तात्पुरती योजना प्रश्नोपनिषदाच्या वेळीं अमलांत आणिलीच आहे. आणि पुढील मुण्डक-उपनिषदांत या योजनेंतच थोडासा फेरफार करून इतर मतें ठीक कळतील असें करावयाचें आहे. परमेश्वरी संकल्पानुसार मी अगल्या वाचल्यास इतर आचार्यांचीं उपनिषद्भाष्येंही प्रकाशित करीन, इतकें सांगून ठेवणें मात्र आज मितीला शक्य आहे.

असो, पुस्तकाच्या आंतील हा फेरफार उपनिषद्वाचकांस संमत होवो, अशी परमेश्वराची व वाचकांची प्रार्थना करून, या वर्णनाचा कारभार आटपतों.

आतां वेदांतप्रिय वाचक आणि वेदांतामृताचा चषक यांच्यामध्यें आणखी जास्त वेळ न घालतां, वाचकांस उपनिषदामृताचा पेला सादर स्वीकृत करण्याची सप्रेम विनंति करितों.

ता. १४ आक्टोबर, सन १९१२ इसवी. 

**चिंतामण गंगाधर भानु.**





# अनुक्रमणिका.

# प्रश्नोपनिषत्.

## शाङ्करभाष्यसमेता ।

ॐ तत्सद्ब्रह्मणे नमः ।

ॐ भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवाः ।
भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः ।
स्थिरैरङ्गैस्तुष्टुवाꣳसस्तनूभिः ।
व्यशेम देवहितं यदायुः ॥

ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ।

सिद्धान्ती—हे देवहो ! आमच्या कर्णांस सुंदर व मंगलदायक असे उद्गार ऐकण्यास मिळावे ! हे अग्नि,-वरुण-आदित्यादि यज्ञसंरक्षक देवहो ! आमच्या शुभ नेत्रांस वस्तूंचें दर्शन व्हावें ! महाराज ! जोंपर्यंत हें आयुष्य आहे, तोंपर्यंत स्तोत्रपाठक आम्ही सर्व इंद्रियावयवादि स्थिर अंगोपांगांनीं देवास प्रिय होईक अशी सेवा करून आयुष्याचा उपभोग घेत जाऊं.

ॐ शांतिः, शांतिः, शांतिः ।

---

### मंत्र पहिला.

ॐ सुकेशा च भारद्वाजः शैब्यश्च सत्यकामः सौर्यायणी च गार्ग्यः कौसल्यश्चाऽऽश्वलायनो भार्गवो वैदर्भिः कबन्धी कात्यायनस्ते हैते ब्रह्मपरा ब्रह्मनिष्ठाः परं ब्रह्मान्वेषमाणा एष ह वै तत्सर्वं वक्ष्यतीति ते ह समित्पाणयो भगवन्तं पिप्पलादमुपसन्नाः ॥ १ ॥

अन्वय व अर्थ—सुकेशा च भारद्वाजः; शैब्यः च सत्यकामः; सौर्यायणी ( णिः ? ) च गार्ग्यः; कौशल्यः च आश्वलायनः; भार्गवः

वैदर्भिः; कबंधी कात्यायनः ह एते ते ब्रह्मपराः, ब्रह्मनिष्ठाः, परंब्रह्म अन्वेषमाणाः समित्पाणयः भगवंतं पिप्पलादं–एषः ह तत्सर्वं वक्ष्यति इति–उपसन्नाः (भरद्वाजाचा मुलगा, सुकेशा नावाचा भारद्वाज, शिबीचा सत्यकाम नावाचा मुलगा शैब्य, गर्गगोत्रात जन्म पावलेला व सूर्याच्या सौर्य नामक मुलाचा मुलगा सौर्यायणि; कौसल्य नांवाचा अश्वलपुत्र आश्वलायन; विदर्भ देशातील भृगूचा मुलगा भार्गव; कबंधी नामक कत्याचा नातु कात्यायन, हे सर्व (सहा जण) ब्रह्मपर व ब्रह्मनिष्ठ असून परब्रह्माचा शोध करित करित भगवान् पिप्पलाद नामक आचार्यांच्या आश्रमात प्रवेश करिते झाले. हेतु हा कीं हे आचार्य आपल्यास ब्रह्माचें यथार्थ स्वरूप सांगतील. या सर्वांनीं आचार्योपासनेसाठीं हस्तामध्यें समिधा धारण केल्या होत्या.)

सारांश, ब्रह्मोपदेशासाठीं सहा विद्वान् व वेदवेत्ते ब्राह्मण पिप्पलादमुनींच्या आश्रमात विनयपूर्वक प्रवेश करिते झाले. ॥ १ ॥

मन्त्रोक्तस्यार्थस्य विस्तरानुवादीदं ब्राह्मणमारभ्यते । ऋषि प्रश्नप्रतिवचनाख्यायिका तु विद्यास्तुतय एव संवत्सरब्रह्मचर्य-संवासादियुक्तैस्तपोयुक्तैर्ग्राह्या पिप्पलादादिवत्सर्वज्ञकल्पैराचार्यैश्च वक्तव्या च । न सा येन केन चिदिति विद्यां स्तौति । ब्रह्मचर्यादिसाधनसूचनाच्च तत्कर्तव्यता स्यात् । सुकेशा च नामत भरद्वाजस्यापत्य भारद्वाज । शैब्यश्च शिबेरपत्य शैब्य सत्यकामो नामत । सौर्यायणी सूर्यस्यापत्य सौर्यस्तस्यापत्यं सौर्यायणिश्छान्दस. सौर्यायणीति । गार्ग्यो गर्गगोत्रोत्पन्न । कौसल्यश्च नामतोऽश्वलस्यापत्यमाश्वलायन । भार्गवो भृगोर्गोत्रापत्य भार्गव । वैदर्भिर्विदर्भे भव । कबन्धी नामत । कत्य (त ?) स्यापत्य कात्यायन । विद्यमान प्रपितामहो यस्य स । युवप्रत्यय, ते हैते ब्रह्मपरा अपर ब्रह्म परत्वेन गता स्तदनुष्ठाननिष्ठाश्च ब्रह्मनिष्ठाः परं ब्रह्मान्वेषमाणा, किं तत् यन्नित्य विज्ञेयमिति तत्प्राप्त्यर्थं यथाकामं यतिष्याम इत्येव तदन्वेषण कुर्वन्तस्तदधिगमायैष ह वै तत्सर्वं वक्ष्यतीत्याचार्यमुपजग्मु । कथम् । ते ह समित्पाणय समिद्भारगृहीतहस्ता सन्तो भगवन्त पूजावन्तं पिप्पलादमाचार्यमुपसन्ना उपजग्मु ॥ १ ॥

सिद्धान्ती—अथर्वण वेदात 'ब्रह्मा देवाना' असा जो ब्रह्मपर मन्त्र आहे, त्याचा अनुवाद येथें या उपनिषदात केला आहे.

शिष्य—भगवन्! जर वेदामध्यें ब्रह्मस्वरूपाचा निर्णय प्रत्यक्ष मंत्रांनीं केला आहे, तर आतां ही पुनरुक्ति कशाला?

सिद्धान्ती—तेथें ब्रह्मस्वरूपाचा निर्णय झाला हें खरें; पण तेथें ब्रह्मप्राप्तीच्या साधनांचा व उपासनादिकांचा विचार झाला नाहीं, म्हणून ह्या प्रश्नात्मक उपनिषदाचा अवतार करून श्रुतिमाता उपासनादि साधनांचा विस्तार करित आहे. साधनच समजलें नाहीं, तर शाब्दिक साध्यज्ञान होऊनही कल्याण होत नाहीं.

शिष्य—ह्या ब्राह्मणांतर्गत उपनिषदाला 'प्रश्न' हें नाव कां दिलें?

सिद्धान्ती—कारण सुकेशादि सहा विद्वान् मुमुक्षूंनीं येथें ब्रह्मविषयक सहा प्रश्न केले आहेत. सुकेशाप्रमुख सहा शिष्यांनीं प्रश्न केले व पिप्पलाद मुनींनीं त्यांचीं उत्तरें दिलीं, इत्यादि कथानक विद्येच्या स्तुतिप्रीत्यर्थ आहे. तथापि ही गोष्ट सांगण्यांत आणखी एक हेतु आहे. ज्या कोणास ब्रह्मविद्या समजून घ्यावयाची असेल, त्यांनीं वर्ष दोन वर्षे—गुरुजी सांगतील तितकीं वर्षे—ब्रह्मचर्य-वृत्तीनें व तपश्चर्यादिव्रतांचें यथार्थ आचरण करून गुरुगृहीं राहिलें पाहिजे. तसेंच ब्रह्मस्वरूपाचा जो उपदेश करावयाचा, तो पिप्पलादासारख्या सर्वज्ञमुनीनेंच केला पाहिजे, हा दोन गोष्टी समजाव्या, सारांश ब्रह्मविद्येचा अधिकारी कोण व तिचें व्याख्यान करण्याचा अधिकार कोणास आहे, हें सर्वांस समजावें, एतदर्थ या कथानकाचा अवतार आहे. ब्रह्म सर्वज्ञ आहे. पिप्पलादमुनि सर्वज्ञकल्प म्हणजे बहुतेक सर्वज्ञान झालेले होते. सारांश, ते जीवन्मुक्त होते.

शिष्य—म्हणजे वाटेल त्यानें ब्रह्मविद्या श्रवण करावी किंवा वाटेल त्यानें तिचें प्रवचन करावें असा भाग नाहीं.

सिद्धान्ती—मुळींच नाहीं. ब्रह्मचर्यादि साधनें येथें स्पष्ट सांगितलीं आहेत. यावरून श्रवणादि अधिकारप्राप्तीसाठीं ब्रह्मचर्यादि व्रतें अवश्य केलीं पाहिजेत, हें येथें उघड रीतीनें सुचविलें आहे. असो; पोथीपर्यंत कथा अशी आहे—एकदां भरद्वाजपुत्र सुकेशा, शिबिसुत सत्यकाम, गर्गकुलोत्पन्न सूर्याचा नातु सौर्यायणि, अश्वलायनाचा कौसल्य नांवाचा मुलगा, विदर्भदेशस्थ ऋगुपुत्र भार्गव आणि कत्याचा नातु कबंधी, असे सहाजण ब्रह्मज्ञानाप्रीत्यर्थ भगवान् पिप्पलादाच्या आश्रमीं गेले.

शिष्य—कबंधीचा आजा जिवंत होता, असें 'कात्यायन' या रूपावरून दिसतें. खरें आहेना हें?

सिद्धान्ती—होय. आतां हे सर्व सहाजण मोठे ब्रह्मपर व ब्रह्मनिष्ठ होते.

शिष्य—मग ते भगवान् पिप्पलादाच्या आश्रमीं कशाला गेले?

सिद्धान्ती—त्या ह्या सहाजणांनीं आतांपर्यंत अपर ब्रह्म ( सगुणब्रह्म ) हेंच परब्रह्म आहे, असें समजून त्या अपर ब्रह्माची उपासना केली होती. पण तें अपर-

ब्रह्म अनित्य आहे व पुरुषार्थसाधक नाहीं, असें समजतांक्षणीं हे मुमुक्षु पर-ब्रह्माच्या शोधार्थ निघाले. पिप्पलाद हे वेदांतविद्येंत परम निष्णात आहेत, असें त्यांनीं ऐकिलें होतें; तेव्हां 'ब्रह्माचें स्वरूप काय, ब्रह्म म्हणजे काय, तें नित्य कसें, जें नित्य त्यालाच ब्रह्म कां म्हणतात,' इत्यादि प्रश्नांचा उलगडा करून घेण्यासाठीं व ब्रह्मरूप समजल्यावर त्याच्या प्राप्त्यर्थ भगीरथ प्रयत्न करावा, हा संकल्प सिद्ध करण्यासाठीं ते पिप्पलाद मुनीला शरण गेले. त्यांना दृढ भरंवसा होता कीं, हे ऋषि आपल्या सर्व शंकांचा निरास करून आपल्यास ब्रह्मस्वरूप समजून देतील, मंत्रांतील ' अन्वेषमाणाः ' याचा असा अर्थ आहे. असो; हे सहा मुमुक्षु आश्रमांत शिरले, ते मोठ्या विनीत वेषानें शिरले.

शिष्य—म्हणजे ?

सिद्धान्ती—ब्रह्मवेत्ता गुरु हा प्रत्यक्ष अग्नि आहे, असें समजून त्याच्या पूजनार्चनाप्रीत्यर्थ ह्या नूतन शिष्यांनीं समिधा धारण केल्या होत्या. समिधा म्हणजे एक प्रकारची भेटच होय. शिवाय समिधा घेऊन जाणें म्हणजे ' आम्हीं पूर्ण वैराग्यशील आहों ' हें सुचविणें होय. ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा-

**तान्ह स ऋषिरुवाच भूय एव तपसा**
**ब्रह्मचर्येण श्रद्धया संवत्सरं संवत्स्यथ**
**यथाकामं प्रश्नान्पृच्छत यदि विज्ञा-**
**स्यामः सर्वं ह वो वक्ष्याम इति ॥ २ ॥**

अन्वय व अर्थ—ह तान् सः ऋषिः उवाच ( ह्या शिष्यांस आलेले पाहून व त्यांचा हेतु ऐकून भगवान् ऋषि म्हणाले ) भूयः एव तपसा, ब्रह्मचर्येण, श्रद्धया संवत्सरं संवत्स्यथ (पुनः तुम्हीं एक वर्षपर्यंत येथें तप करा, ब्रह्मचारिव्रतानें रहा आणि श्रद्धापूर्वक सेवा करा ) यथा कामं प्रश्नान् पृच्छत ( तुम्हांला जे प्रश्न स्वेच्छेनें विचारावयाचे असतील, ते प्रमुक्तमनानें विचारा ) यदि विज्ञास्यामः सर्वं वः वक्ष्यामः ह, इति ( जर आम्हांस उत्तरें विदित असतील, तर तीं आम्ही मोकळ्या मनानें तुम्हांस सांगूं, याप्रमाणें आचार्य बोलले. )

सारांश, एक वर्षपर्यंत ( कांहीं काळपर्यंत ) तपश्चर्येनें, ब्रह्मचर्यव्रतानें श्रद्धापुरःसर गुरुजींच्या येथें रहावें, म्हणजे पुढें अधिकार प्राप्त झाल्यावर शिष्यास ब्रह्मविद्या श्रवण करण्याची योग्यता प्राप्त होते. ॥ २ ॥

तानेवमुपगतान्ह स किल ऋषिरुवाच भूयः पुनरेव यद्यपि यूयं पूर्वं तपस्विन एव तपसेन्द्रियसंयमेन तथाऽपीह विशेषतो ब्रह्मचर्येण श्रद्धया चाऽऽस्तिक्यबुद्ध्याऽऽदरवन्तः संवत्सरं कालं संवत्स्यथ सम्यग्गुरुशुश्रूषापराः सन्तो वत्स्यथ। ततो यथाकामं यो यस्य कामस्तमनतिक्रम्य यथाकामं यद्विषये यस्य जिज्ञासा तद्विषयान्प्रश्नान्पृच्छत । यदि तद्युष्मत्पृष्टं विज्ञास्यामः। अनुद्धतत्वप्रदर्शनार्थो यदि शब्दो नाज्ञानसंशयार्थः प्रश्ननिर्णयादवसीयते। सर्वं ह वो वः पृष्टं वक्ष्याम इति ॥ २ ॥

सिद्धान्ती—याप्रमाणें हे सहा शिष्य ब्रह्मज्ञानप्राप्त्यर्थ आले आहेत, असें पाहून व ऐकून भगवान् पिप्पलाद त्यास म्हणालेः-जरी तुम्ही सर्वांनीं येथें येण्याच्या पूर्वी तपश्चर्या केली आहे, तथापि आतां या आश्रमांत एक वर्षपर्यंत आपली तुम्हांस तपश्चर्या म्हणजे इंद्रियसंयमनाचा अभ्यास केला पाहिजे. विशेषतः ब्रह्मचर्याची जागृति व आदरपूर्वक श्रद्धा म्हणजे आस्तिक्य बुद्धि यांचा स्वीकार केला पाहिजे.

शिष्य—ब्रह्मचर्य म्हणजे स्त्रीविषयक स्मरण व कीर्तन ( चर्चा ), त्यांच्या बरोबर क्रीडा, गुह्य भाषण, स्त्रिया किंवा त्यांचे हावभाव पाहणें, त्यांच्या विषयीं किंवा त्यांच्याशीं संकल्प करणें, निश्चय करणें, इत्यादि सर्व कर्में ( सर्व व्यवहार ) वर्ज केले पाहिजेत. तसेंच गुरु सांगतील, त्यावर आदर श्रद्धा हवी.

सिद्धान्ती—सारांश; नैष्ठिकव्रतानें राहून गुरुघरीं शिष्यानें गुरु-सेवा-तत्पर असावें लागतें, असो; याप्रमाणें सेवा करीत आमच्या आश्रमांत एक वर्षभर-पर्यंत असावें, असें मुनींनीं सांगितलें. ते पुढें म्हणालेः-नंतर ज्याला जो प्रश्न विचारावासा वाटत असेल, त्यानें तो प्रश्न खुशाल विचारावा. कोणत्याही विषयासंबंधें प्रश्न विचारण्याला प्रत्यवाय नाहीं. जर तुम्ही विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें आम्हांस विदित असतील तर—

शिष्य—म्हणजे या मुनींना ब्रह्मविषयाविषयीं पूर्णज्ञान नव्हतें कीं काय? 'जर' हा शब्द संकेतार्थ सुचवितो. तात्पर्य असें दिसतें कीं मुनींस कोठें अज्ञान व कोठें संशय, असा प्रकार होता. पण असें असूं नये.

सिद्धान्ती—अरे! सर्वज्ञकल्प मुनींस कसला संशय किंवा कसलें अज्ञान! केवळ उपचाराचें व विनयशीलता प्रकट करण्याचें हे बोलणें आहे. कारण पुढें शिष्यांनीं जे प्रश्न विचारले, त्यांचीं सत्य व समग्र उत्तरें मुनींनीं सहज देऊन शिष्यांच्या संशयांचा निरासपूर्वक निर्णय केला आहे. ते म्हणाले-त्याचा तात्पर्यार्थ हा कीं 'तुम्ही जे जे प्रश्न विचाराल त्यांचीं आम्हीं यथार्थ उत्तरें देऊं.' मुनींचें भाषण विनयपूर्ण आहे. ॥ २ ॥

## मंत्र तिसरा.

**अथ कबन्धी कात्यायन उपेत्य पप्रच्छ ।**
**भगवन्कुतो ह वा इमाः प्रजाः प्रजायन्त इति ॥३॥**

अन्वय व अर्थ—अथ कबंधी कात्यायनः उपेत्य पप्रच्छ ( नंतर कबंधी नामक कात्यायनानें मुनीजवळ जाऊन प्रश्न विचारला: ) भगवन्! कुतः ह वै इमाः प्रजाः प्रजायन्ते (भगवन्! ह्या सर्व प्रजा, जीव, विशेषतः मनुष्यजीव—कोणापासून निर्माण होतात ? )

सारांश, ' जीवाचा मूळ निर्माता कोण ? असा पहिला प्रश्न आहे. ॥ ३ ॥

अथ संवत्सरादूर्ध्वं कबन्धी कात्यायन उपेत्योपगम्य पप्रच्छ पृष्टवान् । हे भगवन्कुत कस्माद्ध वा इमा ब्राह्मणाद्या प्रजा प्रजायन्त उत्पद्यन्ते । अपरविद्याकर्मणो. समुच्चितयोर्यत्कार्यं या गतिस्तद्वक्तव्यमिति तदर्थोऽय प्रश्न ॥ ३ ॥

सिद्धान्ती—एक वर्षांची अवधि संपल्यानंतर कबंधी कात्यायन मुनींच्या जवळ गेला आणि विनयपूर्वक विचारता झाला. हे भगवन्! ह्या ब्राह्मणादि चतुर्वर्णांतील प्रजा कोण उत्पन्न करितो ? जीवाची उत्पत्ति होते तिचा नियामक व आद्य कर्ता कोण ? जीवत्व हें काय आहे व याचा कर्ता कोण आहे ?

शिष्य—भगवन्! परब्रह्माचा बोध करण्यासाठीं उद्युक्त झालेल्या कबंधानें हा काय प्रश्न विचारला ? याचा परमार्थाशीं, मुख्य विषयाशीं, काय संबंध आहे ?

सिद्धान्ती—या प्रश्नाचा भावार्थ तुझ्या लक्ष्यांत आला नाहीं. अरे! जीवत्वदशा प्राप्त होते ती पूर्व कर्मांच्या संचितानें होते. कर्मांचा ज्ञानपूर्वक संन्यास झाला म्हणजे कर्म क्षपतें, हें तुला विदित असावयास पाहिजे. असो, कर्म झालें म्हणजे त्याचें कार्य अथवा फल उत्पन्न व्हावयाचें, हा वैदिक सिद्धांत निर्बाध आहे. आतां प्रश्न असा आहे कीं, नुसतें वैदिक कर्म केलें असतां फल निष्पत्ति काय होते व कर्मकर्त्याला कोणत्या मार्गानें स्वर्गलोकीं जावें लागतें: ह्याचा निर्णय करून घ्यावा व त्याचप्रमाणें ज्ञानपूर्वक म्हणजे सगुण ब्रह्माचें ज्ञान करून घेऊन सद्गुपासनापूर्वक वैदिक कर्म केलें असतां कर्त्याला फलप्राप्ति काय होते व त्याला कोणत्या मार्गानें स्वर्गलोकीं जावें लागतें, हेंही समजून घ्यावें, असा प्रश्नाचा भावार्थ आहे.

पूर्वपक्षी—हें कशावरून म्हणतां तुम्ही ?

सिद्धान्ती—पुढें मंत्र येतील, त्यांत आम्ही म्हणतों, त्याचें स्पष्टीकरण आहे. पुढचा मागचा संदर्भ पाहून अर्थ करावयाचा हा राजमार्ग सोडतां कामा नये, सारांश, ज्ञानकर्म-समुच्चयाचा परिणाम काय होतो, हा प्रश्न आहे.

पूर्व०—बरें; पण याचा प्रकृत विषयाशीं काय संबंध आहे.–ब्रह्मविचारांत कर्मांची किंवा ज्ञानकर्म–समुच्चयाची विवेचना कशाला?

सिद्धान्ती—ही विवेचना यथार्थ झाली म्हणजे नुसत्या कर्मांचा किंवा ज्ञानाशीं समुच्चित झालेल्या कर्मांचा तिटकारा उत्पन्न होतो. कर्मस्वरूप समजलें म्हणजे विवेकाधिष्ठ वैराग्य प्राप्त होतें आणि ब्रह्मज्ञानाचा अधिकार प्राप्त होतो. सारांश, वैराग्यप्रतिपादनासाठीं हा प्रश्न आहे.

पूर्व०—तरीपण ही संगति जुळत नाहीं. प्रश्नांत कर्मांचें किंवा समुच्चित कर्मांचें नांवही नाहीं. सृष्टि कशी उत्पन्न होते, हा प्रश्न आहे. व हा प्रश्न ब्रह्मप्रकरणांत अप्रस्तुत आहे, असें आमचें म्हणणें आहे.

सिद्धान्ती—अहो! सृष्टीचें निमित्त पुढें करून परमवैराग्यानें परिपूर्ण असणाऱ्या परब्रह्माचें प्रतिपादन करण्याचा व तत्फळ सांगण्याचा हा प्रक्रम आहे. श्रुति सामर्थ्यानें काय म्हणत आहे, हें ऐका म्हणजे तुमचें तुम्हांसच कळेल कीं श्रुतीनें अनुसरलेला मार्गच बरोबर आहे. असो. आतां येथून सृष्टि कशी होते, या प्रश्नाला उत्तर देण्यास सुरवात होत आहे ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**तस्मै स होवाच प्रजाकामो वै प्रजापतिः स तपोऽतप्यत; स तपस्तप्त्वा स मिथुनमुत्पादयते। रयिं च प्राणं चेत्येतौ मे बहुधा प्रजाः करिष्यत इति ॥ ४ ॥**

अन्वय व अर्थ—तस्मै स ह उवाच (या प्रश्नकर्त्याला मुनींनीं उत्तर दिलें:) प्रजाकामः वै प्रजापतिः (प्रजापतीला सृष्टि उत्पन्न करावी अशी इच्छा उत्पन्न झाली) सः तपः तप्त्वा सः मिथुनं उत्पादयते (म्हणजे तो तप करून एक जोडपें उत्पन्न करितो) रयिं च प्राणं च (रयि=अन्न व प्राण=अग्नि, सामर्थ्य, हें तें जोडपें होय.) एतौ मे बहुधा प्रजाः करिष्यतः इति (ह्या दोन वस्तु, हें मिथुन अनेक स्वरूपाच्या प्रजा उत्पन्न करील, असें समजून प्रजापतीनें हें मिथुन निर्माण केलें.)

सारांश, प्रजापतीनें तपःसामर्थ्यानें एक असें मिथुन उत्पन्न केलें कीं जें अनंत प्रकारची सृष्टि उत्पन्न करण्यास योग्य होतें. ॥ ४ ॥

तस्मा एवं पृष्टवते स होवाच। तदपाकरणायाऽऽह। प्रजाकामः प्रजा आत्मनः सिसृक्षुर्वै प्रजापतिः सर्वात्मा सञ्-

गस्त्रक्ष्यामीत्येव विज्ञानवान्ययोक्तकारी तद्भावमावित कल्पादौ निवृत्तो हिरण्यगर्भः सृज्यमानानां प्रजानां स्थावरजङ्गमानां पति सञ्जन्मान्तरभावितं ज्ञानं श्रुतिप्रकाशितार्थविषयं तपोऽन्वालोचयदतप्यत । अथ तु स एव तपस्तप्त्वा श्रौतं ज्ञानमन्वालोच्य सृष्टिसाधनभूतं मिथुनमुत्पादयते मिथुनं द्वंद्वमुत्पादितवान् । रयिं च सोममन्नं प्राणं चाग्निमत्तारमेतावग्नीषोमावन्नभूतौ मे मम बहुधाऽनेकधा प्रजा करिष्यत इत्येवं सचिन्त्याण्डोत्पत्तिक्रमेण सूर्याचन्द्रमसावकल्पयत् ॥ ४ ॥

सिद्धान्ती—याप्रमाणें कबंधीचा प्रश्न ऐकून त्याची जिज्ञासा तृप्त करण्यासाठीं आचार्य म्हणाले:—हे शिष्या, सर्व प्रजांची उत्पत्ति करणारा व त्यांचें संरक्षण करणारा प्रजापति इच्छा करिता झाला कीं, आपण आपल्या स्वरूपापासून सृष्टि उत्पन्न करावी. याप्रमाणें संकल्प करून तो तपश्चर्या म्हणजे तो संकल्प पूर्ण करण्याची चिंतता करूं लागला म्हणजे पूर्व कल्पांत अशी सृष्टि होती, तशीच आपल्या मनामध्यें उत्पन्न करून तिचें स्पष्ट चित्र आपल्या मनामध्यें ठेविता झाला.

शिष्य—हा प्रजापति म्हणजे कल्पाच्या प्रारंभीं उत्पन्न झालेला हिरण्यगर्भ होय. असेंच ना ?

सिद्धान्ती—होय. 'मी प्रजापति आहें, सर्वांचा आत्मा आहें,' अशी उपासनेच्या काळांत असणारी भावना दृढ करून ज्ञानाचा आणि कर्मांचा समुच्चय करणारा हा परमेश्वर असतो. अर्थातच जे स्थावर आणि जंगम पदार्थ उत्पन्न करावयाचे त्यांचा हा पति म्हणजे स्वामी असतो. हा महाज्ञानी असतो म्हणून त्याला पूर्वकल्पातील कार्यकारणात्मक सृष्टीचें यथास्थित ज्ञान असतें आणि स्फुरण पावणाऱ्या नित्य वेदानें सर्व चराचर वस्तूंवर प्रकाश पाडिला असल्यामुळें त्याच्या एकाग्र मनांत सहज उत्पन्न झालेलें ज्ञान दृढतर होतें. हाच हिरण्यगर्भ होय. अथवा हिरण्यगर्भरूपानें हा अवतीर्ण होतो. पूर्वकल्पांत याला ज्ञान असल्यामुळें जे संस्कार झालेले असतात, ते स्वरूपत. चिरस्थायी असल्यामुळें त्याचें चिंतन करूं लागल्याबरोबर पूर्वसंस्कार उद्बुद्ध म्हणजे जागृत होतात आणि पूर्वकल्पाची सर्व व्यवस्था याच्या ध्यानांत येते.

शिष्य—म्हणजे 'मी प्रजा उत्पन्न करीन' असा विचार कल्पाच्या प्रारंभीं सर्वात्मा जो हिरण्यगर्भ त्याच्या मनांत येतो आणि श्रुतीनें 'तो तप करिता झाला' असें म्हटलें आहे, त्याचा अर्थ असा समजावयाचा कीं, पूर्वकल्पांत सृष्टिव्यवस्थेचे नियम समजून घेऊन ते अवश्य पाळिले असल्यामुळें त्याच्या अंतःकरणांत जे जे संस्कार दृढ झालेले असतात ते सर्व या तपानें म्हणजे चिंतनानें जागृत होतात. म्हणजे श्रुतीनें जो अर्थ प्रकाशित केला आहे, जे नियम प्रकट केले आहेत ते

विषय होतात ज्याचे, असें ज्ञान त्यास प्राप्त होतें. सारांश पूर्व–कल्प–संस्कारानें हिरण्यगर्भाला सर्वप्रकाशक वेदाचें ज्ञान होतें. असेंच म्हणावयाचें ना ?

सिद्धान्ती—होय. येथें इतकेंच ध्यानांत ठेव कीं, हिरण्यगर्भ प्रजाकाम झाला ( प्रजा उत्पन्न करावी असें त्याला वाटलें ) म्हणजे त्याचे ठिकाणीं ज्ञान आणि कर्म यांच्या बीजांचा समुच्चय होऊन व उत्पन्न झालेला संस्कार उद्भूत होऊन तो सर्वात्मा असूनही प्रजांचा स्वामी होतो. अशो; सर्वार्थप्रकाशक वेदाचें ज्ञान होऊन तें दृढ झालें म्हणजे प्रथमतः [illegible] ज्ञानकर्मांनीं समर्थ असणारा प्रजापति सृष्टीचा विस्तार करण्याला मुख्य साधन असणारें एक मिथुन उत्पन्न करितो.

शिष्य—या मिथुनाचें अथवा दोन वस्तूंचें स्वरूप कसें ?

सिद्धान्ती—हें मिथुन रयि आणि प्राण यांनीं घटित होतें. रयि म्हणजे सोम अथवा अन्न होय. प्राण म्हणजे अग्नि अथवा अन्न भक्षण करणारा भोक्ता होय. हे अग्नीषोम ( अग्नि आणि सोम ) होत. किंवा सूर्य–चंद्र होत. अग्नि ( सूर्य ) हा खाणारा आणि सोम हें अन्न ( खाण्याचा पदार्थ ). याप्रमाणें प्रथम सूर्य–चंद्ररूपी मिथुन उत्पन्न करून त्यांचा आत्मा आपण ( प्रजापति ) होतो. त्याचा सत्यसंकल्प असा असतो कीं, हें मिथुन अनेक प्रकारच्या प्रजा उत्पन्न करील. असो; प्रथमतः तो एक अंडें निर्माण करितो आणि नंतर सूर्य चंद्र उत्पन्न करितो.

शिष्य—रयि याचा अर्थ धन, सर्व उपभोगाचे पदार्थ, असा आहे.

सिद्धान्ती—आणि या भोग्य पदार्थांचा चंद्रकिरणांशीं नित्य संबंध असतो म्हणून रयीला चंद्र असें लक्षणेनें म्हटलें आहे. याचप्रमाणें परमेश्वर अग्नि होऊन प्राण्यांच्या शरीरांत वास्तव्य करितो आणि अन्नपचनाचें कार्य घडवून आणितो, असें स्मृति ( भगवद्गीता ) सांगते म्हणून प्राणाला अग्नि असें म्हटलें आहे. अग्नि हा सूर्य आहे, असें श्रुतिवाक्यावरून स्पष्ट होतें. म्हणून प्राणाला अग्नि किंवा सूर्य असें म्हटलें. तात्पर्य प्रजा उत्पन्न करावी असा संकल्प झाल्याबरोबर हिरण्यगर्भाला पूर्व कल्पाचें ज्ञान उद्भूत झालें, नंतर स्वसंकल्पसिद्धीसाठीं सूर्य चंद्र अथवा भोग्य वस्तु आणि त्याचे भोक्ते यांचे मूळ स्वरूप जें सूर्य–चंद्र मिथुन तें त्यानें उत्पन्न केलें. ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा.

### आदित्यो ह वै प्राणो रयिरेव चन्द्रमा रयिर्वा एतत्सर्वं यन्मूर्तं चामूर्तं च तस्मान्मूर्तिरेव रयिः ॥ ५ ॥

अन्वय व अर्थ—आदित्यः ह वै प्राणः, रयिः एव चंद्रमाः ( येथें आदित्य हा प्राण आहे. रयि म्हणजे चंद्र होय. ) रयिः वै

**एतत् सर्वं यत् मूर्तं च अमूर्तं च** ( येथें दिसणारें सर्व वस्तुजात हें रयीच आहे. सर्व मूर्त व अमूर्त वस्तु ( साकार आणि निराकारवस्तु ) रयीमध्यें अंतर्भूत होतात. **तस्मात् मूर्तिः एव रयिः** ( म्हणून यच्चयावत् मूर्त वस्तु रयि आहेत.

सारांश, आदित्य हा प्राण आणि रयि चंद्रमा आहे तरी सर्व मूर्तामूर्त वस्तु भोग्य आहेत. म्हणून मूर्त वस्तु ह्या आवश्यक भोग्य पदार्थांत अंतर्भूत होतात. ॥ ५ ॥

**तत्राऽऽदित्यो ह वै प्राणोऽत्ताऽग्निः । रयिरेव चन्द्रमा । रयिरेवान्नं सोम एव तदेतदेकमत्ता चान्नं च प्रजापतिरेकं तु मिथुनम् । गुणप्रधानकृतो भेदः । कथम् । रयिर्वा अन्नं वा एतत्सर्वं किं तद्यन्मूर्तं च स्थूलं चामूर्तं च सूक्ष्मं च मूर्तामूर्ते अन्नरूपे रयिरेव । तस्मात्प्रविभक्ताद्मूर्ताद्यदन्यन्मूर्तरूपं मूर्तिः सैव रयिरमूर्तेनाद्यमानत्वात् ॥ ५ ॥**

सिद्धान्ती—येथें आदित्य म्हणजे प्राण अथवा सर्व उपभोक्ता अग्नि आहे आणि सर्व भोग्य विषय रयि ( चंद्रमा ) आहेत रयि म्हणजे अन्न अथवा सोम होय म्यानात ठव की अत्ता आणि अन्न हे उभयताही एकस्वरूपच आहेत कारण या उभयतांचा आत्मा एकच प्रजापति आहे 'हें सर्व विश्व स्वत आपण होऊन त्यात आपण प्रवेश करिता झाला.' अशी श्रुति आहे. याचें तात्पर्य भोग्य विषय आणि भोक्ता याचें उत्पादकत्व हिरण्यगर्भाकडे असून तोच हें सर्व विश्व नटून राहिला आहे. एक असूनही तो मिथुनरूपी झाला आहे. खाणाराही तो आणि खाण्याचें अन्नही तोच आहे.

*शिष्य—हें कसें घरें ! खाणारा आणि खाण्याचें अन्न हीं व्यवहारात भिन्न भिन्न दिसतात.*

सिद्धान्ती—हें व्यवहारत खरें आहे. परमार्थत नाहीं. गुणप्रधान दृष्टीनें अभिन्न वस्तूत हा भेद उत्पन्न होतो

*शिष्य—मला कांहीं समजलें नाहीं !*

सिद्धान्ती—हें पहा, जितके म्हणून चराचर व मूर्तामूर्त पदार्थ आपल्याला या विश्वात दिसतात ते सर्व कोणाचे तरी खाण्यास उपयोगी पडणारे असतात. वायु हा पदार्थ अमूर्तच आहेना ! पण त्याचा भक्षकही आकाशासारखा कोणी तरी असतोच असतो हीच गोष्ट सोपाधिक आत्म्याचीही आहे जीवो जीवस्य जीवन ( जीव हा दुसऱ्या कोणातरी जीवाचें खाणें असतो ), असें आपण नेहमी पाहतो की नाहीं ! सारांश, हा जर अनुभव प्रत्यक्ष आहे तर चराचर

वस्तूला किंवा साकार आणि निराकार वस्तूला रयि म्हणजे अन्न म्हणण्यास काय प्रत्यवाय आहे ?

शिष्य—मग 'अन्न हें मात्र रयि आहे' असें कां म्हणावें ?

सिद्धान्ती—जेव्हां आपण मूर्त किंवा अमूर्त असा भेदाभेद करीत नाहीं, त्यावेळीं रयि म्हणजे सर्व भोग्यजात विषय असें म्हणावयास काय हरकत आहे ? सर्व मूर्तामूर्त वस्तु किंवा स्थूलसूक्ष्म वस्तु रयीच होतात. अन्न होण्याची पात्रता सर्वांस आहे. हें लक्षांत ठेवून आपण बोलूं लागलों म्हणजे सर्व वस्तु रयिरूप होतात. पण त्यांचा खाणारा कोण ही गोष्ट लक्षांत ठेविली म्हणजे सर्वांस प्राण-रूपत्वही येतें. आतां, अन्न आणि अन्न खाणारा असा गुणप्रधानभाव लक्षांत ठेवून बोलावयाचें म्हणजे सर्व मूर्त वस्तु रयि होतात. कारण, खाण्याची वस्तु गौण होते आणि खाणारा प्रधान होतो. खाणारानें खाण्याच्या सर्व वस्तु मूर्त स्वरूपाच्या असतात, हें तुकाही ठाऊक आहे. सारांश, रयिस्वरूपानें पृथ्वी, जल, तेज, वायु आणि आकाश एक स्वरूप आहेत; पण त्यांत वायु आणि आकाश अमूर्त आणि बाकीचीं महाभूतें मूर्त आहेत. म्हणून मूर्त वस्तूला मुख्यतः रयि या शब्दानें संबोधिलें, अर्थात मिथुनापैकीं सूर्य हा भोक्त्याचें उपलक्षण आणि चंद्र हा भोग्य विषयाचें उपलक्षण आहे. प्रजापतीच्या दृष्टीनें सर्व वस्तूंचा अंतर्भाव रयीमध्यें होतो. आपल्या दृष्टीनें मूर्त वस्तूंचा मात्र अंतर्भाव तेथें होतो. पण सर्वच पदार्थ रय्यात्मक व प्राणात्मक असतात, म्हणून रयीस व प्राणास मिळून य व्यक्तिशः प्रजापतित्व येतें, हें विसरूं नये. ॥ ५ ॥

---

तथाऽमूर्तोऽपि प्राणोऽत्ता सर्वमेव यत् चाऽऽद्यं। कथं—

सिद्धान्ती—याचप्रमाणें अमूर्त असणारा प्राणही सर्वोपभोक्ता असून आद्य म्हणजे भोग्यवस्तू ही प्राणरूप होतात. म्हणजे अत्ता (भोक्ता) आणि आद्य (भोग्य-वस्तु) हीं वस्तुतः एकच आहेत. कसें तें ऐकः—

## मंत्र सहावा.

**अथाऽऽदित्य उदयन्यत्प्राचीं दिशं प्रविशति तेन प्राच्यान्प्राणान्रश्मिषु संनिधत्ते । यद्दक्षिणां यत्प्रतीचीं यदुदीचीं यदधो यदूर्ध्वं यदन्तरा दिशो यत्सर्वं प्रकाशयति तेन सर्वान्प्राणान्रश्मिषु संनिधत्ते ॥६॥**

अन्वय व अर्थ—अथ आदित्यः उदयन् प्राचीं दिशं प्रविशति ( कारण सूर्याचा उदय झाल्यावर तो पूर्वदिशेमध्यें प्रवेश करितो. )

**तेन प्राच्यान् प्राणान् रश्मिषु संनिधत्ते** (आणि सर्व पूर्व दिशेकडील प्राणास आपल्या किरणांनीं व्यापून टाकितो,) **यत् दक्षिणां, यत् प्रतीचीं, यत् उदीचीं, यत् अधः, यत् ऊर्ध्वं, यत् अंतरा दिशः, यत् सर्वं प्रकाशयति** (तो *दक्षिण पश्चिम, उत्तर, खालीं, वर, अवांतर दिशा* या सर्व दिशांत ज्या ज्या वस्तु असतात, त्यास प्रकाशित करितो.) **तेन सर्वान् प्राणान् रश्मिषु संनिधत्ते** (आणि आपल्या सर्व प्रकाशित किरणांनीं त्या त्या दिशांत राहाणाऱ्या प्राणास प्रकाशित करितो.)

सारांश, सूर्य सर्व दिशांतील सर्व वस्तूस प्रकाशित करितो म्हणून सर्व वस्तु आत्मवत् म्हणजे प्राणरूप करितो ॥ ६ ॥

अथाऽऽदित्य उदयन्नुद्गच्छन्प्राणिनां चक्षुर्गोचरमागच्छन्यत्प्राचीं दिशं स्वप्रकाशेन प्रविशति व्याप्नोति । तेन स्वात्मव्याप्त्या सर्वांस्तत्स्थान्प्राणान्प्राच्यानन्तर्भूतान्रश्मिषु स्वात्मावभासरूपेषु व्याप्तिमत्सु व्याप्तत्वात्प्राणिनः संनिधत्ते संनिवेशयति, आत्मभूतान्करोतीत्यर्थः । तथैव यत्प्रविशति दक्षिणां यत्प्रतीचीं यदुदीचीमध ऊर्ध्वं यत्प्रविशति यच्चान्तरा दिशः कोणदिशोऽवान्तरदिशो यच्चान्यत्सर्वं प्रकाशयति तेन स्वप्रकाशव्याप्त्या सर्वान्सर्वदिक्स्थान्प्राणान्रश्मिषु संनिधत्ते ॥ ६ ॥

सिद्धान्ती—सर्व वस्तु प्राणरूप कशा होतात तें पहा. सूर्याचा उदय झाला, सर्व प्राण्यांच्या नेत्रास तो गोचर होऊं लागला, म्हणजे प्रथमतः तो पूर्व दिशेंत प्रवेश करितो म्हणजे पूर्व दिशा आपल्या प्रकाशानें व्यापून टाकितो. याप्रमाणें आपल्या किरणांनीं अथवा आपणच पूर्व दिशा व्यापिली म्हणून तेथें राहणारे सर्व प्राणी (पूर्वेकडील सर्व प्राणी) आपल्या किरणामध्यें व्यापून टाकितो. म्हणजे आपल्या सर्वव्यापी प्रकाशानें त्यास अंतर्बाह्य प्रकाशित करितो, प्रकाशरूप करितो, आत्मरूप करितो. याचप्रमाणें दक्षिण, पश्चिम, उत्तर, अधोदिशा, ऊर्ध्व दिशा, आग्नेयी इत्यादि चारी कोणदिशा, अवांतर दिशा, यांत असणाऱ्या सर्व वस्तु प्रकाशित करितो म्हणून त्या त्या सर्व दिशांत राहणारे सर्व प्राणी आपल्या स्वरूपांत अंतर्भूत करितो. सारांश, सर्वांस प्राणरूप अथवा आत्मरूप करितो. तात्पर्य, यच्चयावत् वस्तु परमार्थतः प्राणात्मरूपच आहेत. मागच्या मंत्रांत सर्व वस्तु अन्नरूप आहेत असें सांगितलें तसेंच, त्याच न्यायानें, या मंत्रांत सर्व वस्तु प्राणरूप आहेत असें सांगितलें ॥ ६ ॥

### मंत्र सातवा.

**स एप वैश्वानरो विश्वरूपः प्राणोऽग्निरुदयते। तदेतदृचाऽभ्युक्तम् ॥ ७ ॥**

अन्वय व अर्थः—सः एषः वैश्वानरः विश्वरूपः प्राणः अग्निः उदयते ( तो हा वैश्वानर आणि विश्वरूप असणारा प्राण अग्निरूपानें उदय पावतो. ) तत् एतत् ऋचा अभ्युक्तं ( हेंच तत्त्व ऋग्वेदांतील मंत्रानें सांगितलें आहे. ) ॥ ७ ॥

स एषोऽत्ता प्राणो वैश्वानरः सर्वात्मा विश्वरूपो विश्वात्मत्वाच्च प्राणोऽग्निश्च स एवात्तोदयत उद्गच्छति प्रत्यहं सर्वा दिश आत्मसात्कुर्वन्। तदेतदुक्तं वस्तु ऋचा मन्त्रेणाप्यभ्युक्तम् ॥ ७ ॥

सिद्धान्ती—तो हा प्रत्यक्ष असणारा भोक्ता ( सूर्य ) प्राणरूप आहे. हा वैश्वानर आहे.

शिष्य—म्हणजे येथें सर्व जीवांचा जो आत्मा त्याला वैश्वानर असें म्हणावयाचें. होयना ?

सिद्धान्ती—होय. हा सर्वांचा आत्मा असून विश्वरूप आहे म्हणजे येथें आपल्याला जेवढे अनंतविध वस्तु दिसतात, त्यांचाही आत्मा तोच आहे. प्राणही तोच आणि अग्निही तोच आहे. त्याचा प्रति दिवशीं उदय होऊन तो वर सांगितल्याप्रमाणें सर्व दिशांस प्राणरूप करितो. सारांश सर्वप्राणरूप आहे. हाच अर्थ ऋग्वेदांतील एका मंत्रानें स्पष्ट केला आहे.

शिष्य—कोणता तो मंत्र ?

सिद्धान्ती—ऐकः—॥ ७ ॥

### मंत्र आठवा.

**विश्वरूपं हरिणं जातवेदसं परायणं ज्योतिरेकं तपन्तम्। सहस्ररश्मिः शतधा वर्तमानः प्राणः प्रजानामुदयत्येष सूर्यः ॥ ८ ॥**

अन्वय व अर्थ—विश्वरूपं, हरिणं, जातवेदसं, परायणं, ज्योतिः एकं तपंतं ( विश्वरूप, प्रकाशक, सर्वज्ञ, सर्वाधार, तेजस्वरूप, एकरूप, आणि तापद—असें हें अग्निस्वरूप ब्रह्मवेत्त्यांस दिसतें—) सहस्ररश्मिः शतधा

वर्तमानः प्रजानां प्राणः एषः सूर्यः उदयति ( हा अनंत किरणांचा, एक असून अनेक होणारा, सर्व उत्पन्न झालेल्या वस्तूंचा आत्मा असणारा हा जो सूर्य, याचा उदय झाला आहे, ) ॥ ८ ॥

**विश्वरूपं सर्वरूपं हरिणं रश्मिवन्तं जातवेदसं जातप्रज्ञानं परायणं सर्वप्राणाश्रयं ज्योतिरेकं सर्व-प्राणिनां चक्षुर्भूतमद्वितीयं तपन्तं तापक्रियां कुर्वाणं स्वात्मानं सूर्यं सूरयो विज्ञातवन्तो ब्रह्मविदः । कोऽसौ य विज्ञातवन्तः । सहस्ररश्मिरनेकरश्मिः शतधाऽनेकधा प्राणिभेदेन वर्तमानः प्राणः प्रजानामुदयत्येष सूर्यः ॥ ८ ॥**

सिद्धान्ती—हा मंत्र ऋग्वेदांतील आहे. यात सूर्याचें माहात्म्य सांगितलें आहे. अर्थ-जो विश्वरूप आहे, तो स्वयंप्रकाश आहे यच्चयावत् सर्व वस्तूंचें त्याला ज्ञान सहज प्राप्त झालें आहे. त्याच्या आश्रयानें सर्व प्राण विद्यमान असतात. तो प्रकाशस्वरूप आहे. त्याच्या स्वरूपात कोणत्याही प्रकारचा भेद नाहीं. तो अद्वितीय आहे. सर्व प्राण्यांचे चक्षु ( नेत्र ) तोच झाला आहे. सर्वांस अंतर्बाह्य उष्णता पुरविणारा तोच आहे हें सूर्याचें स्वरूप ब्रह्मवेत्त्यांना मात्र समजतें.

शिष्य—सर्वांना समजतें हे शब्द मूळ मंत्रात नाहींत. मला वाटतें कीं पहिल्या अर्धांतील सर्व शब्द द्वितीया विभक्तीमध्यें आहेत, म्हणून आचार्यांनी या विभक्तीची व्यवस्था लावून अर्थाची पूर्णता केली आहे. मंत्राच्या दुसऱ्या अर्धांत सर्व शब्द प्रथमांत आहेत म्हणून त्यांचा व पहिल्या विशेषणात्मक द्वितीयान्त पदांचा अन्वय जुळणार नाहीं, म्हणून ही व्यवस्था आहे. हें ठीक आहे. पण ज्याचें स्वरूप ब्रह्मवेत्त्यांस समजतें तो कोण ?

सिद्धान्ती—तो सूर्य होय. याला सहस्र म्हणजे अनेक अथवा अनंत किरण असतात, या विश्वात जितके प्राणी आहेत तितकीं रूपें घेऊन हा अनंतरूपी होतो, हा सर्व प्रजांचा प्राण म्हणजे आत्मा आहे. सर्व अवयवांस व्यवहाराचें कारण आणि व्यवहाराचा नियामक हाच आहे. याचा उदय झाला म्हणजे सर्व प्राण्यांचे व्यवहार सुरू होतात. ॥ ८ ॥

---

**यश्चासौ चन्द्रमा मूर्तिरन्नममूर्तिश्च प्राणोऽसावादित्यस्तदेतदेकमेतन्मिथुनं सर्वं कथं प्रजाः करिष्यत इति । उच्यते—**

शिष्य—महाराज, जें जें मूर्त आहे. त्याला म्हणजे रयि अथवा चंद्र किंवा आणि रयि म्हणजे अन्न असें मला वाटतें या मंत्राचा प्रतिनिधि चंद्र आहे, असें ही आपण दर्शविलें. त्याचप्रमाणें अमूर्त जो प्राण तो मोठा आहे. आणि त्याचा

प्रतिनिधि सूर्य आहे, हें आपल्या सांगण्यावरून मला समजलें. तसेंच सूर्य-चंद्र मिथुन प्रजापतीनें उत्पन्न केलें आहे, हें आपलें वचन मी ध्यानांत ठेवलें आहे व हें मिथुन सर्वात्मक आहे, हें मी विसरलों नाहीं. आतां मला असें विचारावयाचें कीं, हें एकस्वरूपी असणारें मिथुन प्रजा उत्पन्न करण्यास कसें समर्थ झालें ?

सिद्धान्ती—याच प्रश्नाला श्रुति उत्तर देत आहे. ऐक—

## मंत्र नववा.

**संवत्सरो वै प्रजापतिस्तस्यायने दक्षिणं चोत्तरं च। तद्ये ह वै तदिष्टापूर्ते कृतमित्युपासते। ते चान्द्रमसमेव लोकमभिजयन्ते। त एव पुनरावर्तन्ते तस्मादेत ऋषयः प्रजाकामा दक्षिणं प्रतिपद्यन्ते। एष ह वै रयिर्यः पितृयाणः ॥ ९ ॥**

अन्वय व अर्थः—संवत्सरः वै प्रजापतिः ( संवत्सर—वर्ष—काळ हा प्रजापति होय ) तस्य दक्षिणं उत्तरं च अयने ( त्याचे दक्षिण आणि उत्तर असे दोन मार्ग आहेत ) तत् ये ह वै तत् इष्टापूर्ते कृतं इति उपासते, ते चांद्रमसं एव लोकं अभिजयंते (आतां ब्राह्मणादि वर्णांतील जे मुनि अनित्य जें तें नित्य इष्टापूर्त 'आहे असें समजून' उपासित करितात—जे लोक अनित्य इष्टापूर्तांची उपासना करितात ते लोक चंद्रलोकामध्यें मात्र प्रवेश करितात. ) ते एव पुनः आवर्तन्ते ( ते लोक मात्र पुनः पुनः जन्म-मरणाच्या चक्रांत सांपडतात॰ ) तस्मात् एते प्रजाकामाः ऋषयः दक्षिणं प्रतिपद्यंते ( म्हणून हे संततीची इच्छा करणारे ऋषि—'स्वर्ग आहे आणि तो यज्ञानें मिळतो.' अशी श्रद्धा असणारे गृहस्थ—दक्षिण मार्गानें जातात, ) यः पितृयाणः एष ह वै रयिः ( ज्याला पितृयाण म्हणतात तोच हा रयिरूप—अन्नरूप—चंद्रमा होय. )

सारांश, जे प्रजार्थी आहेत ते इष्टापूर्तादि यज्ञ करून चंद्रलोकाला जातात. आणि जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडतात. हा चंद्रलोक म्हणजे रयि ( अन्न ) होय. ॥ ९ ॥

तदेव कालः संवत्सरो वै प्रजापतिस्तन्निर्वर्त्यत्वात्संवत्सरस्य। चन्द्रादित्यनिर्वर्त्यतिथ्यहोरात्रसमुदायो हि संवत्सरस्तदनन्यत्वाद्रयिप्राणमिथुनात्मक एवेत्युच्यते, तत्कथम्, तस्य संवत्सरस्य प्रजापतेरयने मार्गौ द्वौ दक्षिणं चोत्तरं च। द्वे प्रसिद्धे ह्ययने

षण्मासलक्षणे याभ्यां दक्षिणेनोत्तरेण च याति सविता केवलकर्मिणां ज्ञानसंयुक्तकर्मवतां च लोकान्विदधत् । कथं तत्, तत्र च ब्राह्मणादिषु ये ह वै तदुपासत इति क्रियाविशेषणो द्वितीयस्तच्छब्दः । इष्टं च पूर्तं चेष्टापूर्ते इत्यादि कृतमेवोपासते नाकृतं नित्यं ते चान्द्रमसं चन्द्रमसि भवं प्रजापतेर्मिथुनात्मकस्यांशं रयिमन्नभूतं लोकमभिजयन्ते कृतरूपत्वाच्चान्द्रमसस्य । ते तत्रैव च कृतक्षयात्पुनरावर्तन्त इमं लोकं हीनतरं वा विशन्तीति ह्युक्तम् । यस्मादेवं प्रजापतिमन्नात्मकं फलत्वेनाभिनिर्वर्तयन्ति चन्द्रमिष्टापूर्तकर्मणैत ऋषयः स्वर्गद्रष्टारः प्रजाकामाः प्रजार्थिनो गृहस्थास्तस्मात्स्वकृतमेव दक्षिणं दक्षिणायनोपलक्षितं चन्द्रं प्रतिपद्यन्ते । एष ह वै रयिरन्नं यः पितृयाणः पितृयाणोपलक्षितश्चन्द्रः ॥ ९ ॥

सिद्धान्ती—प्रजापति हाच संवत्सर म्हणजे काळ होय. प्रजापतीनें संवत्सराला ( वर्षाला ) उत्पन्न केलें म्हणून लक्षणा करून वर्षाला प्रजापति असें म्हटलें आहे. अर्थातच येथें प्रजापति म्हणजे चंद्र आणि सूर्य यांचें मिथुन असें समजन घ्यावयाचें आहे. संवत्सरातील अहोरात्रींचा निर्माता सूर्य आहे. आणि तिथींचा नियामक चंद्र आहे. व तिथी आणि अहोरात्री या उभयतांच्या सहकारित्वानें संवत्सराची घटना होते. म्हणून चंद्रसूर्यरूपी मिथुनानें उत्पन्न झालेल्या संवत्सराला प्रजापति असें म्हटलें. या प्रजापतिनिर्मित संवत्सराचे गमनमार्ग दोन आहेत. त्याला दक्षिण मार्ग आणि उत्तर मार्ग असें म्हणतात, हें सर्व–प्रसिद्ध आहे. हे प्रसिद्ध मार्ग दक्षिणायन आणि उत्तरायण हे होत. उत्तरमार्गानें सूर्य जाऊं लागला म्हणजे त्या कालाला उत्तरायण म्हणतात, आणि तो दक्षिण दिशेकडे वळला म्हणजे त्या मार्गानें जातो, त्याला दक्षिण–मार्ग आणि त्या कालाला दक्षिणायन म्हणतात. सूर्य दक्षिण मार्गानें जात असला म्हणजे तो केवळ कर्मठांचे कर्म–फलाची व्यवस्था करितो व उत्तर मार्गानें जाऊं लागला म्हणजे ज्ञान–पूर्वक कर्म करणाऱ्या तपस्व्याची कर्म–फल व्यवस्था करितो. केवळ वेदोक्त कर्मे करणारे आहेत, उपासनापूर्वक वेदोक्त कर्मे करितात ते लोक दक्षिण मार्गानें जातात. साराच, जे कोणी ब्राह्मणादि दक्षिण मार्गानें नेणाऱ्या देवतांची उपासना करितात, त्या लोकांना जाण्याचा मार्ग पितृयाण आहे. हे लोक ( म्हणजे केवळ कर्मावर श्रद्धा ठेवणारे लोक ) इष्ट आणि पूर्त या चंचल किंवा अनित्य कर्मांची उपासना करितात, नित्याची करीत नाहींत. ते इष्टपूर्तांचे उपासक चांद्रमस ( प्रजापतीचें जे सूर्यचंद्रात्मक मिथुन आहे त्यांतील चंद्राच्या अन्नाच्या) लोकामध्यें प्रवेश करितात. चंद्र म्हणजे मूर्त, रयि किंवा अन्न होय हें आपण

अन्वय व अर्थ—अथ उत्तरेण तपसा, ब्रह्मचर्येण, श्रद्धया, विद्यया आत्मानं अन्विष्य, आदित्यं अभिजयन्ते ( आतां दुसरें अयन किंवा दुसरा मार्ग म्हणजे उत्तरायण होय. तप, ब्रह्मचर्य, श्रद्धा, आणि विद्या याच्या साहाय्यानें प्राण–स्वरूप समजून घेणारे मुनि आदित्य लोकाची प्राप्ति करून घेतात. एतत् वै प्राणानाम् आयतनं, एतत् अमृतं, एतत् अभयं, एतत् परायणं ( आदित्य हा प्राणाचें वसतिगृह आहे. हा अमृत देणारा, अभय उत्पन्न करणारा आणि उत्तम प्रकारचा आश्रय असणारा आहे. ) एतस्मात् न पुनः आवर्तन्ते ( आदित्य लोकाची प्राप्ति झाली असता पुनर्जन्म येत नाहीं. ) इति एषः निरोधः ( असा हा नियम ठरलेला आहे. ) तत् एषः श्लोकः ( त्याच्या संबधानें हा श्लोक आहे.)

सारांश, निष्काम तप, निष्काम ब्रह्मचर्य, निष्काम श्रद्धा आणि विद्या, यांचा दृढ आश्रय केला असता प्राणरूप आदित्य लोकाची प्राप्ति होते. प्राणरूपत्व प्राप्त होतें. म्हणून पुन: जन्म घेण्याचें कारण उरत नाहीं ॥ १० ॥

अथोत्तरेणायनेन प्रजापतेरंशं प्राणमत्तारमादित्यमभिजयन्ते।
केन। तपसेन्द्रियजयेन विशेषतो ब्रह्मचर्येण श्रद्धया विद्यया
च प्रजापत्यात्मविषययाऽऽत्मानं प्राणं सूर्यं जगतस्तस्थुषश्चा-
न्विष्याहमस्मीति विदित्वाऽऽदित्यमभिजयन्तेऽभिप्राप्नुवन्ति।
एतद्वा आयतनं सर्वप्राणानां सामान्यमायतनमाश्रयम् [ए]
तदमृतमविनाशि, अभयमत एव भयवर्जितं न चन्द्रवत्क्षयवृद्धि-
भयवदेतत्परायणं परा गतिर्विद्यावतां कर्मिणां च ज्ञानवतामे-
तस्मान्न पुनरावर्तन्ते यथेतरे केवलकर्मिण इति यस्मादेषोऽ-
विदुषां निरोध आदित्याद्धि निरुद्धा अविद्वांसो नैते संवत्स-
रमादित्यमात्मानं प्राणमभिप्राप्नुवन्ति। स हि संवत्सरः काला-
त्माऽविदुषां निरोधः। तत्रास्मिन्नर्थ एष श्लोको मन्त्रः ॥ १० ॥

सिद्धान्ती—या नंतर उत्तरायणाचा विचार करावयाचा. उत्तरमार्ग हा एक गमनमार्ग म्हणजे प्राणरूप जो सर्व–भोक्ता आदित्य त्याचें स्वरूप आहे आदित्य हा प्रजापतीचा एक अंश आहे. सर्व आपण मागें ठरविलें आहे. या आदित्याची किंवा उत्तर मार्गाची कांहीं लोक प्राप्ति करून घेतात.

शिष्य—ती कशी ?

सिद्धान्ती—इंद्रियदमन करून तपश्चर्या करणें, विशेषतः ब्रह्मचर्याचें नैष्ठिक आचरण करणें, श्रद्धा–पूर्ण असणें, ज्ञान–संपादन करणें.–

शिष्य—कसलें ज्ञान संपादन करावयाचें? किंवा कशाविषयीं श्रद्धापूर्ण असावयाचें?

सिद्धान्ती—सर्व चराचर विश्वाचा प्राण (नियामक) असणारा जो सूर्य हा प्रजापतीचा अंश आहे. तो ज्या प्रजापतीचा अंश आहे त्यावर श्रद्धा ठेवणें आणि 'मीच तो प्रजापति आहें' असें तादात्म्यज्ञान करून घेणें, ही विद्या होय. असो. निष्काम तपादि साधनांनीं जे लोक विश्वप्राण जो आदित्य त्याची आराधना करितात ते आदित्य लोकाची प्राप्ति करून घेतात. हा सूर्य चराचर वस्तूंचा प्राण आहे.

शिष्य—या आदित्याचें स्वरूप काय?

सिद्धान्ती—हें स्वरूप तर सर्व प्रसिद्ध आहे. आदित्य हा सर्व प्राणांचें सामान्य आयतन (आश्रयस्थान) आहे.

शिष्य—सामान्य आश्रयस्थान म्हणजे समष्टिरूप कीं काय? हिरण्यगर्भ समष्टिरूप आहे. हा विश्वाचा प्राण आहे. तोच हा आदित्य कीं काय?

सिद्धान्ती—होय. आदित्य हा प्रजापतीचा अंश आहे. आणि तो निर्विकार आहे. आणि चंद्र (अन्न) विकारी आहे, हें आपण आतां इतक्यांतच ठरविलें आहे. असो, आदित्य हा अविनाशी असून भयशून्यता देणारा आहे. चंद्राप्रमाणें आदित्याला क्षयवृद्धीची उपाधि नाहीं. म्हणून तेथें कोणत्याही प्रकारचें भय नसतें. तसेंच आदित्य हा केवळ उपासकांची व उपासनेसह कर्म करणाऱ्या लोकांची श्रेष्ठ गति आहे. केवलोपासक आणि ज्ञानकर्मांचा समुच्चय करणारे उपासक यांचा इष्टतम पुरुषार्थ म्हणजे आदित्य लोकांची प्राप्ति होणें हा होय. येथें प्राप्त झालेला पुरुष पुनः परत येत नाहीं. त्याचें जन्ममरण संपतें. केवळ कर्मठ लोकांना जन्ममरणाची यातायात भोगावी लागते, त्याप्रमाणें आदित्यात्मक लोकांस या यातायातीची उपाधि नसते.

शिष्य—यावरून हें उघड होतें कीं, जे उपासनाशून्य आहेत त्या लोकांस आदित्याची प्राप्ति केव्हांही व्हावयाची नाहीं. त्यांस आदित्यरूपी जो आत्मा त्याचें ज्ञानही व्हावयाचें नाहीं, असा एक सर्वव्यापी नियम आहे. तात्पर्य, संवत्सररूपी कालात्मा याप्रमाणें अज्ञानी लोकांचा निरोध करितो.

सिद्धान्ती—बरोबर आहे. हाच अर्थ समर्थन करणारा मंत्र पुढें सांगितला आहे, त्याचें काळजीपूर्वक मनन कर ॥ १० ॥

## मंत्र अकरावा.

**पञ्चपादं पितरं द्वादशाकृतिं दिव आहुः परे अर्धे पुरीषिणम् । अथेमे अन्य उ परे विचक्षणं सप्तचक्रे षडर आहुरर्पितमिति ॥ ११ ॥**

अन्वय व अर्थ—दिवः परे अर्धे पुरीषिणं, पञ्चपादं, द्वादशाकृतिं, पितरं आहुः ( आकाशाच्या–अंतरिक्ष लोकाच्या–पलीकडे असणारा जो संवत्सर आहे, तो उदकपूर्ण असून त्याला पांच पाय व बारा अवयव असतात. आणि तो सर्व जगाचा उत्पादक आहे, असें ज्ञाते लोक म्हणतात. ) अथ उ इमे अन्ये परे विचक्षणं सप्तचक्रे षडरे अर्पितं इति आहुः (आतां कांहीं दुसरे काळवेत्ते पंडित असें म्हणतात कीं संवत्सर हा सर्वज्ञ आहे आणि तो सप्तचक्रांच्या व सहा अरांच्या रथामध्यें बसलेला आहे.)

सारांश, संवत्सराला कांहीं लोक पांच पाय आणि बारा अवयव आहेत असें म्हणतात, व कांहीं दुसरे लोक तो सप्तचक्रांच्या व सहा आरा असणाऱ्या रथांत बसला आहे असें म्हणतात.

पञ्चपादं पञ्चर्तवः पादा इवास्य संवत्सरात्मन आदित्यस्य तैरसौ पादैरिवर्तुभिरावर्तते । हेमन्तशिशिरावेकीकृत्येयं कल्पना । पितरं सर्वस्य जनयितृत्वात्पितृत्वं तस्य, तं द्वादशाकृतिं द्वादश मासा आकृतयोऽवयवा आकरणं वाऽवयविकरणमस्य द्वादश· मासैस्तं द्वादशाकृतिं दिवो द्युलोकात्पर ऊर्ध्वेऽर्धे स्थाने तृतीयस्यां दिवीत्यर्थः । पुरीषिणं पुरीषवन्तमुदकवन्तमाहुः कालविदः । अथ तमेवान्य इम उ परे कालविदो विचक्षणं निपुणं सर्वज्ञं सप्तचक्रे सप्तहयरूपेण चक्रे सततं गतिमति कालात्मनि षडरे षडृतुमत्याहुः सर्वमिदं जगत्कथयन्ति । अर्पितमरा इव रथनाभौ निविष्टमिति । यदि पञ्चपादो द्वादशाकृतिर्यदि वा सप्तचक्रः षडरः सर्वथाऽपि संवत्सरः कालात्मा प्रजापतिश्चन्द्रादित्यलक्षणोऽपि जगतः कारणम् ॥ ११ ॥

सिद्धान्ती—संवत्सरात्मक असणाऱ्या आदित्याला पांच पाय आहेत असें म्हणतात.

शिष्य—हे पांच पाय कोणते ?

सिद्धान्ती—येथें पाय म्हणजे ऋतु होय. वर्षाचे सहा ऋतु असतात, हें प्रश्न ठाऊक आहे. त्यांपैकीं हेमंत आणि शिशिर हे दोन ऋतु एक केले म्हणजे

वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरत्, आणि हेमंत असे पांच ऋतु शिल्लक राहतात. या पांच पायांनीं संवत्सर भ्रमण करीत असतो. याच्या पासूनच सर्वांची उत्पत्ति झाली आहे म्हणून याला 'सर्व–पिता' असें म्हटलें आहे. वर्षांतील द्वादश मास हे त्याचे अवयव होत.

शिष्य—द्वादशाकृति हा समास कसा सोडवावयाचा? बारा आहेत आवाह-नाचीं नांवें ज्याचीं किंवा बारा रीतीनें अवयवीकरण (विभाजन, झालें आहे ज्याचें) यांपैकीं कोणता प्रकार ठीक आहे?

सिद्धान्ती—दोन्हीही व्याकरण–मान्य आहेत व उभयतांचा अर्थ ही एकच आहे. असो, हा संवत्सर अंतरिक्ष लोकाच्या पलीकडे म्हणजे तिसऱ्या लोकांत आहे, स्वर्लोकांत आहे. हा पुरीषवंत म्हणजे उदकवंत आहे, आदित्यापासून पर्जन्यवृष्टि होते म्हणून त्याला उदकवंत असें म्हटलें. तात्पर्य, या संवत्सरात्मक आदित्याला पांच पाय व बारा अवयव (अथवा बारा नांवें) असून हा पर्ज-न्याचा उत्पादक आणि सर्व चराचरांचा जन्मदाता आहे, असें कालतत्त्ववेत्ते (ज्योतिषी) म्हणतात; पण दुसरे ज्योतिषी असें म्हणतात कीं हा संवत्सरात्मक आदित्य सर्वज्ञ असून सात चाकें असणाऱ्या रथांत बसलेला आहे.

शिष्य—सूर्याच्या रथाला सात घोडे असतात म्हणून त्याला सात चाकें असतात, असें म्हणावयाचें कीं काय?

सिद्धान्ती—येथें चक्र याचा अर्थ अश्व असा आहे. चाकाचा संबंध येथें नाहीं. नित्य गमन करणारा जो काल त्याचा आत्मा आदित्य होय. याच्या रथाला षड्ऋतूंचे सहा अरे आहेत. या सर्वज्ञ सप्तचक्री आणि षडरी आदि-त्यामध्यें हें सर्व जगत् अर्पण झालेलें आहे. रथाच्या तुंब्यामध्यें जशा रथाच्या अरा जाऊन मिळतात, त्याप्रमाणें सर्व जगत् या आदित्यामध्यें अर्पित झालेलें आहे.

शिष्य—येथें दोन मतें दिसतात. संवत्सरात्मक आदित्याला कोणी पंच-पादी व द्वादशावयवी म्हणतात आणि कोणी त्याला सप्तचक्री आणि षडरी म्हणतात. मग या दोन मतांची एकवाक्यता कशी व्हावयाची?

सिद्धान्ती—येथें केवळ कल्पनाभेदमात्र आहे. हेमंतशिशिर एक करून पांच ऋतु म्हटले काय? किंवा ते विभक्त करून सहा म्हटले काय, तात्पर्य एकच आहे. पहिल्या मतांत महिन्यावर अवयवांचें रूपक केलें आहे आणि दुसऱ्या मतांत सतत गमन करणें हा आदित्याचा गुण घेतला आहे, इतकेंच. संवत्सरांच्या स्वरूपांत कांहीं एक फरक नाहीं. तो कालात्मा आहे. चंद्रादित्यांनीं तो घटित होतो आणि तो सर्व जगताचें कारण आहे. या त्याच्या स्वरूपासंबंधानें दोन्ही मंत्रांत एकवाक्यताच आहे. दिसण्यांत मात्र धर्म निराळे, पण धर्मी जो संवत्सर तो एकच आहे. हा प्रजापति होय. ॥ ११ ॥

### मंत्र बारावा.

**मासो वै प्रजापतिस्तस्य कृष्णपक्ष एव रयिः शुक्लः प्राणस्तस्मादेत ऋषयः शुक्ल इष्टं कुर्वन्तीतर इतरस्मिन् ॥ १२ ॥**

अन्वय व अर्थ—मासः वै प्रजापतिः, अस्य कृष्णपक्षः एव रयिः, शुक्लः प्राणः; तस्मात् एते ऋषयः शुक्ले इष्टं कुर्वन्ति, इतरे इतरस्मिन्–कुर्वन्ति–( महिना हा प्रजापति आहे. यांतील कृष्ण पक्ष हा रयि–अन्न–असून शुक्लपक्ष हा प्राणरूपी आहे म्हणून हे ऋषि शुक्ल पक्षामध्यें इष्ट करितात आणि दुसरे कृष्ण पक्षामध्यें करितात. )

सारांश, ज्ञानी लोक आपला आत्मा सूर्य आहे असें समजून आपलीं सर्व नित्य कर्तव्यें शुक्ल पक्षांत करितात आणि हें ज्ञान ज्यांना नाहीं, ते कृष्णपक्षामध्यें आपलीं कर्तव्यें करितात. ॥ १२ ॥

यस्मिन्निदं श्रितं विश्वं स एव प्रजापतिः संवत्सराख्यः स्वावयवे मासे कृत्स्नः परिसमाप्यते । मासो वै प्रजापतिर्यथोक्तलक्षण एव मिथुनात्मकस्तस्य मासात्मनः प्रजापतेरेको भागः कृष्णपक्षो रयिरन्नं चन्द्रमा अपरो भागः । शुक्लः शुक्लपक्षः प्राण आदित्योऽत्ताऽग्निर्यस्माच्छुक्लपक्षात्मानं प्राणं सर्वमेव पश्यन्ति तस्मात्प्राणदर्शिन एत ऋषयः कृष्णपक्षेऽपीष्टं यागं कुर्वन्तः शुक्लपक्ष एव कुर्वन्ति प्राणव्यतिरेकेण कृष्णपक्षस्तैर्न दृश्यते यस्मादितरे तु प्राणं न पश्यन्तीत्यदर्शनलक्षणं कृष्णात्मानमेव पश्यन्ति । इतर इतरस्मिन्कृष्णपक्ष एव कुर्वन्ति शुक्ले कुर्वन्तोऽपि ॥ १२ ॥

सिद्धान्ती—ज्या संवत्सर नामक प्रजापतीच्या आश्रयानें विश्वाचे सकल कारभार चालतात, तो त्याचा अवयव जो महिना त्याच्यामध्येंही सर्वथा समर्पित होतो. कारण सूर्य–चंद्रांचें जें मिथुन तें आहे लक्षण ज्याचें, त्या प्रजापतीचें स्वरूप, संवत्सराचा अवयव जो मास ( महिना ) त्यामध्येंही प्रकट होतें. तो संवत्सरात्मक आहे तसाच मासात्मकही आहे. मासाचा एक भाग कृष्ण आणि दुसरा भाग शुक्ल असतो. कृष्णपक्ष म्हणजे रयि ( अन्न किंवा चंद्र ) होय. हा एक भाग झाला. शुक्ल पक्ष हा दुसरा भाग प्रजापतीचा प्राण ( आदित्य अग्नि किंवा अन्न खाणारा अत्ता ) आहे. आतां शुक्ल–पक्षात्मा जो प्राण तो सर्वव्यापी आहे, अशी प्राण–दृष्टि ज्या ज्ञानी पंडितांस झाली त्यांनी कृष्णपक्षांत जरी यज्ञ.

याग केले, तथापि या विद्वान् पुरुषांस शुक्लपक्षांत केलेल्या यज्ञाचें फल मिळतें. या ज्ञानी लोकांस प्राणशून्य असा कृष्णपक्ष दिसतच नाहीं, म्हणून कृष्णपक्षांत केलेले ज्ञानी लोकांचे यज्ञयाग शुक्लपक्षांत केलेल्या यज्ञयागाचें फल देतात. पण ज्यांना प्राण-दृष्टि नाहीं, जे अज्ञानी आहेत व अन्न हाच इष्टतम पुरुषार्थ आहे, असें ज्यांस वाटतें, त्यांनीं शुक्लपक्षांत केलेलीं कृत्यें सुद्धां कृष्णपक्षात्मक फल देतात. सारांश, ज्ञानी लोकांनीं कोणत्याही काळीं केलेलें कर्म यशस्कर होतें. पण अज्ञानी लोकांनीं शुभ काळांत केलेलें कर्म सुद्धां परिणामी दुःखदायक होतें ॥१२॥

---

## मंत्र तेरावा.

**अहोरात्रो वै प्रजापतिस्तस्याहरेव प्राणो रात्रिरेव रयिः प्राणं वा एते प्रस्कन्दन्ति ये दिवा रत्या संयुज्यन्ते ब्रह्मचर्यमेव तद्यद्रात्रौ रत्या संयुज्यन्ते ॥ १३ ॥**

अन्वय व अर्थ—अहोरात्रः वैः प्रजापतिः, तस्य अहः एव प्राणः, रात्रिः एव रयिः, ये दिवा संयुज्यंते एते प्राणं वै प्रस्कंदन्ति, यत् रात्रौ रत्या संयुज्यंते तत् ब्रह्मचर्यं एव ( अहोरात्र हा प्रजापति आहे; त्यांतील दिवस हा प्राण आणि रात्रि हें अन्न-रयि-आहे; म्हणून जे दिवसा रत्युपभोग घेतात ते प्राणाला बाहेर टाकून देतात, प्राण-शोष करितात; पण जे कोणी रात्रौ रत्युपभोग घेतात, त्यांचें आचरण ब्रह्मचर्यात्मक असतें ॥१३॥

सोऽपि मासात्मा प्रजापतिः स्वावयवेऽहोरात्रे परिसमाप्यते। पूर्ववत्। तस्याप्यहरेव प्राणोऽत्ताऽग्नी रात्रिरेव रयिः पूर्ववत्, प्राणमहरात्मानं वा एते प्रस्कन्दन्ति निर्गमयन्ति शोषयन्ति वा स्वात्मनो विच्छिद्यापनयन्ति। के। ये दिवाऽहनि रत्या रतिकारणभूतया सह स्त्रिया संयुज्यन्ते मिथुनं मैथुनमाचरन्ति मूढाः। यत एवं तस्मात्तन्न कर्तव्यमिति प्रतिषेधः प्रासङ्गिकः। यद्रात्रौ संयुज्यन्ते रत्या ऋतौ ब्रह्मचर्यमेव तदिति प्रशस्तत्वाद्रात्रौ भार्यागमनं कर्तव्यमिति। अयमपि प्रासङ्गिको विधिः। प्रकृतं तूच्यते सोऽहोरात्रात्मकः प्रजापतिर्व्रीहियवाद्यन्नात्मना व्यवस्थितः ॥ १३ ॥

सिद्धान्ती—तोच मासात्मक प्रजापति, मासाचा अवयव जो अहोरात्र त्यांत समर्पित होतो. त्यांतील दिवस [illegible] प्राण किंवा अन्न खाणारा किंवा अग्नि

होय. रात्री ही अन्नरूप रयि किंवा चंद्रमा होय. आतां हें ध्यानांत ठेवलें पाहिजे कीं प्राण हा आपला आत्मा आहे. म्हणून अहोरात्राला प्रजापति स्वरूप आलें; म्हणजे त्याचा अवयव जो दिवस तो आपला प्राणात्मा होतो. म्हणून जे कोणी मूर्ख लोक दिवसा रतिसुख घेऊन रेतस्खलन करितात, ते आपल्या प्राणाला बाहेर टाकितात, त्याला शुष्क करितात, किंवा त्याचा विच्छेद करून त्याचा दुरुपयोग करितात. म्हणून असा सिद्धांत प्राप्त होतो कीं, शहाण्या पुरुषानें केव्हाही दिवसा स्त्री–संग करू नये. अर्थातच हा उपदेश प्रासंगिक आहे. व्यवहारांत कसं वागावें, कसें वागू नये, तें श्रुति निषेधरूपानें प्रसंगोपात्त सांगते. असो; आतां ऋतुकाळीं जे शहाणे लोक रात्रीं मार्यागमन करितात, त्याचें तें कर्म ब्रह्मचर्यात्मकच होतें. हा ही उपदेश प्रासंगिक आहे. आणि तो व्यवहारांत कसें वागावें हें सांगतो. आतां या प्रजा कोठून उत्पन्न झाल्या ? या प्रश्नाला उत्तर द्यावयाचें आहे. या मंत्रांत जो भाग सांगितला व जो उपदेश केला तो व्यवहारोपयोगी आहे. मूळप्रश्नाशीं या उपदेशाचा साक्षात् असा कांहीं संबंध नाहीं. मुख्यतः हें सांगावयाचें आहे कीं अहोरात्रात्मक प्रजापति [illegible] व्रीहि, यव, इत्यादि अन्न–स्वरूपानें व्यवस्थित झाला आहे तें कसें तें पुढील मंत्रांत स्पष्ट होईल.॥ १३॥

---

## मंत्र चवदावा.

**अन्नं वै प्रजापतिस्ततो ह वै तद्रेतस्तस्मादिमाः प्रजाः प्रजायन्त इति ॥ १४ ॥**

अन्वय व अर्थ—अन्नं वै प्रजापतिः ( अन्न हा प्रजापतिच आहे. ) ततः वै तत् रेतः (अन्नापासूनच रेताची उत्पत्ति होते.) तस्मात् इमाः प्रजाः प्रजायन्ते इति ( त्या रेतापासून ह्या सर्व प्रजा उत्पन्न होतात. ॥ १४ ॥

एवं क्रमेण परिणम्य तदन्नं वै प्रजापतिः । कथम् । ततस्तस्माद्‌ वै रेतो नृबीजं तत्प्रजाकारणं तस्माद्योषिति सिक्तादिमा मनुष्यादिलक्षणा प्रजाः प्रजायन्ते यत्पृष्टं कुतो ह वै प्रजाः प्रजायन्त इति । तदेवं चन्द्रादित्यमिथुनादिक्रमेणाहोरात्रान्तेनान्नासृग्रेतोद्वारेणेमाः प्रजाः प्रजायन्त इति निर्णीतम् ॥ १४ ॥

सिद्धान्त—याप्रमाणें रयि, प्राण, संवत्सर, मास, अहोरात्र, या क्रमानुसार अन्न हा प्रजापति आहे असा सिद्धांत प्राप्त झाला. कारण अन्नापासून रेत (जीवबीज) उत्पन्न होतें ह्या रेताचें सिंचन स्त्रीगर्भाशयांत झालें म्हणजे त्यापासून मनुष्यत्वादि लक्षण आहे ज्याचें अशा प्रजा म्हणजे जीव उत्पन्न होतात. याप्रमाणें 'प्रजा कोठून उत्पन्न होतात ?' असा कात्यायनकुळोत्पन्न कबंधीचा प्रश्न होता. त्याला उत्तर मिळालें.

शिष्य—म्हणजे चंद्र व आदित्य यांचें मिथुन अन्न व प्राण, दक्षिणायन व उत्तरायण, कृष्णपक्ष व शुक्लपक्ष, रात्र आणि दिवस, या क्रमानें परिणत झालेल्या अन्नापासून उत्पन्न झालेल्या रक्तरेतो-द्वारानें या प्रजा उत्पन्न होतात, असें ठरलें.

सिद्धान्ती—बरोबर आहे. ॥ १४ ॥

---

## मंत्र पंधरावा.

### तद्ये ह वै तत्प्रजापतिव्रतं चरन्ति ते मिथुनमुत्पादयन्ते । तेषामेवैष ब्रह्मलोको येषां तपो ब्रह्मचर्यं येषु सत्यं प्रतिष्ठितम् ॥ १५ ॥

अन्वय व अर्थ—तत् ये ह वै प्रजापतिव्रतं चरन्ति, ते मिथुनं उत्पादयन्ते ( असें आहे म्हणून जे प्रजापतिव्रत जे लोक अनुष्ठितात ते मिथुनाची उत्पत्ति करितात ) तेषां एव एषः ब्रह्मलोकः येषु येषां तपः ब्रह्मचर्यं सत्यं प्रतिष्ठितं ( जे लोक तपाचरण व ब्रह्मचर्य-साधन करितात व ज्यांच्यामध्यें सत्याची एकनिष्ठेनें प्रतिष्ठापना होते, ते लोक मात्र ह्या चंद्रात्मक ब्रह्मलोकाची प्राप्ति करून घेतात. ॥ १५ ॥

तत्तत्रैवं सति ये गृहस्थाः 'ह वै' इति प्रसिद्धस्मरणार्थौ निपातौ । तत्प्रजापतेर्व्रतमृतौ भार्यागमनं चरन्ति कुर्वन्ति तेषां दृष्टफलमिदम् । किम् । ते मिथुनं पुत्रं दुहितरं चोत्पादयन्ते । अदृष्टं च फलमिष्टापूर्तदत्तकारिणां तेषामेवैष यश्चान्द्रमसो ब्रह्मलोकः पितृयाणलक्षणो येषां तपःस्नातकव्रतादीनि ब्रह्मचर्यम् । ऋतावन्यत्र मैथुनासमाचरणं ब्रह्मचर्यम् । येषु च सत्यमनृतवर्जनं प्रतिष्ठितमव्यभिचारितया वर्तते नित्यमेव ॥ १५ ॥

सिद्धान्ती—असा निर्णय आहे म्हणून जे कोणी गृहस्थ प्रजापतिव्रताचें एकनिष्ठेनें अनुष्ठान करितात, व जे ऋतुकाळीं मात्र रात्रीं भार्या-गमन करितात त्यांना मात्र उत्तम फळाची प्राप्ति या लोकीं झालेली स्पष्ट दिसते.

शिष्य—हे गृहस्थ मिथुनाची म्हणजे पुत्र व कन्या यांची उत्पत्ति करितात, हेंच दृष्ट फल आहे कीं काय?

सिद्धान्ती—होय. शिवाय त्यांनीं केलेले इष्टापूर्त व दिलेली दक्षिणा यांपासून अदृष्ट फलाची ( अपूर्वाची, पुण्याची ) उत्पत्तिच होते.

शिष्य—ती कोणती?

सिद्धान्ती—ह्या लोकांना मात्र (वेदांनीं सांगितलेलीं कर्म करणाराला मात्र) चंद्र लोकाची प्राप्ति होते. ब्रह्मलोकाचा चंद्रलोक हा एक भाग आहे. चंद्रलोकास पितृयाण मार्गानें जावें लागतें. मात्र या लोकांनीं स्नातकादिव्रतांचें अनुपालन नीट रीतीनें केलें पाहिजे. त्याचप्रमाणें ब्रह्मचर्यांचेंही नैष्ठिक व्रत चालविलें पाहिजे. ऋतुकालाशिवाय भार्यागमनादि अशास्त्रीय वर्तन न करणें हें गृहस्थाचें ब्रह्मचर्यव्रत होय. आणि शेवटीं त्यांनीं सत्याची कास अव्यभिचारी दृष्टीनें धरिली पाहिजे. साराश, इष्टापूर्त दान, तप, ब्रह्मचर्य आणि सत्यव्रत हे नियम जे लोक एकनिष्ठेनें पाळून प्रजापतिव्रत चालवितात, त्यास मात्र इह लोकीं संतति प्राप्त होऊन परलोकीं चंद्रभुवनात वास्तव्य करावयास सापडतें.

शिष्य—भगवन्, यावरून असें दिसतें कीं श्रुतिप्रणीत विधिप्रतिषेधाचे नियम जे गृहस्थ पाळीत नाहींत, त्यांना कदाचित् पुत्रप्राप्ति होईल. पण हा देह पडल्यावर पापी मनुष्यास ह्या लोकातून चंद्र लोकात सुद्धा जाता यावयाचें नाहीं.

सिद्धान्ती—होय. पण हें ध्यानात ठेव कीं श्रुतीला एकनिष्ठ राहून जे लोक प्रजापतिव्रत चालवितात, ते सकाम कर्मच करितात म्हणून त्यास श्रेष्ठ लोक न मिळता चंद्रलोकाची मात्र प्राप्ति होते. ॥ १५ ॥

---

## मंत्र सोळावा.

**तेषामसौ विरजो ब्रह्मलोको न येषु जिह्ममनृतं न माया चेति ॥ १६ ॥**

इत्यथर्ववेदीयप्रश्नोपनिषदि प्रथमः प्रश्नः ॥ १ ॥

अन्वय व अर्थ—येषु जिह्मं न, अनृतं न, च माया न, तेषां असौ विरजः ब्रह्मलोकः इति (जे लोक कुटिल नाहींत, असत्यभाषी नाहींत, दांभिक किंवा मिथ्याचारी नाहींत, त्यांना तो शुद्ध ब्रह्मलोक मिळतो.)॥१६॥

यस्तु पुनरादित्योपलक्षित उत्तरायणः प्राणात्मभावो विरजः शुद्धो न चन्द्रब्रह्मलोकवद्रजस्वलो वृद्धिक्षयादियुक्तोऽसौ केषां तेषामित्युच्यते । यथा गृहस्थानामनेकविरुद्धसंव्यवहारप्रयोजनत्वाज्जिह्मं कौटिल्यं वक्रभावोऽवश्यंभावि तथा न येषु जिह्मम् । यथा च गृहस्थानां क्रीडानर्मादिनिमित्तमनृतमवर्जनीयं तथा न येषु तत्, तथा माया गृहस्थानामिव न येषु विद्यते । माया नाम बहिरन्यथाऽऽत्मानं प्रकाश्यान्यथैव कार्यं करोति सा माया मिथ्याचाररूपा । मायेत्येवमादयो दोषा येष्वधिकारिषु

ब्रह्मचारिवानप्रस्थभिक्षुषु निमित्ताभावाच्च विद्यन्ते तत्साधनानुरूपेणैव तेषामसौ विरजो ब्रह्मलोक इत्येषा ज्ञानयुक्तकर्मवतां गतिः। पूर्वोक्तस्तु ब्रह्मलोकः केवलकर्मिणां चन्द्रलक्षण इति ॥१६॥

सिद्धान्ती—पण ज्या ब्रह्मलोकाचें लक्षण आदित्यात्मक आहे, उत्तरायण मार्गानें (देवयान मार्गानें) जेथें जातां येतें, जो प्राणात्मक आहे, शुद्ध आहे, चंद्र-ब्रह्मलोकाप्रमाणें रेत-रक्त मिश्रित नाहीं, जेथें चंद्राप्रमाणें वृद्धिक्षयादि कांहीं नाहीं, असा श्रेष्ठ आदित्यात्मक लोक प्राप्त करून घेणारे नर निराळे असतात.

शिष्य---कोणत्या धन्य पुरुषांना [illegible] आदित्य लोक मिळतो ?

सिद्धान्ती—ऐक. ज्या लोकांस कौटिल्यानें वागावें लागत नाहीं ! ज्याचें आचरण ऋजु (सरळ मार्गाचें, अवक्र) असतें.--

शिष्य---भगवन्, संसारांत पडलेल्या गृहस्थांना व्यवहारांत अनेक प्रकारचे विरोधी कारभार करावे लागतात. आणि म्हणून त्यांस कपटाचरण करावें लागतें. पण ज्यांनीं संसारांत उदासीन वृत्तीनें राहण्याचा संकल्प केला, किंवा जे आमरण ब्रह्मचारी राहिले, किंवा ज्यांनीं संन्यासाश्रम स्वीकृत केला, त्यांस कपटाचरण करण्याचें कांहीं एक कारण नाहीं. मला वाटतें श्रुतीला या संसारविरक्त लोकांच्या संबंधानें येथें कांहीं सांगावयाचें आहे.

सिद्धान्ती---बरोबर आहे. तथापि कांहीं ब्रह्मचारी व संन्यासी, तसेंच कांहीं विरक्त म्हणवून घेणारे लोक, कुटिलाचरण करितातच, म्हणून याही लोकांचा येथें निषेध केला आहे. मनुष्य कोणत्याहि आश्रमांत असो, त्याचें आचरण सर्वथा अकुटिल असलें म्हणजे तो श्रेष्ठ लोकाला योग्य होतो. असो; कौटिल्याप्रमाणेंच संसारामध्यें गृहस्थांस क्रीडेमध्यें, प्रेमकथांमध्यें व इतर कांहीं प्रसंगीं असत्य बोलावें लागतें. हा असत्याचाही ज्या लोकांनीं त्याग केला आहे; ते लोक येथें प्रस्तुत आहेत. तसेंच ज्यांच्या अंतःकरणांत मायेचा धारा मिळत नाहीं; ते लोक येथें इष्ट आहेत.

शिष्य---माया म्हणजे ममता कीं काय ?

सिद्धान्ती---नाहीं. बाहेर आपलें स्वरूप निराळें प्रकट करून अंतःकरणांत निराळेंच स्वरूप धारण करणें आणि जें कार्य आपण करितों असा भाव दाखवितों, त्याच्या उलट कार्य करणें ह्या वृत्तीचें नांव माया हें आहे. माया म्हणजे दंभ, माया म्हणजे मिथ्याचार होय. असो, कुटिलाचरण, अनृत भाषण, दांभिकता इत्यादि दोष ज्या अधिकारी लोकांत असत नाहींत--

शिष्य---ब्रह्मचारी, वानप्रस्थ, आणि कुटीचक संन्यासी लोकांस सामान्यतः कपटाचें असत्याचें, किंवा मायेचें कारण नसल्यामुळें ते लोक अधिकारी असतात. असेंच ना ?

सिद्धान्ती—ठीक. या अधिकारी लोकांना मात्र त्यांनीं प्राप्त करून घेत-लेल्या साधनानुसार शुद्ध (मलशून्य) असा आदित्य नामक, हिरण्यगर्भ नामक, लोक मिळतो. उपासना आणि कर्म या दोन्ही साधनांचें एक कालीं अनुष्ठान करणाऱ्या अधिकारी साधकास हा लोक मिळतो. केवळ वैदिक कर्म सकामतः (अज्ञानानें) करणाऱ्या लोकास चंद्रलोक मिळतो, हें मागच्याच मंत्रांत सांगून दिलें आहे. या प्रमाणें प्रजा कशा उत्पन्न होतात या प्रश्नाचें उत्तर पिप्पलादांनीं दिलें. त्याच प्रमाणें केवळ कर्मांचा परिपाक कसा होतो, उपासना युक्त कर्मांचें फळ काय मिळतें हें ही सांगितलें आणि उत्तराची पूर्ति केली. ॥ १६ ॥

अथर्व वेदांतर्गत प्रश्नोपनिषदांतील पहिला प्रश्न समाप्त झाला.

---

## पहिल्या प्रश्नोत्तराचा सारांश.

या सर्व सृष्टीचा उद्भव कोठून होतो, ? या प्रश्नोपनिषदांतील पहिल्या प्रश्नाचा भावार्थ आहे. त्याला उत्तर असें मिळालें आहे कीं, सृष्टीची रचना करण्याची इच्छा धारण करून प्रजापतीनें म्हणजे हिरण्यगर्भानें तप केलें म्हणजे पूर्व सृष्टींतील कार्य–कारणाचा विचार करून असें ठरविलें कीं, त्याच कार्य–कारणाची मालिका घेऊन पुढें विसृष्टि अथवा उत्क्रांति (Evolution)–मार्गानें सृष्टीचा क्रम चालवावयाचा. असा निश्चय करून त्यानें प्रथमतः एक प्राणात्मक मिथुन उत्पन्न केलें. इतर उपनिषदांमध्यें प्रथम तेज उत्पन्न केलें, असें वर्णन आढळतें. ख्रिस्तीधर्म पुस्तकांत तेजापासूनच सृष्टीला आरंभ झाला, असें वर्णन आहे. पण येथें प्रथम मिथुन उत्पन्न केलें असें म्हटलें आहे. प्राण आणि अन्न मिळून हें मिथुन होतें. मिथुनाची उत्पत्ति करणाऱ्या हिरण्यगर्भाख्य प्रजापति ही संज्ञा या पहिल्या प्रश्नोत्तरांत दिली आहे. प्राण आणि अन्न या मिथुनापासून पुढील सर्व सृष्टि उत्पन्न झाली असें येथें सांगितलें आहे. आतां प्राण म्हणजे सामर्थ्य होय. या सामर्थ्यांत तेजाचाही अंतर्भाव होतो. तेव्हां प्राण आणि त्यामध्यें प्राण नष्टावयाचा तें अन्न अथवा (Force) व (Matter) असें जोडपें प्रथम उत्क्रांत झालें. तें प्रजापतीच्या इच्छेनें झालें. पुढें पांच, सहा, सात व आठ या मंत्रानुसार आचार्यांनीं असें विधान केलें आहे कीं यच्चयावत् वस्तुमात्र अन्नरूप आहे व प्राणाचें वसतिस्थान आहे. वस्तुशिवाय प्राण राहणें शक्य नाहीं व प्राणाशिवाय वस्तु असणें शक्य नाहीं, असें आधुनिक पंडितांसही मान्य होणाऱ्या सिद्धांताचें प्रणयन या मंत्रांत आहे. सामान्यत. सूर्य हा प्राणाचा प्रतिनिधि आहे आणि चंद्रमा हा अन्नाचा प्रतिनिधि आहे. जडांस पुष्ट करणारा चंद्रमा आणि जडांच्या अंगीं अनेक प्रकारचे कार्यकारी गुणधर्म उत्पन्न करणारा सूर्य आहे. नंतर नवव्या मंत्रांत संवत्सराला प्रजापतीचें स्थान दिलें आहे. प्रत्येक संवत्सराचे उत्तरायण आणि दक्षिणायन असे दोन भाग होतात. संवत्सररूपी प्रजापति अयनद्वयात्मक

मिथुन उत्पन्न करितो. यालाच दक्षिणायन आणि उत्तरायण असें म्हणतात. तसेंच पुढें मासाला (महिन्याला) प्रजापतित्व आलें आहे. कारण त्यांत शुक्ल आणि कृष्ण असे दोन पक्ष असतात. अहोरात्रीलाही रात्र आणि दिवस या दोन भागांमुळें प्रजापतित्व येतें. याप्रमाणें मिथुन उत्पन्न करणाऱ्या प्रत्येक वस्तूस प्रजापतित्व प्राप्त झालें आहे. फार काय सांगावें! रेत आणि रक्त ज्यापासून उत्पन्न होतें त्या अन्नाला सुद्धां प्रजापति नामक बहुमानाचें उपपद श्रुतीनें देऊन टाकलें आहे!

आतां जो मी एक लहानसा प्रश्न उत्पन्न करीत आहें, त्याचा विचार आचार्यांनीं कसा केला असता हें जरी मला आतां सांगतां येत नाहीं तथापि त्यांच्या पंधराव्या व सोळाव्या मंत्रांत प्रकट झालेल्या विचारसरणीवरून या महापुरुषानें माझ्या अभिप्रायाविरुद्ध निकाल दिला असता, असें मला निश्चयानें वाटतें. असो; पंधराव्या मंत्रांत दोन प्रकारच्या लोकांचें वर्णन आहे, असें मला वाटतें. जे लोक (१) मंत्राच्या पहिल्या अर्धांत अंतर्भूत होतात, व (२) मंत्राच्या दुसऱ्या अर्धांत अंतर्भूत होतात ते हे शुद्ध संसारी आणि वैदिक मार्गानें संसार करणारे होत. पहिले लोक म्हणजे संसारी लोक हे वेदामध्यें काय सांगितलें आहे याचा विचार न करितां केवळ शिश्नोदरपरायणवृत्तीनें मात्र राहतात. त्यांचीं सर्व कर्मे सकाम आणि साभिमान प्रायानीं होत असतात. यांना कदाचित् चंद्रलोक मिळण्याचा संभव आहे. पण केव्हां! ज्यावेळीं हे संसारी लोक आपल्या सकाम वृत्तीचें पोषण होण्यासाठीं वेदाचा आश्रय घेऊन तदनुसार आपलीं नैमित्तिक आणि व्यावहारिक कर्मे करितील तेव्हां यांस चंद्रलोक मिळेल; पण ज्या ज्ञानी जीवांचे ठिकाणीं निष्काम तपश्चर्येचा, ब्रह्मचर्याचा आणि सत्याचा उदय झाला आहे. त्यास तप, ब्रह्मचर्य आणि सत्य यांच्या आश्रयानें—वरील साधु पुरुषांस—ब्रह्मलोकाची प्राप्ति होते. हा ब्रह्मलोक कल्पांतापर्यंत मात्र अमरत्व देतो. आतां सोळाव्या मंत्रांत जेथें व्यवहार समरस होतो, यत्किंचितसुद्धां अनृताचा गंध नसतो आणि जेथून माया समूळ आणि सकारण नाहींशी झालेली असते, त्या पुरुषास विरज (मळशून्य, पापशून्य) असा ब्रह्मलोक मिळतो. याप्रमाणें या दोन मंत्रांत शुद्ध संसारी, वैदिक संसारी आणि ब्रह्मज्ञान करून घेऊं इच्छिणारे मुमुक्षु असे तीन प्रकारचे लोक अभिप्रेत आहेत असें मला वाटतें. तात्पर्य जीव वेदज्ञानी असो वा नसो त्यानें वेदविहित कर्म सकाम वृत्तीनें केलें म्हणजे मरणानंतर त्याची चंद्रलोकामध्यें पाठवणी होते. आपलें नित्य नैमित्तिक कर्म निष्काम वृत्तीनें केलें तर आपली रवानगी सूर्य लोकांत होऊन आपली नेमणूक प्रलयकालापर्यंत कायम असते आणि शेवटीं आपण व्यक्तिविषयक अथवा विश्वविषयक कपटाचरणाचा, अनृत भाषणाचा आणि असत्य ज्ञानाचा सर्वस्वी प्रतीकार केला तर आपल्याला श्रुतिश्रवणानें केवळ ब्रह्माचें उत्तम ज्ञान

होऊन आपण निर्मळ ब्रह्मलोकास ( मोक्षास ) जावों. असो; प्रजा कोठून उत्पन्न झाल्या ? या प्रश्नाचें उत्तर इतकेंच आहे कीं, प्रजापतीनें ही मिथुन सृष्टि उत्पन्न केली. हेंच काम पुढें काल म्हणजे प्राण व अन्न म्हणजे रयि यांनीं चालविलें आहे. प्रजापतीनें ही सृष्टि केव्हां उत्पन्न केली, असा प्रश्नच विचारला नाहीं. म्हणून त्या कालाचा निर्देश येथें केला नाहीं. तथापि असा निश्चय करण्यांस हरकत नाहीं कीं, सृष्टि ही कालदृष्टीनें अनादि आहे. तिची उत्पत्ति, उत्क्रांति म्हणजे सृष्टीचा आविर्भाव ( प्रकटन ) आणि तिचा प्रलय म्हणजे तिरोभवन ( अपक्रांति ) या अवस्था होत. देवानें ही सृष्टि कां उत्पन्न केली याला इतकेंच उत्तर आहे कीं जीवानीं पूर्वजन्मीं जीं जीं काय बरी वाईट कर्मे केलीं असतील, त्यांचें अनुकूल व प्रतिकूल फल प्रत्येक जीवास मिळावें, एतदर्थ ही सृष्टिविरचना आहे.

पहिला प्रश्न समाप्त.

---

## अथ द्वितीयः प्रश्नः

प्राणोऽत्ता प्रजापतिरित्युक्तम् । तस्य प्रजापतित्वमत्तृत्वं चास्मिञ्छरीरेऽवधारयितव्यमित्ययं प्रश्न आरभ्यते—

सिद्धान्ती—प्राण हा अत्ता ( उपभोक्ता ) म्हणजे प्रजापति आहे, हें सांगितलें. आतां त्याचें अत्तृत्व ( अन्नाचा उपभोग घेण्याचें सामर्थ्य ) म्हणजे प्रजापतित्व आपल्या या पाञ्चभौतिक शरीरांत कसें समजून घ्यावयाचें, कसें निश्चित करावयाचें, हें मनांत आणून पुढील प्रश्न उद्भूत केला आहे—

### मंत्र पहिला.

**अथ हैनं भार्गवो वैदर्भिः पप्रच्छ । भगवन्कत्येव देवाः प्रजां विधारयन्ते कतर एतत्प्रकाशयन्ते कः पुनरेषां वरिष्ठ इति ॥ १ ॥**

अन्वय व अर्थ—अथ ह एनं भार्गवः वैदर्भिः पप्रच्छ ( नंतर पिप्पलादाचार्यांस भृगुकुलोत्पन्न वैदर्भीनें विचारिलें ) भगवन्! कति एव देवाः प्रजां विधारयन्ते, कतरे एतत् प्रकाशयन्ते, कः पुनः एषां वरिष्ठः इति ( आचार्य महाराज ! कोणते देव प्रजेचें—शरीर आहे लक्षण जीचें अशा प्रजेचें—धारण करितात, कोणते देव या शरीरात्मक प्रजेला प्रकाशित करितात आणि या सर्व देवांमध्यें—श्रेष्ठ कोण आहे ?)

सारांश, शरीराचें धारण कोणते देव करितात? त्याचा प्रकाशित कोणते देव करितात? आणि ह्यापैकी श्रेष्ठ कोण? असे तीन प्रश्न येथें विचारिले आहेत ॥ १ ॥

*अथानन्तरं ह किलैनं भार्गवो वैदर्भिः पप्रच्छ । हे भगवन्नस्मिन्कल्येव देवाः प्रजां शरीरलक्षणां विधारयन्ते विशेषेण धारयन्ते । कतरे बुद्धीन्द्रियकर्मेन्द्रियविभक्तानामेतत्प्रकाशनं स्वमाहात्म्यप्रख्यापनं प्रकाशयन्ते । कोऽसौ पुनरेषां वरिष्ठः प्रधानः कार्यकरणलक्षणानामिति ॥ १ ॥*

सिद्धान्ती—विरक्त लोकांचें चित्तैकाग्र्य झालें तरच आत्मज्ञानाची सिद्धि होईल. यांसाठीं, तसेंच मंद लोकांस विशेष फलाच्या प्राप्तीसाठीं व प्राणोपासनेसाठीं या दोन प्रश्नांचा अवतार आहे. त्यातल्या त्यात श्रेष्ठत्व, अमृतत्व, प्रजापतित्व इत्यादि गुणाचा निश्चय करण्यासाठीं दुसरा प्रश्न आहे आणि तिसरा प्रश्न उत्पत्तीचा निश्चय करून प्राणोपासना सिद्ध व्हावी यासाठीं केला आहे. असो, कबंधीच्या प्रश्नाचें उत्तर पिप्पलाद आचार्यांनी सांगितल्यावर भृगुकुलोत्पन्न वैदर्भीनें प्रश्नत्रयात्मक पृच्छा केली आहे. तो म्हणाला-' भगवन्, प्रजा म्हणजे शरीर, याचें धारण कोणते देव करीत असतात, कोणत्या देवाच्या सामर्थ्यानें शरीराचे निरनिराळे अवयव एकत्र राहतात.

शिष्य—हा वैदर्भीचा पहिला प्रश्न आहे.

सिद्धान्ती—याचा दुसरा प्रश्न असा आहे कीं, बुद्धींद्रियें आणि कर्मेंद्रियें यांस आपापलें कार्य करण्यास, आपापलें माहात्म्य प्रकट करण्यास, कोणते देव सामर्थ्य देतात?

शिष्य—म्हणजे आमचीं नेत्र-कर्णादि ज्ञानेंद्रियें विषय ग्रहण करण्यास समर्थ होतात आणि हस्तपादादि कर्मेंद्रियें कर्म करण्यास समर्थ होतात, तीं कोणत्या देवाच्या प्रभावानें-स्वकार्य करण्यास-समर्थ होतात, हा दुसरा प्रश्न झाला. आणि या सर्व देवामध्यें कोणता देव श्रेष्ठ आहे हा त्याचा तिसरा प्रश्न आहे.

सिद्धान्ती—बरोबर आहे. पण हें ध्यानांत ठेव कीं, शरीर धारण करणारे देव हे कार्यरूपी आहेत; आणि इंद्रियांस स्वकार्य करण्याचें सामर्थ्य देणारे देव करणरूपी आहेत.

शिष्य—करण म्हणजे काय?

सिद्धान्ती—कुंभारानें घट तयार केला म्हणजे घट हें कार्य होतें. ज्या चक्रावर मातीचा गोळा फिरवून घट तयार होतो; तें चक्र घटरूप कार्याचें करण असतें. कुंभार हें निमित्तकारण आणि मृत्तिका हें घटाचें उपादानकारण आहे. याप्रमाणें कार्य, करण, आणि कारण यांचा विचार आहे ॥ १ ॥

---

### मंत्र दुसरा

**तस्मै स होवाचाऽऽकाशो ह वा एष देवो वायुरग्निरापः पृथिवी वाङ्मनश्चक्षुः श्रोत्रं च । ते प्रकाश्याभिवदन्ति वयमेतद्बाणमवष्टभ्य विधारयामः ॥ २ ॥**

अन्वय व अर्थ—तस्मै स ह उवाच ( त्याला पिप्पलादाचार्यांनीं उत्तर दिलें. ) आकाशः ह वै एषः देवः, वायुः, अग्निः, आपः, पृथिवी, वाक् मनः चक्षुः श्रोत्रं च ( आकाश हा देव आहे. तसेंच वायु, अग्नि, जल, पृथ्वी, हे देव आहेत व वाणी, मन, नेत्र, कर्ण, हे देव आहेत. ) ते प्रकाश्य ' वयं एतत् बाणं विधारयामः ' अभिवदन्ति ( हे सर्व देव आपापलें माहात्म्य प्रकट करितात. आणि त्यापैकीं प्रत्येकजण अभिमानानें असें म्हणतो कीं, मी मात्र या शरीरातील सर्व भागास एकत्र करून त्याचें धारण करितों. )

साराश, शरीराचा प्रत्येक अवयव असें म्हणतो कीं ' मी या शरीराचे निरनिराळे भाग एकत्र करून यांचें धारण करितों. शरीराचा आधार मी आहें; असें प्रत्येकाचें म्हणणें आहे ॥ २ ॥

एवं पृष्टवते तस्मै स होवाच । आकाशो ह वा एष देवो वायुरग्निरापः पृथिवीत्येतानि पञ्च महाभूतानि शरीरारम्भकाणि वाङ्मनश्चक्षुःश्रोत्रमित्यादीनि कर्मेन्द्रियबुद्धीन्द्रियाणि ते कार्यलक्षणाः करणलक्षणाश्च ते देवा आत्मनो माहात्म्यं प्रकाश्याभिवदन्ति स्पर्धमाना अहंश्रेष्ठतायै । कथं वदन्ति । वयमेतद्बाणं कार्यकरणसंघातमवष्टभ्य प्रासादमिव स्तम्भादयोऽविशिथिलीकृत्य विधारयामो विस्पष्टं धारयामः । मयैवैकेनायं संघातो ध्रियत इत्येकैकस्याभिप्रायः ॥ २ ॥

सिद्धान्ती—हा प्रश्न ऐकून पिप्पलादगुरूंनीं उत्तर दिलें तें ऐक,—आकाश, वायु, अग्नि, जल, आणि पृथ्वी हीं पंचमहाभूतें शरीराची उत्पत्ति करणारीं आरंभक द्रव्यें कल्पिलीं आहेत. तेव्हां या पंचमहाभूतांच्या अभिमानी देवता एक प्रकारच्या आहेत. म्हणजे कार्य-लक्षण आहेत. तसेंच वाणीप्रमुख कर्मेंद्रियें मन, आणि नेत्रादि ज्ञानेंद्रियें अथवा या सर्व ज्ञानकर्मेंद्रियांच्या अभिमानी देवता या दुसऱ्या प्रकारच्या देवता आहेत. या करणलक्षणात्मक आहेत. यांतील प्रत्येक देवता असें म्हणू लागली—

शिष्य—भगवन्, आकाशादि पंचमहाभूतें, वाणीप्रमुख कर्मेंद्रियें आणि नेत्रादि ज्ञानेंद्रियें हीं तर जड आहेत. आकाशादि पंचमहाभूतें, शरीराकार होतात. शरीराचीं हीं घटक द्रव्यें आहेत. आणि नेत्रादि ज्ञानेंद्रियें हीं तर ज्ञान-साधनें आहेत. तेव्हां [redacted] नोंदू कशीं आगळी ?

सिद्धान्ती—श्रुतीनें या सर्वांस ' देव ' हें उपपद देऊन या सर्वांच्या अभिमानी देवतांचें ग्रहण केलें आहे, असें जें आम्ही सांगितलें तें तूं विसरलास. असो, या सर्व देवता आपापलें एकदेशी ( अंशतः शरीरधारणादि ) स्वकार्य प्रकट करून म्हणूं लागल्या कीं सर्व शरीराचें धारण आम्ही एकएकट्या करण्यास समर्थ आहों. इतकेंच नव्हे; पण प्रत्येक देवतेला असा अभिमान होता कीं या सर्व देवतांत मी श्रेष्ठ आहें.

शिष्य—मंत्रांतील ' बाण ' पदाचा काय अर्थ आहे ?

सिद्धान्ती—बाण म्हणजे शरीर. तुला ठाऊकच आहे कीं, हें आपलें शरीर आकाशादिकांच्या कार्यांनीं व नेत्रादि करणांनीं संघटित झालें आहे. पंचमहाभूतें आणि इंद्रियें मिळून या शरीराचा संघात उत्पन्न होतो. सारांश, बाण म्हणजे शरीर होय. एखाद्या मंदिराला स्तंभ, भित्ति ( भिंती ) इत्यादि अवयव असतात आणि ते शिल्पकाराच्या कौशल्यानें एकत्र राहून प्रासादाचें (इमारतीचें) धारण करितात, त्यास पडूं देत नाहींत, त्याप्रमाणें शरीराचें विधारण अथवा निश्चित धारण करण्याचें सामर्थ्य मला एकट्याला आहे; असें प्रत्येक इंद्रिय म्हणूं लागलें. तात्पर्य सर्वांत मी श्रेष्ठ आहें आणि शरीर एकत्र ठेवून तें धारण करण्याचें सामर्थ्य मला एकट्याला आहे असें म्हणून आपलें वरिष्ठत्व स्थापण्याचा प्रयत्न प्रत्येक देवतेनें केला ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**तान्वरिष्ठः प्राण उवाच । मा मोहमापद्यथाऽहमेवैतत्पञ्चधाऽऽत्मानं प्रविभज्यैतद्बाणमवष्टभ्य विधारयामीति तेऽश्रद्दधाना बभूवुः ॥ ३ ॥**

अन्वय व अर्थ—वरिष्ठः प्राणः तान् उवाच ( सर्वश्रेष्ठ प्राण त्यांस म्हणाला. ) मा मोहं आपद्यथ ( तुम्ही मोहांत शिरूं नका. ) अहं एव एतत् बाणं अवष्टभ्य, पंचधा आत्मानं प्रविभज्य एतत् विधारयामि इति (या शरीराचें अवष्टंभन करून-इकडे तिकडे जाऊं न देतां एकत्र करून-मी याचें विधारण करितों. मी आपल्या स्वतःचे पांच विभाग करितों,

आणि शरीराचें धारण करितों. ) ते अश्रद्दधानाः बभूवुः ( या प्राणाच्या बोलण्यावर कोणाचीही श्रद्धा बसली नाहीं. ) ॥ ३ ॥

तानेवमभिमानवतो वरिष्ठो मुख्यः प्राण उवाचोक्तवान् । मा मैवं मोहमापद्यथाविवेकतयाऽभिमानं मा कुरुत यस्मादहमेवैतद्बाणमवष्टभ्य विधारयामि पञ्चधाऽऽत्मानं प्रविभज्य प्राणादिवृत्तिभेदं स्वस्य कृत्वा विधारयामीत्युक्तवति च तस्मिंस्तेऽश्रद्दधाना अप्रत्ययवन्तो बभूवुः कथमेतदेवमिति ॥ ३ ॥

सिद्धान्ती—याप्रमाणें प्रत्येक इंद्रिय व प्रत्येक अवयव अभिमानानें बोलत होता. तेव्हां सर्व-श्रेष्ठ प्राण त्यांस म्हणाला–इंद्रियांनो! असा मोह व अविवेकजन्य अभिमान धारण करून शास्त्रास व अनुभवास अमान्य अशा अप्रामाणिक कल्पना करूं नका व भलभलत्या अभिमानाला पडूं नका. कारण या शरीराचें अवष्टंभन करून त्याचें धारण करण्यास मी एकटा मात्र समर्थ आहें. हें माझें सामर्थ्य आहे. मी आपल्या स्वतःस पांच जागीं विभागून पंचप्राण होतों. आणि तुम्हां सगळ्यांस एकत्र ठेवून तुमचें धारण करितों. हें प्राणाचें बोलणें कोणत्याही इंद्रियांस अथवा अवयवास संमत झालें नाहीं. प्राणाच्या बोलण्यावर त्यांची श्रद्धा बसली नाहीं. हें असें कसें होईल हें त्यांस समजेना ॥ ३ ॥

---

मंत्र चवथा.

सोऽभिमानादूर्ध्वमुत्क्रमत इव तस्मिन्नुत्क्रामत्यथेतरे सर्व एवोत्क्रामन्ते तस्मिंश्च प्रतिष्ठमाने सर्व एव प्रातिष्ठन्ते । तद्यथा मक्षिका मधुकरराजानमुत्क्रामन्तं सर्वा एवोत्क्रामन्ते तस्मिंश्च प्रतिष्ठमाने सर्वा एव प्रातिष्ठन्त एवं वाङ्मनश्चक्षुः श्रोत्रं च ते प्रीताः प्राणं स्तुन्वन्ति ॥ ४ ॥

अन्वय व अर्थ—सः अभिमानात् ऊर्ध्वं उत्क्रमते इव ( अभिमानानें प्राण ऊर्ध्व दिशेला जाण्याचें मिष करिता झाला. ) अथ तस्मिन् उत्क्रामति इतरे सर्वे एव उत्क्रामन्ते, तस्मिन् च प्रतिष्ठमाने सर्वे एव प्रातिष्ठंते ( याप्रमाणें प्राणानें चलबिचल केल्याबरोबर शारीरिक धातूंची व इंद्रियावयवांची चलबिचल झाली आणि तो प्राण स्तब्ध ( स्थिर ) झाल्याबरोबर बाकीच्यांसही स्तब्धता ( स्थिरता ) प्राप्त झाली. ) तत् यथा मक्षिकाः

( त्याप्रमाणें मधमाशांची स्थिति होते. ) मधुकरराजानं उत्क्रामन्तं सर्वाः एव उत्क्रामन्ते तस्मिन् च प्रतिष्ठमाने सर्वाः एव प्रातिष्ठंते ( मधुकरांचा राजा चालू लागला म्हणजे त्याच्या मागून सर्व मधमाशा जाऊं लागतात किंवा तो बसला म्हणजे सर्व मधमाशा त्याच्या सभोंवतीं बसतात. ) एवं वाङ्मनश्चक्षुः श्रोत्रं च ( याप्रमाणें वाणी, मन, नेत्र, आणि कर्ण यांची स्थिति झाली. ) ते प्रीताः प्राणं स्तुन्वन्ति ( प्रसन्न होऊन ते सर्वजण प्राणाची स्तुति करिते झाले. )

सारांश, प्राणाच्या गमनागमनावर आपलें गमनागमन अवलंबून आहे; असें कळल्यावर इंद्रियावयवांचा अभिमान नष्ट झाला. आणि ते त्याची स्तुति करूं लागले. ॥ ४ ॥

स च प्राणस्तेषामश्रद्दधानतामालक्ष्याभिमानादूर्ध्वमुत्क्रमत इवे-दमुत्क्रान्तवानिव सरोषा(षा ?)न्निरपेक्षस्तस्मिन्नुत्क्रामति यद्वृत्तं तद्दृष्टान्तेन प्रत्यक्षीकरोति । तस्मिन्नुत्क्रामति सत्यथानन्तरमेवे-तरे सर्व एव प्राणाश्चक्षुरादय उत्क्रामन्त उच्चक्रमिरे । तस्मिंश्च प्राणे प्रतिष्ठमाने तूष्णीं भवत्यनुत्क्रामति सति सर्व एव प्राति-ष्ठन्ते तूष्णीं व्यवस्थिता अभूवन् । तत्र यथा लोके मक्षिका मधुकराः स्वराजानं मधुकरराजानमुत्क्रामन्तं प्रति सर्वा एवो-त्क्रामन्ते तस्मिंश्च प्रतिष्ठमाने सर्वा एव प्रातिष्ठन्ते प्रतितिष्ठन्ति । यथाऽयं दृष्टान्त एवं वाङ्मनश्चक्षुः श्रोत्रं चेत्यादयस्त उत्सृज्याश्रद्-धानतां बुद्ध्वा प्राणमाहात्म्यं प्रीताः प्राणं स्तुन्वन्ति स्तुवन्ति ॥ ४ ॥

सिद्धान्ती—आपल्या बोलण्यावर इंद्रियादिकांची श्रद्धा नाहीं, असें पाहून योग्य अभिमान असणाऱ्या प्राणानें त्यास आपलें माहात्म्य दाखविण्याचा संकल्प केला. त्यानें आपल्यास राग आला असें दाखवून त्वरेनें आपण बाहेर जातों असें दाखविलें. तुला ठाऊक असूं दे कीं, शरीर धारण करण्यास किंवा सोडण्यास इंद्रियांच्या अपेक्षेनें प्राणाला पूर्ण स्वातंत्र्य आहे. तो बाहेर जाऊं लागल्याबरोबर बाकीच्या सर्व नेत्रादिकांचे ठायीं असलेल्या प्राणास बाहेर जावें लागलें आणि मुख्य प्राण स्थिर झाल्याबरोबर बाकीचे प्राणही स्थिर झाले.

शिष्य—यावरून मला असें दिसतें कीं इंद्रियांवर मुख्य प्राणाची सत्ता आहे आणि मुख्य प्राण स्वतंत्रतेनें जें जें करितो तें तें इंद्रियास करावें लागतें. तथापि मला जर एखादा दृष्टांत सांगून ही गोष्ट स्पष्ट कराल तर ठीक होईल.

सिद्धान्ती—प्रत्यक्ष श्रुतीनेंच दृष्टांत दिला आहे तो तुला स्पष्ट करून सांगतों. बाकी इंद्रियास ' मुख्य प्राण हाच वरिष्ठ आहे ' असें प्रत्यक्ष अनु-

भवावरून कळलेंच होतें. असो, तूं मधमाशा पाहिल्याच असतील. त्या काय करितात बरें ? त्यांचा मधुकरराजा बाहेर निघाला कीं त्या राजनिष्ठ मधमाशा तो जिकडे जाईल तिकडे जातात आणि तो विश्रांति घेत राहिला म्हणजे आपणही विश्रांति घेत त्याच्याजवळ बसतात. याप्रमाणें वाणी, मन, नेत्र आणि कर्ण इत्यादिकांची स्थिति झाली. तेव्हां त्यांस मुख्य प्राणाचें माहात्म्य कळलें. 'आपण प्राणाच्या स्वाधीन आहों' असें कळून त्यांची अश्रद्धा नाहींशी झाली. त्यांस आपलें परतंत्रत्व कळलें आणि ह्याप्रमाणें निश्चय झाल्यावर पूज्य श्रुतीनें प्रसन्न होऊन त्यांनी मुख्य प्राणाचें स्तवन करण्यास आरंभ केला ॥ ४ ॥

---

कथं—

शिष्य—तो कसा ?

सिद्धान्ती—येथपासून या प्रकरणाच्या शेवटपर्यंत श्रुतीनें प्राणस्तोत्र गायिलें आहे तें ऐक—

## मंत्र पांचवा.

**एषोऽग्निस्तपत्येष सूर्य एष पर्जन्यो मघवानेष**
**वायुरेष पृथिवी रयिर्देवः सदसच्चामृतं च यत् ॥ ५ ॥**

अन्वय व अर्थ—एषः अग्निः तपति, एषः सूर्यः, एषः पर्जन्यः, एषः मघवान्, एषः वायुः,एषः पृथिवी रयिः देवः, (रयिर्देवः!) यत् सत् असत् च अमृतं (हा प्राण अग्नि होऊन दहन-कर्म करितो, सूर्य होऊन प्रकाशतो, पर्जन्य होऊन वृष्टि करितो, इंद्र होऊन पालन करितो, वायु होऊन स्वच्छता आणितो, [illegible] पृथ्वी आहे, रयि आहे, सर्व जगताचा देव आहे, ( किंवा रयिर्देव म्हणजे चंद्र आहे ! ) हाच मूर्त वस्तु आहे, अमूर्त वस्तुही हाच व जें काय अमृत आहे, तोही मुख्य प्राणच आहे. )

सारांश, येथें प्राणाचें सामर्थ्य आणि सर्वव्यापित्व सांगितलें आहे ॥ ५ ॥

एष प्राणोऽग्निः संस्तपति ज्वलति । तथैष सूर्यः सन्प्रकाशते । तथैष पर्जन्यः सन्वर्षति । किंच मघवानिन्द्रः सन्प्रजाः पालयति जिघांसत्यसुररक्षांसि । एष वायुरावहप्रवहादिभेदः । किं चैष पृथिवी रयिर्देवः सर्वस्य जगतः सन्मूर्तमसदमूर्तं चामृतं च यद्देवानां स्थितिकारणं किं बहुना ॥ ५ ॥

सिद्धान्ती—हा प्राण अग्नि होऊन ज्वाला उत्पन्न करितो, सूर्यरूपानें प्रकाश देतो, पर्जन्यरूपानें वृष्टि करितो, इंद्र होऊन प्रजापालन आणि राक्षस-विनाश करितो, वायुस्वरूपानें मेघास आणि तारकांस वाहून नेतो. याचेच आवह प्रवहादि भेद आहेत.

शिष्य—आवह प्रवह म्हणजे काय ?

सिद्धान्ती—वायूचे सात भेद आहेत. त्यांतील आवह हा भुवर्लोकांतील ( अंतरिक्षांतील ) वायु असून तो मेघास वाहून नेतो. प्रवह हा एक वायूचाच भेद असून तो ग्रह तारकांचे व्यापार नियमित करितो. असो; मुख्य प्राण हा पृथ्वी आहे, रयि, चंद्र, (किंवा चन्द्र) सर्व जगताचा आधार व पोषक आहे. तोच मूर्तामूर्त वस्तु आहे. आणि तोच अमृत म्हणजे देवास जिवंत ठेवणारें साधन आहे. फार काय सांगावें, सर्व कांहीं तो आहे. ॥ ५ ॥

---

## मंत्र सहावा.

### अरा इव रथनाभौ प्राणे सर्वं प्रतिष्ठितम् ।
### ऋचो यजूंषि सामानि यज्ञः क्षत्रं ब्रह्म च ॥ ६ ॥

अन्वय व अर्थः—रथनाभौ अराः इव प्राणे सर्वं प्रतिष्ठितं ( गाडीच्या तुंब्यामध्यें सर्व अरा येऊन मिळतात त्याप्रमाणें प्राणाचे ठिकाणीं यच्चयावत वस्तूस आधार मिळतो. ) ऋचः यजूंषि, सामानि यज्ञः क्षत्रं ब्रह्म च ( ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, यज्ञ, क्षत्रिय आणि ब्राह्मण हे सर्व प्राणाच्या आधारानें राहतात ) ॥ ६ ॥

अरा इव रथनाभौ श्रद्धादि नामान्तं सर्वं स्थितिकाले प्राण एव प्रतिष्ठितम् । तथर्चो यजूंषि सामानीति त्रिविधा मन्त्रास्तत्साध्यश्च यज्ञः क्षत्रं च सर्वस्य पालयितृ ब्रह्म च यज्ञादि-कर्मकर्तृत्वेऽधिकृतं चैतेष प्राणः सर्वम् ॥ ६ ॥

सिद्धान्ती—ज्याप्रमाणें रथाला असणाऱ्या चक्राच्या नाभीमध्यें सर्व अरा समर्पित होतात, त्याप्रमाणें श्रद्धादि नामपर्यंत ( श्रद्धेला आरंभ करून नामा-पर्यंत येणाऱ्या सर्व गोष्टी. पहा प्रश्नोपनिषत् प्रश्न ६ मन्त्र ४ ) असणाऱ्या सर्व वस्तु स्थिति-काळात प्राणाच्या मात्र आधारानें राहतात. त्याचप्रमाणें ऋक्, यजु, साम इत्यादि तीन प्रकारचे मंत्र, त्यांनीं साध्य होणारे यज्ञ, सर्वांचें पालन करणारे क्षत्रिय आणि यज्ञादि कर्में करण्याचा अधिकार ज्यास आहे, ते ब्राह्मण या सर्वांचा अंतर्भाव मुख्य प्राणामध्यें मात्र होतो. ॥ ६ ॥

---

किंच—

सिद्धान्ती—आणखी,

## मंत्र सातवा.

**प्रजापतिश्चरसि गर्भे त्वमेव प्रतिजायसे। तुभ्यं प्राण प्रजास्त्विमा बलिं हरन्ति यः प्राणैः प्रतितिष्ठसि ७**

अन्वय व अर्थ—प्रजापतिः गर्भे चरसि, त्वं एव प्रतिजायसे, प्राण तुभ्यं इमाः प्रजाः बलिं हरन्ति; प्राणैः यः प्रतितिष्ठसि ( हे प्राण ! तूं प्रजापति असूनही गर्भामध्यें राहतोस आणि मातापित्यांचा प्रतिनिधि असतांही पुनः उत्पन्न होतोस. ह्या सर्व प्रजा तुला करभार अर्पण करितात. तूंच इतर प्राणांसह सर्व शरीर व्यापून राहतोस) ॥ ७ ॥

यः प्रजापतिरपि स त्वमेव गर्भे चरसि पितुर्मातुश्च प्रतिरूपः सन्प्रतिजायसे प्रजापतित्वादेव प्रागेव सिद्धं तव मातृपितृत्वं सर्वदेहदेह्याकृतिच्छन्नेकः प्राणः सर्वात्माऽसीत्यर्थः । तुभ्यं त्वदर्थं या इमा मनुष्याद्याः प्रजास्तु हे प्राण चक्षुरादिद्वारैर्बलिं हरन्ति । यस्त्वं प्राणैश्चक्षुरादिभिः सह प्रतितिष्ठसि सर्वशरीरेष्वतस्तुभ्यं बलिं हरन्तीति युक्तम् । भोक्ता हि यतस्त्वं तवैवान्यत्सर्वं भोज्यम् ॥ ७ ॥

सिद्धान्ती—हे प्राण देवा ! तूं प्रजापति (मातृपितृत्वाचा प्रतिनिधि) असूनही गर्भामध्यें वास्तव्य करून पुनः पुनः उत्पन्न होतोस.

शिष्य—येथें प्रजापति म्हणजे विराट्स्वरूप आहे.

सिद्धान्ती—होय, हा विराट्स्वरूपी हिरण्यगर्भ तूं पित्याच्या गर्भामध्यें रेतरूपानें आणि मातेच्या गर्भामध्यें पुत्ररूपानें कांहीं दिवस वास्तव्य करून पुढें त्यांच्या सारखेंच स्वरूप धारण करतोस आणि पुनः पुनः उत्पन्न होतोस. तुझें सर्वमातृत्व आणि सर्व-पितृत्व पूर्वींच सिद्ध झालें असतांही व तूं एकच स्वरूप असतांही शरीर आणि शरीरी अशीं सोंगें घेऊन या विश्वभर व्यापार करीत राहतोस, म्हणून तूं सर्वात्मा आहेस. तुझ्यासाठीं मनुष्यादि सर्व प्रजा नेत्र कर्णादिद्वारानीं तुला बलि अर्पण करितात.

शिष्य—सर्व प्रजाजन मुख्यप्राणाची सेवा करितात असें तात्पर्य आहेसें वाटतें.

सिद्धान्ती—होय. नेत्रादि इंद्रियांसह सर्व शरीर व्यापून राहणारा जो प्राण त्या तुला सर्व प्रजा करभार देतात हें योग्यच आहे. ज्याअर्थीं तूं सर्वभोक्ता

आहेस त्याअर्थी सर्व भोज्य पदार्थ तुला प्राप्त व्हावे, हें योग्यच आहे. सारांश तूं सर्वश्रेष्ठ आहेस. ॥ ७ ॥

---

किंच—

सिद्धान्ती—आणखी—

### मंत्र आठवा.

देवानामसि वह्नितमः पितॄणां प्रथमा स्वधा।
ऋषीणां चरितं सत्यमथर्वाङ्गिरसामसि ॥ ८ ॥

अन्वय व अर्थः—देवानां वह्नितमः असि, पितॄणां प्रथमा स्वधा, ऋषीणां अथर्वांगिरसां सत्यं चरितं असि, ( तूं सर्व देवांचा सर्वश्रेष्ठ हविर्वाहक–हवि वाहून नेणारा आहेस. पितरांचें जें नांदीप्रमुख श्राद्ध करितात त्यांतील पहिली स्वधा तूं आहेस. तसेंच चक्षुरादि प्राणांचें व आंगिरस अथर्वणांचें सत्य चारित्र तूं आहेस ) ॥ ८ ॥

देवानामिन्द्रादीनामसि भवसि त्वं वह्नितमो हविषां प्रापयितृतमः। पितॄणां नान्दीमुखे श्राद्धे या पितृभ्यो दीयते स्वधाऽन्नं सा देवप्रधानमपेक्ष्य प्रथमा भवति। तस्या अपि पितृभ्यः प्रापयिता त्वमेवेत्यर्थः किंचर्षीणां चक्षुरादीनां प्राणानामाङ्गिरसामङ्गिरसभूतानामथर्वणां तेषामेव 'प्राणो वाऽथर्वा' इति श्रुतेः। चरितं चेष्टितं सत्यमवितथं देहधारणाद्युपकारलक्षणं त्वमेवासि ॥८॥

सिद्धान्ती—इतर प्राण म्हणतात, हे मुख्य प्राण! तू इंद्रादि सर्व देवतांस हविर्भाग पोंहचविणारे जे अग्निप्रमुख देव आहेत, त्यांपेक्षां सर्व-श्रेष्ठ वाहक तूंच आहेस.

शिष्य—देवांचे हविर्भाग नेण्याचें काम वन्हीकडे आहेना ?

सिद्धान्ती—होय. हविर्भाग वाहतो म्हणून अग्नीला वह्नि असें नांव आहे. येथें वह्नितम म्हणजे श्रेष्ठ अग्नि होय. 'हे मुख्य प्राण—' सर्वप्राण म्हणतात: यज्ञादि कर्मांत नांदीमुख श्राद्ध करावें असा विधि आहे. यांत पितरांना स्वधा म्हणून अन्न-संतर्पण करितात. त्यांतील पहिली स्वधा तूं आहेस.

शिष्य—देवांसच यज्ञ-कर्मांत हविर्भाग देतात ना ?

सिद्धान्ती—हें खरें; पण प्रथमतः नांदीश्राद्ध करून पितरांस तृप्त करितात. प्राण म्हणतात: त्या पितरांचे हविर्भाग पोंहचविणारा तूंच आहेस. तसेंच चक्षुरादिकांचा—

शिष्य—मंत्रांत ऋषि हा शब्द आहे.

सिद्धान्ती—ऋष, जाणें, या धातूपासून ऋषि हा शब्द झाला. जाणें याचाच अर्थ जाणणें असा होतो. म्हणून ऋषि या शब्दाचा अर्थ ज्ञानाची उत्पत्ति करणारीं चक्षुरादि इंद्रियें व प्राण असा झाला. आतां मुख्य प्राणाच्या अभावीं इंद्रियें व इतर प्राण ( हे अंग म्हणजे अवयव आहेत. अंगी मुख्य प्राण आहे. ) शुष्क होऊन जातात, म्हणून त्यांस अंगिरस असें म्हणतात.

शिष्य—मंत्रांतील अथर्व शब्दाचा अर्थ काय ?

सिद्धान्ती—'प्राण हाच अथर्व आहे' अशी श्रुति आहे. आतां मुख्य प्राण जरी अथर्व आहे, तथापि इतर प्राण मुख्य प्राणाचे अंश असतात म्हणून त्यांस ही अथर्व म्हटलें. तेव्हां तात्पर्य असें कीं, देवांचे हविर्भाग ( स्वाहा ) वाहणारा, पितरांचे हविर्भाग नेणारा (स्वधा) मुख्य प्राण आहे. आणि मुख्य प्राणाचे अंश असणारे व मुख्य प्राणाच्या अस्तित्वानें मात्र जिवंत राहणारे चक्षुरादिप्राण त्यांचे सर्व सत्यव्यापार मुख्य प्राणच आहे.

शिष्य—इतर प्राणांच्या द्वारानें देहादिकांचें धारण मुख्य प्राणांच्या आज्ञेनुसार होतें.

सिद्धान्ती—ठीक आहे. हे देहधारणादि देहावर उपकार करण्याचे व्यापार मुख्य प्राणच करीत आहे. सारांश सर्व इंद्रियाभिमानी देवतास पितरांस आणि इतर प्राणांस जिवंत ठेवून आधार देणारा मुख्य प्राण आहे. ॥ ८ ॥

---

किंच—

सिद्धान्ती—आणखी—

## मंत्र नववा.

**इन्द्रस्त्वं प्राण तेजसा रुद्रोऽसि परिरक्षिता ।**
**त्वमन्तरिक्षे चरसि सूर्यस्त्वं ज्योतिषां पतिः ॥ ९ ॥**

अन्वय व अर्थ—प्राण त्वं तेजसा इंद्रः, परिरक्षिता रुद्रः, त्वं अंतरिक्षे चरसि, त्वं ज्योतिषां पतिः सूर्यः ( हे प्राण, हे परमेश्वर, तू सामर्थ्यानें सर्वसंहारकर्ता रुद्र आहेस, तसेंच तूंच संरक्षकर्ता आहेस, अंतरिक्षामध्यें वावरणारा तेजस्पति सूर्यही तूंच आहेस. ॥ ९ ॥

इन्द्रः परमेश्वरस्त्वं हे प्राण तेजसा वीर्येण रुद्रोऽसि संहरञ्जगत् । स्थितौ च परि समन्तात्रक्षिता पालयिता परिरक्षिता

त्वमेव जगतः सौम्येन रूपेण। त्वमन्तरिक्षेऽजस्रं चरसि उदयास्तमयाभ्यां सूर्यस्त्वमेव च सर्वेषां ज्योतिषां पतिः ॥ ९ ॥

सिद्धान्ती—हे प्राण, तूं इंद्र म्हणजे परमेश्वर आहेस, तू रुद्रस्वरूप घेऊन आपल्या पराक्रमानें जगताचा संहार करितोस आणि स्थितिकाळीं तूंच सौम्यस्वरूप विष्णुस्वरूप धारण करून सर्व संकटापासून जगाचें संरक्षण व पालनपोषण करितोस. हे प्राण, तू अंतरिक्षामध्यें नित्य फिरत राहून केव्हां उदय पावतोस आणि केव्हां अस्ताला जातोस. तूं सूर्य आहेस, म्हणजे सर्व ग्रह नक्षत्रादि तारकांचा अधिपति आहेस. सारांश सृष्टिस्थितिलय करणारा तूंच असून विश्वांतील सकल पदार्थांवर प्रकाश पाडणारा तूं आहेस. ॥ ९ ॥

---

## मंत्र दहावा.

**यदा त्वमभिवर्षस्यथेमाः प्राणते प्रजाः ।**
**आनन्दरूपास्तिष्ठन्ति कामायान्नं भविष्यतीति ॥१०॥**

अन्वय व अर्थ—यदा त्वं अभिवर्षसि अथ इमाः प्रजाः प्राणते ( ज्या वेळीं तूं पर्जन्यरूपानें वृष्टि करितोस त्या वेळीं या सर्व प्रजांस आपले व्यापार करितां येतात.) कामाय अन्नं भविष्यति इति आनंदरूपाः तिष्ठन्ति ( आणि आपल्या इच्छेस तृप्त करील इतकें अन्न आतां उत्पन्न होईल, असें कळून त्यांना तुझ्या पर्जन्यवृष्टीनें आनंद होतो. ) ॥ १० ॥

यदा पर्जन्यो भूत्वाऽभिवर्षसि त्वमथ तदाऽन्नं प्राप्येमाः प्रजाः प्राणते प्राणचेष्टां कुर्वन्तीत्यर्थः । अथवा प्राण ते तवेमाः प्रजाः स्वात्मभूतास्त्वदन्नसंवर्धितास्त्वदभिवर्षणदर्शनमात्रेण चाऽऽनन्दरूपाः सुखं प्राप्ता इव सत्यस्तिष्ठन्ति । कामायेच्छातोऽन्नं भविष्यतीत्येवमभिप्रायः ॥ १० ॥

सिद्धान्ती—ज्यावेळीं पर्जन्य होऊन तू सर्व सृष्टिभर जलाचा वर्षाव करितोस त्यावेळीं अन्न उत्पन्न होऊन तें प्राणिमात्रास प्राप्त होतें. आणि आपापले इष्ट व्यापार ( गमनागमन, दानादान, इत्यादि प्राणचेष्टा ) करण्याचें सामर्थ्य येतें.

शिष्य—दुसरा अर्थ शक्य आहे ?

सिद्धान्ती—अथवा तुझ्या स्वरूपानेंच असणाऱ्या ह्या सर्व प्रजा ( इतर प्राण ) तूं प्राप्त करून दिलेल्या अन्नानें मात्र पुष्ट होतात व जणूंकाहीं तुझ्या वृष्टिरूपी दर्शनानें सुखी होतात आणि आनंदात राहतात. त्यास अशी खात्री असते

की, आपल्याला आतां इच्छापूर्वे होईतोंपर्यंत ( लागेल तितकें ) अन्न मिळेल, अशा अभिप्राय आहे. ॥ १० ॥

---

किंच—

सिद्धान्ती—आणखी—

### मंत्र अकरावा.

**व्रात्यस्त्वं प्राणैकऋषिरत्ता विश्वस्य सत्पतिः ।**
**वयमाद्यस्य दातारः पिता त्वं मातरिश्व नः ॥ ११ ॥**

अन्वय व अर्थ—त्वं व्रात्यः, हे प्राण एकऋषिः, अत्ता, विश्वस्य सत्पतिः ( हे संस्कारशून्य व्रात्या ! तूं एकर्षि नामक अग्नि आहेस, तूं सर्व-भक्षक आहेस. तूं सर्व विश्वाचा सत्पति आहेस ) वयं आद्यस्य दातारः ( आम्ही सर्व जण तुझें खाण्याचें अन्न पुरविणारे आहों. ) हे मातरिश्व त्वं नः पिता (हे मातरिश्वन्, तूं आमचा पिता आहेस.) ॥११॥

प्रथमजत्वादन्यस्य संस्कर्तुरभावादसंस्कृतो व्रात्यस्त्वं स्वभावत एव शुद्ध इत्यभिप्रायः । हे प्राणैकऋषिस्त्वमाथर्वणानां प्रसिद्ध एकर्षिनामाऽग्निः सन्नत्ता सर्वेहविषाम् । त्वमेव विश्वस्य सर्वस्य सतो विद्यमानस्य पतिः सत्पतिः । साधुर्वा पतिः सत्पतिः । वयं पुनराद्यस्य तवादनीयस्य हविषो दातारः । त्वं पिता मातरिश्व हे मातरिश्वनोऽस्माकम् । अथ वा मातरिश्वनो वायोस्त्वम् । अतश्च सर्वस्यैव जगतः पितृत्वं सिद्धम् ॥ ११ ॥

*सिद्धान्ती—हे प्राण तूं व्रात्य आहेस.*

शिष्य—ज्याला जातकर्म, नामकरण, उपनयन, इत्यादि संस्कार झालेले नसतात त्याला व्रात्य म्हणतात. असंस्कृत पुरुषाला व्रात्य म्हणतात. पण हें *नांव प्राणाला कसें उपयोजिलें ?*

सिद्धान्ती—अरे, कोणताही संस्कार करण्याला पुरोहिताची आवश्यकता असते. प्राण हा तर सर्वांच्या अगोदर जन्माला आलेला आहे. हा जन्मला त्यावेळीं पुरोहित नव्हता. त्याला संस्कार कोण करणार ? म्हणून संस्काराच्या अभावीं प्राणाला व्रात्य असें म्हटलें; पण तो स्वभावतः शुद्धच आहे. संस्कारानें शुद्ध होणारा नव्हे. प्राण म्हणतातः हे मुख्य प्राण, अथर्वणाचा एकर्षि नामक अग्नि तूं असून सर्व हवींचे भक्षण करणारा आहेस. आणि तूं सर्व जगांतील विद्यमान वस्तूंचा पति आहेस.

शिष्य—येथें सत् याचा अर्थ विद्यमान असणारा असा केला. सत् याचा अर्थ चांगलें असाही आहे. चांगला जो पति त्याचच सत्पति म्हटलें तर ?

सिद्धान्ती—कांहीं प्रत्यवाय नाहीं. आम्ही ( इतर प्राण ) तुझें भक्षणास योग्य असें हवि ( आहुती ) तुला देतों. हे मातरिश्वन्—

शिष्य—मातरिश्वा हें नांव वायूचें आहे ?

सिद्धान्ती—ठीक आहे. हे वायो, तूं आमचा पिता आहेस.

शिष्य—'मातरिश्वनः' म्हणजे वायूचा पिता तूं आहेस असा अर्थ केला तर ?

सिद्धान्ती—तरीही कांहीं बिघडत नाहीं. तूं सर्व जगाचा पिता आहेस हें मुख्यत्वानें सांगावयाचें आहे. इतर प्राणांनीं 'तूं आमचा पिता आहेस' असें म्हटलें किंवा 'वायूचा पिता आहेस,' असें म्हटलें तरी तात्पर्य एकच आहे. प्राण हें वायूचें स्वरूप आहे. सारांश आकाशात्मा जो प्राण तो सर्वांचा पिता आहे; तो सर्वजनक आहे, हें सिद्ध झालें. ॥ ११ ॥

---

किं बहुना—

सिद्धान्ती—फार काय सांगावें ?—

## मंत्र बारावा.

**या ते तनूर्वाचि प्रतिष्ठिता या श्रोत्रे या च चक्षुषि ।**
**या च मनसि संतता शिवां तां कुरु मोत्क्रमीः ॥ १२॥**

अन्वय व अर्थ—या ते तनूः वाचि, या श्रोत्रे, या च चक्षुषि, या च मनसि संतता प्रतिष्ठिता, तां शिवां कुरु; मा उत्क्रमीः ( वाणीमध्यें कर्णामध्यें, नेत्रामध्यें आणि मनामध्यें जें तुझें शरीर प्रतिष्ठित झालें आहे तें शरीर आमचें कल्याण करील असें कर. आमच्यापासून तें शरीर काढून घेऊं नकोस.) ॥ १२ ॥

या ते त्वदीया तनूर्वाचि प्रतिष्ठिता वक्तृत्वेन वदनचेष्टां कुर्वती । या श्रोत्रे या च चक्षुषि या च मनसि संकल्पादिव्यापारेण संतता समनुगता तनूस्तां शिवां शान्तां कुरु मोत्क्रमीरुत्क्रमणेनाशिवां मा कार्षीरित्यर्थः ॥ १२ ॥

सिद्धान्ती—वाणीमध्यें वक्तृत्वाचें सामर्थ्य, कर्णामध्यें श्रवण करण्याचें, नेत्रांमध्यें दर्शन घेण्याचें, मनामध्यें सतत मनन करण्याचें, जें सामर्थ्य आहे; तें

सर्व तुझें शरीर आहे. या शरीराला कल्याणरूप कर आणि त्याला आमच्या जवळून काढून घेऊन जाऊं नकोस.

शिष्य—मनाचा व्यापार नित्य संकल्पविकल्पादि करून अखंड मनन करण्याचा आहे. हें अखंड मनन प्राणाचें शरीर आहे काय?

सिद्धान्ती—होय. इंद्रियांचे व मनाचे जे जे म्हणून व्यापार होतात ते ते प्राणाच्या कोणत्या तरी रूपाच्या द्वारें होत असतात. तो प्राण वाणीमध्यें व्यानरूपानें, कर्णांत-व्यान रूपानें, नेत्रांत प्राणरूपानें, मनांत समान रूपानें व्यापार करितो.

शिष्य—कशावरून?

सिद्धान्ती—'तो प्राणरूपानें नेत्र, व्यानरूपानें कर्ण, अपानरूपानें वाणी, समानरूपानें मन, असतो' अशी श्रुति प्रमाण आहे. इंद्रियादिकांची मुख्य प्राणास अशी विनंति आहे कीं, त्यानें योग्य रूपानें प्रत्येक इंद्रियांत वास्तव्य करावें आणि स्वकार्य करण्याच्या कामास सामर्थ्य द्यावें. यानें शरीर सोडून बाहेर जाऊं नये. मुख्य प्राण निघून गेला तर अपानादि व वाणीप्रमुख इंद्रियें स्वकार्य करण्यास अयोग्य होतील, अमंगळ होतील, म्हणून मुख्य प्राणानें जाऊं नये, असें इंद्रियांचें मागणें आहे. तो तेथें राहिला म्हणजे इंद्रियांचे व्यापार मंगलकारी होत असतात. आणि तो बाहेर गेला तर तेच व्यापार अमंगळ होतात. असा भावार्थ आहे. सारांश, सर्वांचें अस्तित्व मुख्य प्राणाच्या गमनागमनावर अवलंबून आहे. मुख्य प्राण असला तर इतर सर्व प्राण स्थिर राहून आपआपले व्यापार करितात आणि तो नसेल तर त्यांचे व्यापार स्तब्ध होऊन शरीर अमंगळ होतें ॥ १२ ॥

आम्हांस संपत्ति आणि बुद्धि दे.) इति (याप्रमाणें इंद्रियादि प्राणांनीं मुख्य प्राणाची स्तुति केली.) ॥ १३ ॥

अस्मिँल्लोके प्राणस्यैव वशे सर्वमिदं यत्किंचिदुपभोगजातं त्रिदिवे तृतीयस्यां दिवि च यत्प्रतिष्ठितं देवाद्युपभोगलक्षणं तस्यापि प्राण एवेशिता रक्षिता। अतो मातेव पुत्रानस्मान्रक्षस्व पालयस्व। त्वन्निमित्ता हि ब्राह्म्यः क्षात्रियाश्च श्रियस्तास्त्वं श्रीश्च श्रियश्च प्रज्ञां च त्वत्स्थितिनिमित्तां विधेहि नो विधत्स्वेत्यर्थः। इत्येवं सर्वात्मतया वागादिभिः प्राणैः स्तुत्या गमितमहिमा प्राणः प्रजापतिरत्तेत्यवधृतम् ॥ १३ ॥

इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यश्रीमद्गोविन्दभगवत्पूज्यपादशिष्यश्रीमच्छंकरभगवतः कृतौ प्रश्नोपनिषद्भाष्ये द्वितीयः प्रश्नः ॥ २ ॥

सिद्धान्ती—ह्या लोकामध्यें जी जी म्हणून उपभोग घेण्यास योग्य वस्तु आहे व तिसऱ्या म्हणजे स्वर्गामध्यें देवांनीं उपभोग घेण्याची म्हणून जी जी वस्तु आहे, तिच्यापैकीं प्रत्येकही प्राणाला वश असते. ती प्राणाच्या तंत्रानें चालते. तिचा स्वामी प्राण आहे.

शिष्य—येथें भुवर्लोकाचा अंतरिक्षाचा विचार केला नाहीं. त्याचें कारण तेथें सशरीर प्राणी राहात नाहींत हें असावें.

सिद्धान्ती—बरोबर आहे. बाकी तेथें अशरीर प्राणी असतील तर त्यांच्याही उपभोगाच्या वस्तु प्राणतंत्रच असावयाच्या. असो; मुख्य प्राणाला इतर प्राण, इंद्रियें व अवयव विनंति करितात: महाराज, आई मुलांचें पालनपोषण करिते त्याप्रमाणें तूं आमचें संरक्षण कर. तुझ्या सामर्थ्यामुळें मात्र ब्राह्मणवर्णाची व क्षत्रिय वर्णाची बुद्धि आणि संपत्ति उत्कर्ष पावतात. असो, असें आम्हांस कांहीं असूं दे की ज्याच्या योगानें तूं आमच्या जवळ राहशील.

शिष्य—क्षत्रियांची संपत्ति व ब्राह्मणांची बुद्धि या दोन्ही विद्यमान असल्या म्हणजे प्राणाची स्थिति आहे, मुख्य प्राण तेथें आहे, असें समजावयाचें.

सिद्धान्ती—मुख्य प्राण राहिला म्हणजे लक्ष्मी आणि सरस्वतीचें अखंड वास्तव्य विद्यमान असतें. याप्रमाणें मुख्य प्राण हा सर्वात्मा आहे. अशी वाणीप्रमुख प्राणांनीं स्तुति केली. कारण त्याचें माहात्म्य या स्पर्धा करणाऱ्या इंद्रियरूप प्राणांस पूर्णपणें कळलें होतें. असो; यावरून मुख्य प्राण हा प्रजापति आहे, विषयभोक्ता आहे; विषयसाक्षी आहे, असें जें आचार्यांनीं या प्रश्नाचा उपक्रम करितांना म्हटलें होतें तें सिद्ध झालें.

## प्रश्न तिसरा.

### मंत्र पहिला.

**अथ हैनं कौसल्यश्चाऽऽश्वलायनः पप्रच्छ । भगवन्कुत एष प्राणो जायते कथमायात्यस्मिञ्शरीर आत्मानं वा प्रविभज्य कथं प्रातिष्ठते केनोत्क्रमते कथं,बाह्यमभिधत्ते कथमध्यात्ममिति ॥ १ ॥**

अन्वय व अर्थ—अथ ह एनं आश्वलायनः कौसल्यः च पप्रच्छ ( नंतर आचार्यांस आश्वलायनकुलोत्पन्न कौसल्यानें विचारिलें ) भगवन्, एषः प्राणः कुतः जायते ( हा प्राण कोठून उत्पन्न होतो ? ) अस्मिन् शरीरे कथं आयाति ( आमच्या या शरीरांत त्याचा कसा प्रवेश होतो ? ) आत्मानं वा प्रविभज्य कथं प्रातिष्ठते ( किंवा आपल्या स्वतःचे प्रविभाग करून तो कसा प्रतिष्ठित होतो ? ) केन उत्क्रमते ( कोणत्या वृत्तीचा—प्रकारचा—अवलंब करून तो शरीराच्या बाहेर जातो ?) कथं वा बाह्यं अभिधत्ते कथं अध्यात्मं (-आणि बाह्य व अंतस्थ स्वरूपाचें धारण कसें करितो ?) ॥ १ ॥

अथ हैनं कौसल्यश्चाऽऽश्वलायनः पप्रच्छ । प्राणो हैवं प्राणैर्निर्धारिततत्त्वैरुपलब्धमहिमाऽपि संहतत्वात्स्यादस्य कार्यत्वमत· पृच्छामि । भगवन्कुतः कस्मात्कारणादेष यथावधृतः प्राणो जायते । जातश्च कथं केन वृत्तिविशेषेणाऽऽयात्यस्मिञ्शरीरे । किंनिमित्तकमस्य शरीरग्रहणमित्यर्थः । प्रविष्टश्च शरीर आत्मानं वा प्रविभज्य प्रविभागं कृत्वा कथं केन प्रकारेण प्रातिष्ठते प्रतितिष्ठति । केन वा वृत्तिविशेषेणास्माच्छरीरादुत्क्रमत उत्क्रामति । कथं बाह्यमधिभूतमधिदैवतं चाभिधत्ते धारयति कथमध्यात्ममिति ॥ १ ॥

सिद्धान्ती—गेल्या प्रश्नांत मुख्य प्राणाच्या प्रजापतित्व, अत्तृत्व इत्यादि गुणांचा निश्चय केला. पण या प्रश्नांत प्राणाच्या उत्पत्त्यादिकांची मीमांसा करावयाची असून प्राणाची उपासनाही विहित करावयाची आहे. यासंबंधाचा प्रश्न आश्वलायनकुलोत्पन्न कौसल्यानें आचार्यांस विचारला आहे. तो म्हणाला,—भगवन् चक्षु, वाणी, आकाश, इत्यादि सर्वांनी प्राणाचें स्वरूप माहीत करून घेतलें व त्याचा महिमाही विशद करून घेतला.—

शिष्य—भगवन्, अनेक वस्तु मिळून [redacted] प्राण घटित होतो म्हणून तो कार्यरूप आहे; होय नव्हे ?

सिद्धान्ती—हाच अभिप्राय मनांत आणून कौसल्य ऋषींस म्हणाला,—भगवन्, कोणत्या कारणापासून आपण आतांच निश्चित स्वरूप केलेला [redacted] प्राण उत्पन्न होतो? त्याला प्राण, अपान, व्यान इत्यादि अवयव आहेत म्हणून त्याची उत्पत्ति, झाली असली पाहिजे. अवयवांनीं संघटित झालेली वस्तु उत्पन्न होत असते. त्यां वस्तुला जन्म असतो. हा प्राण उत्पन्न झाल्यानंतर कोणत्या स्वरूपानें, कोणत्या वृत्तानें, किंवा प्रकारानें या आपल्या शरीरांत प्रविष्ट होतो. सारांश, याला शरीरग्रहण करावें लागतें, त्याचें निमित्त कोणतें बरें ? यानें शरीरांत प्रवेश केला असतां प्राण, अपान, व्यानादि आपले प्रविभाग करितो, असें आपण सांगितलें. पण हें विभाजन झाल्यावर कोणत्या स्वरूपानें हा विद्यमान असतो. तसेंच कोणत्या विशेष स्वरूपानें, कोणत्या वृत्तिविशेषानें तो हें शरीर सोडून जातो. त्याचप्रमाणें बाह्य आणि अध्यात्म स्वरूपांचें धारण तो कसें करितो ?

शिष्य—बाह्य म्हणजे ?

सिद्धान्ती—अधिभूत आणि अधिदैवत ज्या वस्तु आहेत त्यांना बाह्य म्हणावें आणि मन, सुख-दुःख इत्यादि अंतस्थ वस्तूंस आध्यात्म म्हणावें. ध्यानांत ठेव, येथें प्राणाची उत्पत्ति कशी, स्थिति कशी, व प्राणाचा लय कसा, तो शरीरांत येतो कसा, शरीराच्या बाहेर जातो कसा, शरीराच्या आंत बाहेरील स्वरूपाचें तो कसें धारण करतो. हे प्रश्न कौसल्यानें विचारले आहेत. ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

### तस्मै स होवाचातिप्रश्नान्पृच्छसि ब्रह्मिष्ठोऽसीति तस्मात्तेऽहं ब्रवीमि ॥ २ ॥

अन्वय व अर्थ—तस्मै सः ह उवाच (कौसल्याला म्हणाले.) अतिप्रश्नान् पृच्छसि (तूं फार गूढ प्रश्न विचारतो आहेस) ब्रह्मिष्ठः असि इति (तूं ब्रह्मवेत्ता आहेस, बुद्धिमान् आहेस,) अहं तस्मात् ते ब्रवीमि (म्हणून तुला मी तुझ्या प्रश्नाचें उत्तर सांगतो) ॥ २ ॥

एवं पृष्टस्तस्मै स होवाचाऽऽचार्यः । प्राण एव तावद्दुर्विज्ञेयत्वाद्विषमप्रश्नार्हस्तस्यापि जन्मादि त्वं पृच्छस्यतोऽतिप्रश्नान्पृ-

च्छसि । ब्रह्मिष्ठोऽसीत्यतिशयेन त्वं ब्रह्मविदतस्तुष्टोऽहं तस्मात्ते तुभ्यं ब्रवीमि यत्पृष्टं शृणु ॥ २ ॥

सिद्धान्ती—याप्रमाणें कौसल्यानें आपला प्रश्न विचारल्यावर ते आचार्य त्याला म्हणाले-प्राणस्वरूप समजण्याला अत्यंत कठिण आहे. हा तुझा प्रश्न अत्यंत गूढ आहे, दुर्घट आहे, म्हणून तुझ्यासारख्या ब्रह्मनिष्ठाला विचारण्यासही योग्य आहे. प्राणाचें तूं जन्मादि वृत्त विचारतोस, आतांपर्यंत जे प्रश्न विचारले गेले, त्यांच्यापेक्षां तुझा प्रश्न अति बिकट आहे. कौसल्या, तुझें ब्रह्माध्ययन (वेदाध्ययन) मोठें आहे. अपरब्रह्माची उपासना केल्यामुळें तूं अंतर्मुख झाला आहेस. म्हणून तुझ्यावर मी संतुष्ट झालों आहें तूं जें काय विचारलेंस, त्याचें उत्तर मी मोठ्या आनंदानें तुला सांगतों ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**आत्मन एष प्राणो जायते । यथैषा पुरुषे छायै-तस्मिन्नेतदाततं मनोकृतेनाऽऽयात्यस्मिञ्छरीरे ॥ ३ ॥**

अन्वय व अर्थ—एषः प्राणः आत्मनः जायते ( हा प्राण आत्म-स्वरूपापासून उत्पन्न होतो. ) यथा पुरुषे एषा छाया ( जशी पुरु-षाच्या संबंधानें ही छाया उत्पन्न होते. ) एतस्मिन् एतत् आततं ( या आत्म्यामध्यें हें प्राणतत्त्व समर्पित झालें आहे. ) अस्मिन् शरीरे मनोकृतेन आयाति ( या शरीरांत मनःसंकल्पानें हा प्राण प्रवेश करितो. )

सारांश, छायेसारखी प्राणाची उत्पत्ति मिथ्यारूप आहे. ॥ ३ ॥

आत्मनः परस्मात्पुरुषादक्षरात्सत्यादेष उक्तः प्राणो जायते । कथमित्यत्र दृष्टान्तः यथा लोक एषा पुरुषे शिरःपाण्यादि-लक्षणे निमित्ते छाया नैमित्तिकी जायते तद्वदेतस्मिन्ब्रह्मण्ये-तत्प्राणाख्यं छायास्थानीयमनृतरूपं तत्त्वं सत्ये पुरुष आततं समर्पितमित्येतत् । छायेव देहे मनोकृतेन मनःसंकल्पेच्छादि-निष्पन्नकर्मनिमित्तेनेत्येतद्वक्ष्यति हि-पुण्येन पुण्यमित्यादि । तदेव सक्तः सह कर्मणेति च श्रुत्यन्तरात् । आयात्यागच्छत्यस्मि-ञ्छरीरे ॥ ३ ॥

सिद्धान्ती—अत्यंत श्रेष्ठ जो परमात्मा, परम पुरुष, अक्षर आणि सत्यरूप ब्रह्म, त्याच्यापासून पूर्वी वर्णन केलेला प्राण उत्पन्न होतो. ' दिव्य, अमूर्त, परम

श्रोत्रे चक्षुश्च श्रोत्रं च चक्षुःश्रोत्रे तस्मिन्चक्षुःश्रोत्रे । मुखनासिकाभ्यां च मुखं च नासिका च ताभ्यां मुखनासिकाभ्यां च निर्गच्छन्प्राणः स्वयं सम्राट्स्थानीयः प्रातिष्ठते प्रतितिष्ठति। मध्ये तु प्राणापानयोः स्थानयोर्नाभ्याम् । समानोऽशितं पीतं च समं नयतीति समानः । एष हि यस्माद्यदेतद्धुतं भुक्तं पीतं चाऽऽत्माग्नौ प्रक्षिप्तमन्नं समं नयति तस्मादशितपीतेन्धनादग्नेरौदर्याद्धृदयदेशं प्राप्तादेताः सप्तसंख्याका अर्चिषो दीप्तयो निर्गच्छन्त्यो भवन्ति शीर्षण्यः । प्राणद्वारा दर्शनश्रवणादि लक्षणरूपाद्विविषयप्रकाशा इत्यभिप्रायः ॥ ५ ॥

*सिद्धान्ती*—अपानद्वाराची योजना पायूपस्थाचे स्थानावर झाली आहे. पायूपस्थ म्हणजे दोन्ही मलद्वारें होत. हा अपानवायु ( *प्राणाचा एक भेद* ) मल-मूत्रादिकांचें अपनयन करितो, त्यांस खालीं ढकलून देऊन बाहेर काढून टाकतो. हें अपानवायूसंबंधानें झालें. आतां मुख आणि नासिका ( तोंड व नाक ) यांच्यापासून निघून मुख्य प्राण हा सम्राट् राजाप्रमाणें नेत्र-कर्णांचे ठिकाणीं आपली स्थापना करितो. प्राणवायूचें वास्तव्य नेत्र आणि कर्ण यांत आहे. या प्राण आणि अपान वायूंच्यामध्यें समानवायूचें वास्तव्य आहे. हा वायु नाभीचे ठिकाणीं राहातो. याच्याकडे नेमलेलें काम म्हणजे आपण जें काय खातों व पितों त्यांस समरस करावयाचें. आपण अन्नाची व जलाची जी आहुति देतों, ती शरीरामधील अग्नीमध्यें प्रक्षिप्त करून दिला हा वायु एकरसरूप देतो, असा अन्नाचा व जलाचा एक रस झाल्यावर तें उदरांतील अग्नीचें इंधन ( जळण ) होऊन त्या अग्नीपासून निघालेल्या ज्वाळा हृदयप्रदेशापर्यंत येऊन पोहचतात. ह्या ज्वाळा सात असतात. त्या हृदयांतून निघून मस्तकप्रदेशापर्यंत जातात. तात्पर्य, ह्या सप्त ज्वाळा प्राणाच्या द्वारानें दर्शन, श्रवण इत्यादि स्वरूपानीं ज्ञेय विषयांचें प्रकाशन करितात. मस्तकांत सप्त छिद्रें आहेत. नेत्रद्वय, कर्णद्वय, घ्राणद्वय, ( दोन नाकपुड्या ) एक मुख अशीं हीं विषयप्रकाशनाचीं सप्तद्वारें आहेत.

*शिष्य*—म्हणजे हा एक अग्निहोत्राचाच प्रकार झाला. आपण खातों पितों त्या आहुति, जठरांतील अग्नि हा आहवनीय अग्नि, प्रवेश करणें हा होम आणि मस्तकांतील सप्तद्वारांतून जे विषयप्रकाशन होतें त्या होमकुंडांतील ज्वाळा होत.

*सिद्धान्ती*—तुला हें रूपक लागें समजें. असो, जठराग्नीच्या सामर्थ्यानें अन्नरसाचा जो परिपाक होतो, तो नाडीद्वारानें हृदयांत येऊन पोंचतो. हृदय हें नाडींचें आगमनिर्गमस्थान आहे. हृदय ही राजधानी आहे. येथूनच सर्व नाड्या बाहेर निघून सर्व शरीरभर पसरतात आणि पुनः येथेंच विश्रांतीसाठीं येतात.

नंतर हा अवयव मस्तकापर्यंत जातो. आणि जेथें तो विषयज्ञानसाधनरूपी ज्वालांनीं युक्तद्वारांतून बाहेर येतो. ॥ ५ ॥

---

## मंत्र सहावा.

**हृदि ह्येष आत्मा । अत्रैतदेकशतं नाडीनां तासां शतं शतमेकैकस्यां द्वासप्ततिर्द्वासप्ततिः प्रतिशाखानाडीसहस्राणि भवन्त्यासु व्यानश्चरति ॥ ६ ॥**

अन्वय व अर्थ—हृदि हि एषः आत्मा ( ह्या आत्म्याचें वसतिस्थान हृदय हें आहे. ) अत्र एतत् नाडीनां एकशतं तासां शतं शतं एकैकस्यां, द्वासप्ततिः प्रतिशाखानाडीसहस्राणि भवन्ति ( येथें एकशें-एक प्रधान नाड्या आहेत; या प्रत्येकीचे शंभर शंभर भेद आहेत; पुनः या प्रत्येक भेदाचे बहात्तर हजार प्रभेद आहेत; यांस प्रतिशाखा नाडी असें म्हणतात. यांमधून जो वायु संचार करितो, त्याला व्यान असें म्हणतात ६

हृदि ह्येष पुण्डरीकाकारमांसपिण्डपरिच्छिन्ने हृदयाकाश एष आत्माऽऽत्मना संयुक्तो लिङ्गात्मा, अत्रास्मिन्हृदय एतदेकशतमेकोत्तरशतं संख्या प्रधाननाडीनां भवतीति । तासां शतं शतमेकैकस्याः प्रधाननाड्या भेदाः पुनरपि द्वासप्ततिर्द्वासप्ततिर्द्वे द्वे सहस्रे अधिके सप्ततिश्च सहस्राणि । सहस्राणां द्वासप्ततिः प्रतिशाखानाडीसहस्राणि प्रतिप्रतिनाडीशतं संख्यया प्रधाननाडीनां सहस्राणि भवन्ति । आसु नाडीषु व्यानो वायुश्चरति । व्यानो व्यापनात् । आदित्यादिव रश्मयो हृदयात्सर्वतोगामिनीभिर्नाडीभिः सर्वदेहं संव्याप्य व्यानो वर्तते । संधिस्कन्धमर्मदेशेषु विशेषेण प्राणापानवृत्त्योश्च मध्य उद्भूतवृत्तिवीर्यवत्कर्मकर्ता भवति ॥ ६ ॥

सिद्धान्ती—हृदयांत पुंडरीक नामक कमळाच्या आकाराचा मांस—पिंड असतो. त्यानें जें हृदयांतील आकाश परिच्छिन्न (मर्यादित) केलें आहे. त्याला हृदयाकाश म्हणतात. येथें आत्मसंयुक्त असलेला लिंगात्मा राहतो.

शिष्य—मंत्रांतील आत्मशब्दाचा अर्थ लिंगात्मा आहे असें दिसतें.

सिद्धान्ती—होय. लिंगात्मा संचार करितो. कारण तो मर्यादित असतो. सर्वव्यापी आत्म्याला संचार करण्याचें कारण नाहीं, असो; ह्या आपल्या हृद-

यामध्यें एकएक प्रधान नाड्या आहेत. त्यांपैकीं प्रत्येकीला शंभर शंभर शाखानाड्या आहेत. पुनः या शाखानाड्यांपैकीं प्रत्येकीचे बहात्तर हजार प्रभेद आहेत. यांस प्रतिशाखा नाडी असें म्हणतात. म्हणजे १०१ प्रधान नाड्यांच्या शाखानाड्या १०,१०० झाल्या व ७२,७२,००,००० इतक्या प्रतिशाखानाड्या झाल्या व एकंदर सर्व मिळून ७२,७२,१०,२०१ ही नाड्यांची संख्या झाली. या नाड्यांमध्यें जो वायु संचार करितो त्याला व्यान असें म्हणतात. व्यापन करण्याचा त्याचा धर्म आहे म्हणून त्याला व्यान असें म्हणतात. सूर्यापासून निघणारे किरण सर्व विश्वभर पसरतात. त्याप्रमाणें हृदयांतून निघणाऱ्या व सर्व शरीरांत संचार करणाऱ्या नाडींच्या साहाय्यानें हा व्यान वायु सर्व शरीरभर संचार करीत असतो. त्यांतही सांध्यांची जी मर्मस्थानें आहेत तेथें याचें विशेषत्वानें वास्तव्य असतें. तसेंच प्राण आणि अपान या उभयतांचाही अभाव असतां व्यानवृत्तीचा उद्भव होतो. हा वायु प्राणापानांच्या अभावीं ( मध्यकालांत श्वास घेऊन निश्वास टाकला नाहीं त्या कालांत ) वीर्यशाली कर्मकर्ता असतो. धनुष्याची प्रत्यंचा ओढणें इत्यादि कामें व्यानवायूचीं आहेत. प्राणाचीं किंवा अपानाचीं नाहींत. सारांश बळाचीं कामें करणें हें कर्म व्यानवायूकडे निश्चित केलें आहे. ॥ ६ ॥

---

पासून मस्तकापर्यंत संचार करीत असतो. जे पुरुष शास्त्रविहित पुण्य कर्मे करितात त्यांस हा वायु देवादिकांच्या वसतीचें स्थान असणारा जो स्वर्ग त्यांत नेऊन पोहचवितो व पापी पुरुषांस स्वर्ग-विरोधी भुवनाप्रत म्हणजे नरक-लोकाला नेतो. पशुपक्ष्यादिकांचा जन्म प्राप्त होणें हा शब्द नरकवाचक आहे. तात्पर्य, पापी पुरुष पशुपक्ष्यादिकांच्या जन्मास जातात; पण ज्या पुरुषांचें पाप-पुण्य समसमान आहे, त्यांस हा वायु मृत्युलोकीं मानवजन्माप्रत नेऊन पोंचवितो.

शिष्य—ज्या पुरुषांचें पुण्य पापापेक्षां अधिक आहे त्यांस स्वर्ग लोक, पुण्यापेक्षां पाप अधिक आहे त्यांस नरक लोक आणि पापपुण्य समसमान आहे त्यांस मनुष्यलोक प्राप्त होतो आणि उदानवायु हें सर्व काम करितो. असें सांगण्याचा या मंत्रांचा अभिप्राय आहे.

सिद्धान्ती—होय. स्वर्गांत, नरकांत, किंवा मनुष्यलोकांत जीवाला पोंच-विणें ही व्यवस्था उदानवायूकडे नेमून दिली आहे ॥ ७ ॥

---

## मंत्र आठवा.

आदित्यो ह वै बाह्यः प्राण उदयत्येष ह्येनं चाक्षुषं प्राणमनुगृह्णानः । पृथिव्यां या देवता सैषा पुरुषस्यापानमवष्टभ्यान्तरा यदाकाशः स समानो वायुर्व्यानः ॥ ८ ॥

अन्वय व अर्थ—आदित्यः ह वै बाह्यः प्राणः उदयति (सूर्य हा बाह्य प्राण आहे आणि तो नित्य उदय पावतो.) एषः हि एनं चाक्षुषं प्राणं अनुगृह्णानः (हा सूर्य आपल्या नेत्रसंबंधी प्राणावर अनुग्रह करितो.) पृथिव्यां या देवता सा एषा पुरुषस्य अपानं अवष्टभ्य (पृथ्वीची जी अभिमानिनी देवता आहे, ती जीवाच्या अपानवायूचें स्तंभन करिते.) अंतरा यत् आकाशः सः समानः (स्वर्ग–पृथ्वीच्यामध्यें जो अव-काश आहे, त्यांत संचार करणारा वायु समानवायूचा साह्यकारी होतो; )–आणि–वायुः व्यानः (सर्वव्यापी वायुदेवता व्यानाला उपकारक होते. ८

सारांश, येथें प्राणांचें आधिदैविक व आधिभौतिक स्वरूप सांगितलें.

आदित्यो ह वै प्रसिद्धो ह्याधिदैवतं बाह्यः प्राणः स एष उदयन्नुद्गच्छति । एष ह्येनमाध्यात्मिकं चक्षुषि भवं चाक्षुषं

प्राणं प्रकाशेनानुगृह्णानो रूपोपलब्धौ चक्षुष आलोकं कुर्वन्नित्यर्थः । तथा पृथिव्यामभिमानिनी या देवता प्रसिद्धा सैषा पुरुषस्यापानमपानवृत्तिमवष्टभ्याऽऽकृष्य वशीकृत्याध एवापकर्षणेनानुग्रहं कुर्वती वर्तत इत्यर्थः । अन्यथा हि शरीरं गुरुत्वात्पतेत्सावकाशे वोद्गच्छेत् । यदेतदन्तरा मध्ये द्यावापृथिव्योर्य आकाशस्तत्स्थो वायुराकाश उच्यते । मञ्चस्थवत् । स समानः समानमनुगृह्णानो वर्तत इत्यर्थः। समानस्यान्तराकाशस्थत्वसामान्यात् । सामान्येन च यो बाह्यो वायुः स व्याप्तिसामान्याद्व्यानो व्यानमनुगृह्णानो वर्तत इत्यभिप्रायः ॥ ८ ॥

सिद्धान्ती—अधिदैवत ( देवसंबंधी ) जो प्राण आहे तो सर्व-प्रकाशक सूर्य होय. हा सूर्य उदय पावला, आपला बाह्यप्राण उगवला, म्हणजे आपल्या नेत्रांमध्यें उत्पन्न होणारा जो आध्यात्मिक प्राणवायु त्यालाही सूर्य देवता साह्य करिते. आपल्यास पदार्थांच्या रूपाचें जें ज्ञान होतें, नेत्राला रूप पाहण्याचें जें सामर्थ्य आहे, तें सूर्याच्या अनुग्रहानें प्राप्त झालें आहे. नेत्रामध्यें असणारा जो आध्यात्मिक प्राण त्याच्यावर आधिदैविक प्राण ( सूर्य ) अनुग्रह करून वस्तु पाहण्याचें सामर्थ्य जीवाच्या नेत्राला देतो. तसेंच पृथ्वीची अभिमानिनी जी अग्नि-देवता ती पुरुषाची जी अपानवृत्ति ( अपान वायु ) तिचें आकर्षण करून तिला वश करून घेते. आणि ही देवता अपान वायूला खालीं ढकलून अनुग्रह करिते. जर या देवतेचें साहाय्य नसतें तर आपलें जड शरीर खालीं पडलें असतें. किंवा डेवकळलें असतें. अथवा वर उडून गेलें असतें. म्हणून अग्नि-देवतेचा जीवावर मोठा उपकार आहे. ( ३ ) तसेंच स्वर्ग आणि पृथ्वी यांच्यामध्यें जो अवकाश आहे, तेथें संचार करणाऱ्या वायूला ' आकाश ' असें म्हणतात. पलंगावर किंवा खोनाळ्यावर म्हणजे अंतराळीं आपण बसतों, त्याप्रमाणें द्यावा-पृथ्वीच्या अंतराळांत या आकाशवायूचा वास्तव्य करण्यास सांगतें. ही देवता आपल्या शरीराच्या मध्यभागीं राहणाऱ्या समानवायूवर अनुग्रह करिते. उभयतांही एकरूपताबोध आहेत; कारण जसा आकाशवायु स्वर्ग आणि पृथ्वी यांच्यामध्यें राहतो, तसा समानवायु हा प्राण आणि अपान यांच्यामध्यें राहतो. ( ४ ) आतां सामान्य जो सर्वव्यापी बाह्यवायु आहे, तो शरीरांत व्यापून राहणाऱ्या व्यान वायूला साहाय्य होतो. उभयतांमध्येंही सर्व-व्यापित्व हो साधारण धर्म आहे. दोन्ही ही सर्वव्यापी वायु आहेत ॥ ८ ॥

## मंत्र नववा.

**तेजो ह वा उदानस्तस्मादुपशान्ततेजाः ।**
**पुनर्भवमिन्द्रियैर्मनसि संपद्यमानैः ॥ ९ ॥**

अन्वय व अर्थ—तेजः ह वै उदानः ( तेज हें द्रव्य उदानवायूवर अनुग्रह करितें. ) तस्मात् उपशान्ततेजाः मनसि संपद्यमानैः इंद्रियैः पुनर्भवं ( म्हणून तेजाचा नाश झाला म्हणजे इंद्रियें मनामध्यें प्रवेश करितात आणि त्या इंद्रियांसह जीव जन्मांतराला जातो. ) ॥ ९ ॥

यद्बाह्यं ह वै प्रसिद्धं सामान्यं तेजस्तच्छरीर उदान उदानं वायुमनुगृह्णाति स्वेन प्रकाशेनेत्यभिप्रायः । यस्मात्तेजःस्वभावो बाह्यतेजोऽनुगृहीत उत्क्रान्तिकर्ता तस्माद्यदा लौकिकः पुरुष उपशान्ततेजा भवति । उपशान्तं स्वाभाविकं तेजो यस्य सः । तदा तं क्षीणायुषं मुमूर्षुं विद्यात् । स पुनर्भवं शरीरान्तरं प्रतिपद्यते । कथम् । सहेन्द्रियैर्मनसि संपद्यमानैः प्रविशद्भिर्वागादिभिः ॥ ९ ॥

सिद्धान्ती—जें हें सर्व-प्रसिद्ध व सर्वसामान्य बाह्य तेज आहे तें स्वतेजानें जीवाच्या शरीरांत असणाऱ्या उदान वायूचें उपकारक होतें. आतां ज्याअर्थीं बाह्य तेजाचा अनुग्रह झाल्यामुळें तेजःस्वभावी उत्क्रांतिकर्ता उदान वायु आहे.—

शिष्य—म्हणजे उदान वायूचें रूप तेजात्मक आहे तरी बाह्य तेजाचा आश्रय केल्यासेरीज जीवाला बाहेर जाण्याचें किंवा आंत राहण्याचें सामर्थ्य शरीरस्थ उदानवायूला देतां येत नाहीं. असा आपल्या म्हणण्याचा भावार्थ मी समजतों आहें.

सिद्धान्ती—नाहीं, तो स्वतःच तेजस्वभावी आहे व उत्क्रांतीचा कर्ता आहे. तथापि बाह्य तेजाचा आश्रय केल्यासेरीज त्याला शरीरांत राहतांच येत नाहीं. असा आमच्या म्हणण्याचा अर्थ आहे. असो, जेव्हां जीवांत जीवन-हेतुक कर्मे ( जगण्यास अवश्य असणारीं ) करितां येईनाशीं होतात, तेव्हां बाह्य तेजाचा अनुग्रह नाहींसा होऊन तो जीव मुमूर्षु ( मरणासन्न ) होतो. सारांश, बाह्य तेजाचा आश्रय असला म्हणजे उदान वायु स्वकार्य-समर्थ असतो. आणि हा आश्रय संपला म्हणजे या जीवाच्या तेजःस्वभावी उदानवायूचें सामर्थ्य नष्ट होतें. हें झालें म्हणजे त्या जीवाचें आयुष्य संपलें, तो मरणोन्मुख झाला असें समजावें.

शिष्य—भगवन्, उदानवायु सतेज आहे असें कशावरून समजावयाचें ?

सिद्धान्ती—आपण हस्तादिकांनीं स्वशरीराला स्पर्श केला असतां आपलें अंग उष्ण भासतें. त्यावरून उष्णकारी उदान वायु तेजस्वी आहे असें सिद्ध होतें. ही

उष्णता उदरामध्यें असणाऱ्या अग्नीच्या सामर्थ्यानें प्राप्त झालेली असते. असो, मुमूर्षु पुरुषाचीं सर्व इंद्रियें मनामध्यें लीन होतात, वाणी आदि इंद्रियें मनांमध्यें प्रवेश करितात. आणि नंतर त्या समनस्क पुरुषाला शरीरांतर प्राप्त होतें. दुसऱ्या शरीरांत तो जीव प्रवेश करितो. याप्रमाणें आदित्य, अग्नि, आकाश, वायु, तेज ह्या देवता प्राण, अपान, समान, व्यान, आणि उदान यांच्यावर अनुक्रमानें अनुग्रह करीत असतात. या बाह्य (आधिदैविक) देवतांच्याच अनुग्रहानें अध्यात्म प्राणापानादिकांस शरीरधारणाचें सामर्थ्य प्राप्त होतें. ॥ ९ ॥

---

## मंत्र दहावा.

**यच्चित्तस्तेनैष प्राणमायाति प्राणस्तेजसा युक्तः।**
**सहाऽऽत्मना यथासंकल्पितं लोकं नयति ॥ १० ॥**

अन्वय व अर्थ—यच्चित्तः, तेन एषः प्राणं आयाति (ज्याचें चिंतन रात्रंदिवस असतें त्या संकल्पासह हा मुख्य प्राणाकडे जातो.) तेजसा युक्तः प्राणः आत्मना सह यथा संकल्पितं लोकं नयति (मुख्य प्राण उदानवायूच्या साहाय्यानें आपल्यासह जीवाला त्याच्या संकल्पानुसार असणाऱ्या भुवनाप्रत घेऊन जातो.)

सारांश शरीरांत असणारा तेजस्वी उदान वायु संकल्पात्मक मनासह मुख्य प्राणामध्यें लीन होतो. नंतर तो मुख्य प्राण उदानवायूसह जीवाला त्या भुवनाप्रत घेऊन जातो, [illegible] जेथें जीवाला त्याच आवडलेल्या विषयांचा उपभोग मिळेल. ॥ १० ॥

मरणकाले यच्चित्तो भवति तेनैव चित्तेन संकल्पेनेन्द्रियैः सह प्राणं मुख्यप्राणवृत्तिमायाति । मरणकाले क्षीणेन्द्रियवृत्तिः सन्मुख्यया प्राणवृत्त्यैवावतिष्ठत इत्यर्थः । तदाऽभिवदन्ति ज्ञातय उच्छ्वसिति जीवतीति । स च प्राणस्तेजसोदानवृत्त्या युक्तः सन्सहाऽऽत्मना स्वामिना भोक्त्रा स एवमुदानवृत्त्यैव युक्तः प्राणस्तं भोक्तारं पुण्यपापकर्मवशाद्यथासंकल्पितं यथाभिप्रेतं लोकं नयति प्रापयति ॥ १० ॥

सिद्धान्ती—पुरुषाच्या मरणसमयीं त्याच्या चित्तांत जे संकल्प दृढ-निबद्ध असतात, त्यांच्यासह (संकल्प विकल्पात्मक मन आणि इंद्रियें यांच्यासह) उदान वायु मुख्यप्राणवृत्तीमध्यें जाऊन लीन होतो.

शिष्य—भगवन्, मृत्युसमय प्राप्त झाला असतां जीवाच्या इतर सर्व–इंद्रिय–वृत्ति सर्वथा क्षीण होतात. आणि तो एक मुख्य प्राणवृत्तीनें मात्र श्वासोच्छ्वास करीत असतो, हें मीही पाहिलें आहे.

सिद्धान्ती—आणि त्याचवेळीं जवळचे (इष्टमित्र, सगोत्री, नातेवाईक) म्हणतात कीं, हा श्वासोच्छ्वास करीत आहे, अद्यापि प्राण कायम आहे. यावरून मृत्युकालीं उदानवायूसह मात्र मुख्य-प्राण विद्यमान असतो, हें स्पष्ट होतें. असो; हा मुख्य प्राण उदानवृत्तीला घेऊन आपल्या स्वामीला (उपभोग हवे असणाऱ्या जीवाला) पुण्यपापकर्मांच्या योगें ज्या संकल्पाचें ध्यान तो मरणासन्न जीव करीत होता, ज्या भोगांची दृढ वासना मुमूर्षूच्या अंतःकरणांत स्थिर झाली असते, ते उपभोग जेथें मिळतील किंवा ती वासना जेथें तृप्त होईल त्या स्वर्गनरकादि लोकाप्रत—त्या जीवाला—नेऊन पोहोंचवितो. सारांश, मरणसमयींच्या वासनेप्रमाणें मुमूर्षु जीवाला दुसरा जन्म प्राप्त होतो. शास्त्रोक्त आचरण व मरणसमयीं शुभ वासना असतील तर तो जीव स्वर्गांत जातो. आणि शास्त्रनिषिद्ध व अमंगल वासना यांचें साहचर्य असेल तर तो जीव नरकलोकाप्रत जातो. ॥ १० ॥

---

## मंत्र अकरावा.

**य एवं विद्वान्प्राणं वेद । न हास्य प्रजा हीयतेऽमृतो भवति तदेष श्लोकः ॥ ११ ॥**

अन्वय व अर्थ—एवं विद्वान् यः प्राणं वेद (या प्रकारचें ज्ञान असणाऱ्या ज्या कोणा विद्वान् पुरुषाला प्राण—स्वरूपाचें ज्ञान झालें.) ह अस्य प्रजा न हीयते (त्याच्या प्रजा—त्याची मुलेंबाळें—केव्हांही नाहींशीं होत नाहींत.) अमृतः भवति (तो अमर होतो.) तत् एषः श्लोकः (यासंबंधानें एक मंत्र आहे तो असा) ॥ ११ ॥

यः कश्चिदेवं विद्वानुक्तविशेषणैर्विशिष्टमुत्पत्त्यादिभिः प्राणं वेद जानाति तस्येदं फलमैहिकमामुष्मिकं चोच्यते । न हास्य नैवास्य विदुषः प्रजा पुत्रपौत्रादिलक्षणा हीयते छिद्यते । पतिते च शरीरे प्राणसायुज्यतयाऽमृतोऽमरणधर्मा भवति तदेतस्मिन्नर्थे संक्षेपाभिधायक एष श्लोको मन्त्रो भवति ॥ ११ ॥

सिद्धान्ती—ज्या कोणा ज्ञानी पुरुषाला श्रुतीनें या प्रश्नाच्या मीमांसेंत सांगितलेल्या विशेषणांसह व उत्पत्तिप्रमुख विशेषांसह प्राणस्वरूपाचें ज्ञान झालें, त्या विद्वानाला या लोकींसुद्धां काय फळ मिळतें, तें श्रुतीनें या मंत्रांत सांगितलें आहे.

शिष्य—भगवन्! आत्म्यापासून प्राण उत्पन्न होतो, मनाच्या संकल्पानुसार केलेल्या धर्माधर्मांमुळें शरीर-संपादन होतें, मुख्य प्राणवायु आपल्याच पांच विभागामध्यें विभागून प्राणापानादि पंचप्राणात्मक होतो, पंच महाभूतें आपआपल्या देवतांसह या पंचप्राणावर अनुग्रह करून त्यांस प्रकाश व सामर्थ्य देतात आणि पंचेन्द्रियांनीं ग्राह्य असे विषय उत्पन्न करून शरीर-धारणही करितात, त्याच्या भाग-प्रमाणांत शिथिल होऊं देत नाहींत, इत्यादि प्राणाचें स्वरूप समजून घेऊन जे लोक ज्ञानी होतात, व प्राण हाच प्रजापति व भर्ता (भोक्ता) आहे. असें समजतात, त्यांस इह लोकीं व परलोकीं काय प्राप्ति होते, तें या मंत्रांत सांगितलें आहे

सिद्धान्ती—ठीक समजलास. आतां फक्त काय मिळतें त्याचें स्वरूप ऐक. ह्या विद्वानाची पुत्रपौत्रादि प्रजा केव्हांही नष्ट होत नाहीं. याच्या वंशाचा उच्छेद केव्हांही होत नाहीं. आणि या विद्वानाचा देहपात झाल्यावर तो प्राण-सायुज्यता प्राप्त करून घेतो.

शिष्य—म्हणजे तो मुख्य प्राणाशीं एकरूप होतो. तदात्मक होतो. असें समजावयाचें ना?

*सिद्धान्ती—होय. या विद्वान् जीवाला अमरत्व प्राप्त होतें.* हाच अर्थ समर्थन करणारा एक मंत्र आहे त्याचा अवतार बाराव्या मंत्रांत श्रुतीनें केला आहे. या मंत्रांत श्लोकानें हाच अर्थ प्रतिपादित केला आहे ॥ ११ ॥

---

### मंत्र बारावा

**उत्पत्तिमायतिं स्थानं विभुत्वं चैव पञ्चधा।**
**अध्यात्मं चैव प्राणस्य विज्ञायामृतमश्नुते विज्ञा-**
**यामृतमश्नुत इति ॥ १२ ॥**

अन्वय व अर्थ—प्राणस्य उत्पत्तिं, आयतिं, स्थानं, विभुत्वं, पंचधा; अध्यात्मं च एव विज्ञाय अमृतं अश्नुते, विज्ञाय अमृतं अश्नुते इति (प्राणाची उत्पत्ति, त्याची गति, त्याचें स्थान, त्याचें सर्व-व्यापित्व व सर्व-श्रेष्ठत्व, त्याची पंचप्रकारक स्थापना, त्याचें नेत्रादि स्वरूपानें राहणें हें समजून घेऊन ज्ञानी पुरुष अमृतत्वाचा उपभोग घेतो.) ॥१२॥

उत्पत्तिं परमात्मनः प्राणस्याऽऽयतिमागमनं मनोकृतेनादिमच्छरीरे स्थानं स्थितिं च पायूपस्थादिस्थानेषु विभुत्वं च स्वाम्यमेव सम्राडिव (?) प्राणवृत्तिभेदेनैव पञ्चधा स्थाप

नम्। बाह्यमादित्यादिरूपेणाध्यात्मं चव चक्षुराद्याकारेणावस्थानं विज्ञायैवं प्राण (?) ममृतमश्नुत इति। विज्ञायामृतमश्नुत इति द्विर्वचनं प्रश्नार्थपरिसमाप्त्यर्थम्॥ १२॥

इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यश्रीमद्गोविंदभगवत्पूज्यपाद-
शिष्यश्रीमच्छंकरभगवतः कृतौ प्रश्नोपनिषद्भाष्ये
तृतीयः प्रश्नः॥ ३॥

सिद्धान्ती—परमात्म्यापासून झालेली प्राणाची उत्पत्ति, मनाच्या संकल्पानुसार व इंद्रियांच्या कर्मानुसार प्राणाचें आगमन व शरीरांतील वास्तव्य, पायूपस्थादि स्थानांतील (मलमूत्रादि स्थानांतील) त्याचें विभुत्व व स्वामित्व, त्याचें स्वतंत्र्य (सम्राट् राजा ज्याप्रमाणें सर्व-स्वामी असतो. त्याप्रमाणें प्राणही सर्व स्वामी आहे.) प्राणापानादि पंच प्रकारांनीं मुख्य प्राणवायूचें विभाजन आणि स्थापना आणि आदित्यादि पंचमहाभूतांच्या देवी अनुग्रहानें होणारी व नेत्रादिरूपानें पंच ज्ञानेंद्रियांची प्राणात्मक अध्यात्म स्थिति ही सर्वात्मना समजली असतां हा योगी अमृतत्व-प्राप्तीचा अधिकारी होतो. सारांश, प्राणाचें यथार्थ स्वरूप जाणून त्याचें निरंतर ध्यान करणारा पुरुष मुख्य प्राणास असणारें अमृतत्व प्राप्त करून घेतो.॥ १२॥

याप्रमाणें भगवान् श्रीमच्छंकराचार्य यांनीं केलेल्या तृतीय-प्रश्न-
भाष्याचें भाषांतर संपलें.

तिसरा प्रश्न समाप्त.

---

## तिसऱ्या प्रश्नोत्तराचा सारांश.

तिसरा प्रश्न असा आहे कीं प्राणाचें उत्पत्तिस्थान कोणतें, त्याचा शरीराशीं संयोग कसा होतो आणि त्याचे शरीराशीं संयोग व वियोग कसे होतात. ह्या प्रश्नांचा येथें विचार केला आहे.

प्राणाची उत्पत्ति आत्म्यापासून होते. कशी? पुरुषाचा व छायेचा, तसा आत्म्याचा व प्राणाचा संबंध आहे. पुरुष असला म्हणजे छाया उत्पन्न होते व त्याच्या अभावीं ती नसते. त्याप्रमाणें आत्मा आहे म्हणून प्राण आविर्भूत होतो, व तो नसेल तर प्राण अस्तंगत होतो. छायेनें पुरुषाच्या बाह्य स्वरूपांत किंवा अंतःस्वरूपात जसा कोणताही विकार उत्पन्न होत नाहीं, त्याप्रमाणें छायारूपानें प्राण अवतीर्ण झाला किंवा निजधामास गेला म्हणून आत्मस्वरूपांत कोणत्याही प्रकारचा बिघाड उत्पन्न होत नाहीं. प्राण उत्पन्न झाला म्हणून आत्मस्वरूपाच्या पूर्णतेची वृद्धि होत नाहीं किंवा तो

कयाला गेला म्हणून त्याच्या पूर्णतेला न्यूनत्व येत नाहीं. आत्मा नसेल तर प्राणाला अस्तित्व मिळावयाचें नाहीं; पण प्राण नसेल तर आत्म्याचें अस्तित्व नाहींसें व्हावयाचें नाहीं. असा याच्या उत्पत्तीचा प्रकार आहे. जीवशरीराशीं प्राणाचा संबंध होतो तो पूर्व–कर्मानें निर्माण केलेल्या संचितानुसार होतो. जसें पूर्व कर्म असेल तसे लिंगदेहावर संस्कार होतात आणि तो देह स्थूलदेहाशीं संगम करून प्राणरूपानें तेथें आविर्भूत होतो. शरीराशीं संयुक्त झाल्यावर हा प्राण अनेक स्वरूपें घेऊन शरीराची व्यवस्था चालवितो. प्राणापानादि याचे मुख्य पांच विभाग आहेत व त्यांच्याकडून तो निरनिराळी कामें करून घेतो. ही कामें कोणती हें-मुळांत स्पष्ट रीतीनें सांगितलें आहे. पांचव्या मंत्रांत सात ज्वाळांचा उल्लेख आहे, तो ध्यानांत ठेवण्यासारखा आहे. पायु, उपस्थ, २ नेत्र, २ कर्ण, आणि मध्य हा प्राण, अपान आणि समान यांनीं उत्पन्न केलेल्या सात ज्वाळा होत. या ज्वाळांच्या योगानें पाहाणें, ऐकणें, पचन होणें, मल विसर्जन करणें आणि आनंदोपभोग घेणें हीं कार्यें जीवास करितां येतात. व्यानाकडे रक्ताभिसरण करणें, आणि बाहेरची बातमी आंत देणें आणि आंतून सुटलेले हुकूम बाहेर बजावणें हीं कार्यें होतात. जीवाच्या हृदयाकाशांत जीवात्मा राहातो. त्याच्या उपयोगी पडणारें व्यानाचें हें तारायंत्र–चक्र आहे. बाहेर असलेल्या पदार्थांची बातमी या तारायंत्रानें आंत पोहोंचते आणि जीवात्मा काहीं करावें असें वाटलें तर तो आपले हुकूम या तारायंत्राच्या द्वारें बाहेर सोडतो. उदानाकडे जीवाच्या पापपुण्यानुसार त्यास गति देणें हें काम आहे. असो; याचें बाह्यस्वरूप व अध्यात्म स्वरूप यांचें वर्णन मूळांत स्पष्ट केलें आहे. याप्रमाणें प्राणाच्या गमनागमनाचा, उत्पत्तीचा आणि कर्मविभाजनाचा विचार या प्रश्नांत केला आहे.

या तीन प्रश्नांत प्राणाचीं निरनिराळीं स्वरूपें त्याचा आत्म्याशीं संबंध, त्याचें श्रेष्ठत्व, त्याची उत्पत्ति इत्यादि अनेक विषयांचा विचार करून प्राणाचें स्वरूप यथास्थित समजेल अशी व्यवस्था केली आहे आणि फलश्रुति अशी सांगितली आहे कीं, ज्या जीवाला प्राणाचें स्वरूप समग्र आणि सांगोपांग कळेल तो पुरुष इहलोकीं व परलोकीं प्राणसम अमरत्वाचा उपभोग घेईल.

तिसरा प्रश्न समाप्त.

---

## चौथा प्रश्न.

### मंत्र पहिला.

**अथ हैनं सौर्यायणी गार्ग्यः पप्रच्छ ॥**

अन्वय व अर्थ—अथ ह एनं सौर्यायणी गार्ग्यः पप्रच्छ ( नंतर सूर्यकुलांतील गर्गगोत्रोद्भव कुमार हा पिप्पलादमुनीस प्रश्न विचारता झाला,–

अथ हैनं सौर्यायणी गार्ग्यः पप्रच्छ प्रश्नत्रयेणापरविद्यागोचरं सर्वं परिसमाप्य संसारं व्याकृतविषयं साध्यसाधनलक्षणमनित्यम् । अथेदानीमसाध्यसाधनलक्षणमप्राणममनोगोचरमतीन्द्रियविषयं शिवं शान्तमविकृतमक्षरं सत्यं परविद्यागम्यं पुरुषाख्यं सबाह्याभ्यन्तरमजं वक्तव्यमित्युत्तरं प्रश्नत्रयमारभ्यते ।

सिद्धान्ती—नंतर सौर्यायणी पिप्पलादाचार्यांस विचारता झाला.

शिष्य—मागच्या ज्या तीन प्रश्नांची मीमांसा झाली तसलाच प्रश्न आता हा गार्ग्य विचारणार आहे काय?

सिद्धान्ती—नाहीं. पहिले जे तीन प्रश्न आहेत ते सर्व अपरविद्यागोचर आहेत.

शिष्य—अपरविद्या म्हणजे?

सिद्धान्ती—ज्या विद्येंत परम तत्त्वाचा विचार होत नाहीं, जेथें संसाराचा म्हणजे दृश्य विषयाचा मात्र विचार होतो—हे विषय व्याकृत असून कार्यकारणात्मक व अनित्य असतात—अशा विषयांचा जीं शास्त्रें विचार करितात त्यांस अपर विद्येचीं शास्त्रें असें म्हणावें. पहिले तीन प्रश्न अशा प्रकारचे आहेत. आतां या पुढें जे तीन प्रश्न यावयाचे आहेत. त्यांचे विषय साध्य–साधनात्मक अथवा कार्य–कारणात्मक नाहींत. या प्रश्नांतील वस्तु नित्य आहे. ती उत्पन्न होऊन नष्ट होणारी नाहीं. ती अन्य कारणापासून सिद्ध झालेली वस्तु नव्हे. ती वस्तु विकृत होऊन कोणतेंही कार्य उत्पन्न करीत नाहीं. ती वस्तु प्राणाचा आत्मा असून प्राणास आश्रय देणारी नाहीं. ही मनाला गोचर होणारी नाहीं; कारण ही कोणत्याही इंद्रियाचा ज्ञानविषय होत नाहीं. या प्रश्नांत प्रतिपादन केलेली वस्तु शिव ( मंगलरूप ) शांत, विकारशून्य, अक्षर, सत्य, परविद्येनें मात्र समजणारी व पुरुषोत्तम नांवाची आहे. ही अंतर्बाह्य एकस्वरूप आहे. म्हणून तिला आंत बाहेर असें कांहीं नाहीं. आणि ती अज, म्हणजे अनादि व अनंत आहे. सारांश, पुढील तीन प्रश्नांत कमी जास्ती प्रमाणानें परब्रह्मविषयाचा मात्र विचार केला आहे. हें परब्रह्म कार्य–कारणशून्य, दुर्ज्ञेयेंद्रियागोचर, सुखरूप, अविकार्य, अविकारी, अक्षर, त्रिकालाबाधित, एकरस, श्रुतिमात्रगम्य अशा स्वरूपाचें आहे, असें येथें सांगावयाचें आहे.

तत्र सुदीप्तादिवाग्नेर्यस्मात्तथाऽक्षरात्सर्वे भावा विस्फुलिङ्गा इव जायन्ते तत्र चैवापियन्तीत्युक्तं द्वितीये मुण्डके, के ते सर्वे भावा अक्षराद्विभज्यन्ते । कथं वा विभक्ताः सन्तस्तत्रैवापियन्ति । किंलक्षणं वा तदक्षरमिति । एतद्विवक्षयाऽधुना प्रश्नानुद्भावयति—

कर्ता म्हणवत नाहीं. आपल्या हातांतील खुरपणें टाकून दिल्यानंतर हात स्वव्यापारापासून निवृत्त होतात, पण हातांस आणि स्वकर्मांचा त्याग केलेल्या पायांस केव्हांही एकरूपत्व प्राप्त झालेलें आपल्यास दिसत नाहीं. महाराज, ह्याचप्रमाणें जीव गाढ निद्रा घेत असतां स्वव्यापारमुक्त झालेलीं त्याचीं ज्ञानकर्मेंद्रियें निरनिराळेपणानें कोणत्या ठायीं राहतात; असें प्रश्नकर्त्यांस विचारावयाचें आहे. तुम्ही एकरसत्वाचा किंवा एकीभवनाचा जो विचार काढला आहे, गाढ निद्रा घेत असणाऱ्या पुरुषाचीं ज्ञानकर्मेंद्रियें एकरस होऊन राहतात, असा जो प्रश्न उत्पन्न करीत आहांत, त्याला मूलमंत्रामध्यें आधारच नाहीं. म्हणून तुम्ही मूळ प्रश्नांचें जें विवरण करित आहांत तें योग्य नाहीं.

सिद्धान्ती—ही तुमची शंका बरोबर आहे. ज्या अर्थी यजमानाच्या (जीवाच्या) वशानें चालणारीं इंद्रियें जागृत अवस्थेमध्यें एकवट होतात, त्याअर्थी निद्रेमध्यें सुद्धां एकत्र झालेलीं इंद्रियें परतंत्र असल्यामुळें त्यांचा समागम कोठेंतरी झाला पाहिजे, हें म्हणणें बरोबर आहे, न्याय्य आहे आणि म्हणून जशी मनामध्यें आशंका असेल तशीच ती आपल्या वाणीनें प्रत्येक विशाद री प्रकट करीत असतो. येथें गार्ग्य मुनीस असें विचारावयाचें आहे कीं, जेथें हा सर्व कार्य-करण-संघात ( कार्य म्हणजे शरीर, करण म्हणजे इंद्रियें आणि संघात म्हणजे संमेलन कार्य-कारण संघात म्हणजे शरीरेंद्रियाचें समेलन ) लीन होतो तें काय असावें. सुषुप्तिकाळीं आणि प्रलयकाळीं या सर्व संघाताचा लय होतो. तेव्हां सुषुप्ति काळ आणि प्रलयकाळ यांच्यामध्यें काय विशेष आहे हें समजण्याची इच्छा धारण करून गार्ग्यमुनीनें प्रश्न विचारला आहे कीं, शरीरेंद्रियांच्या समेलनाचा लय कोठें होतो. आणि त्याचें आश्रयस्थान कोण होतो. ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

तस्मै स होवाच । यथा गार्ग्य मरीचयोऽर्कस्यास्तं गच्छतः सर्वा एतस्मिंस्तेजोमण्डल एकीभवन्ति । ताः पुनः पुनरुदयतः प्रचरन्त्येवं ह वै तत्सर्वं परे देवे मनस्येकीभवति । तेन तर्ह्येष पुरुषो न शृणोति न पश्यति न जिघ्रति न रसयते न, स्पृशते नाभिवदते नाऽऽदत्ते नाऽऽनन्दयते न विसृजते नेयायते स्वपितीत्याचक्षते ॥ २ ॥

अन्वय व अर्थ—तस्मै सः ह उवाच ( गार्ग्याला पिप्पलादमुनींनी उत्तर दिलें ) गार्ग्य, यथा अस्तं गच्छतः अर्कस्य सर्वाः मरीचयः एतस्मिन् तेजोमंडले एकीभवन्ति, पुनः पुनः ताः—तस्य उदयतः प्रचरन्ति ( हे गार्ग्य, अस्तास जाणाऱ्या सूर्याचे सर्व किरण ह्या तेजो–मंडलांत एकरूप होतात; आणि पुनः पुनः सूर्याचा उदय झाला असतां, त्याप्रमाणें सर्व विश्वभर संचारून प्रकाशित होतात. ) एवं ह वै तत् सर्वं परे देवे मनसि एकीभवति ( त्याप्रमाणें हें सर्व–श्रेष्ठ आणि दिव्य जें मन त्यांत हीं सर्व एक होतात. ) तेन तर्हि एषः पुरुषः न शृणोति, न पश्यति, न जिघ्रति, न रसयते, न स्पृशते, न अभिवदते, न आदत्ते, न आनन्दयते, न विसृजते, न इयायते, स्वपिति इति आचक्षते ( म्हणून हा पुरुष ऐकत नाहीं, पहात नाहीं, वास घेत नाहीं, चव घेत नाहीं, स्पर्श करीत नाहीं, बोलत नाहीं, ग्रहण करीत नाहीं, आनंद पावत नाहीं, मल–विसर्जन करीत नाहीं, जात–येत नाहीं; सारांश, तो निजतो; असें म्हणतात. ) ॥ २ ॥

तस्मै स होवाचाऽऽचार्यः । शृणु हे गार्ग्य यत्त्वया पृष्टम् । यथा मरीचयो रश्मयोऽर्कस्याऽऽदित्यस्यास्तमदर्शनं गच्छतः सर्वा अशेषत एतस्मिंस्तेजोमण्डले तेजोराशिरूप एकीभवन्ति विवेकानर्हत्वमविशेषतां गच्छन्ति, मरीचयस्तस्यैवार्कस्य ताः पुनःपुनरुदयत उद्गच्छतः प्रचरन्ति विकीर्यन्ते । यथाऽयं दृष्टान्तः । एवं ह वै तत्सर्वं विषयेन्द्रियादिजातं परे प्रकृष्टे देवे द्योतनवति मनसि चक्षुरादिदेवानां मनस्तन्त्रत्वात्परो देवो मनस्तस्मिन्स्वप्नकाल एकीभवति, मण्डले मरीचिवदविशेषतां गच्छति । जिजागरिषोश्च रश्मिवन्मण्डलान्मनस एव प्रचरन्ति ( ति ) स्वव्यापाराय प्रतिष्ठन्ते ( ते ) यस्मात्स्वप्नकाले श्रोत्रादीनि शब्दाद्युपलब्धिकरणानि मनस्येकीभूतानीव करणव्यापारादुपरतानि तेन तस्मात्तर्हि तस्मिन्स्वापकाल एष देवदत्तादिलक्षणः पुरुषो न शृणोति न पश्यति न जिघ्रति न रसयते न स्पृशते नाभिवदते नाऽऽदत्ते नाऽऽनन्दयते न विसृजते, नेयायते, स्वपितीत्याचक्षते लौकिकाः ॥ २ ॥

सिद्धान्ती—गार्ग्याचा प्रश्न ऐकून पिप्पलादाचार्य म्हणाले, हे गार्ग्य, तूं जें काय मला विचारलें आहेस त्याचें उत्तर ऐक. ज्या प्रमाणें अस्ताप जाणाऱ्या

( मावळणाऱ्या ) सूर्याचे रश्मि ( सर्व किरण ) या तेजोमंडळांत ( तेजाची जी राशि आहे त्यांमध्यें ) एक होतात. सर्व एका ठिकाणीं जाऊन मिळतात—

शिष्य—एका ठिकाणीं जाऊन मिळतात म्हणजे ?

सिद्धान्ती—हा किरण अमका, तो तमका, असा जेथें विशेष काढितां येत नाहीं, ओळखण्याचें चिन्ह असत नाहीं, असे एक—स्वरूप होतात, सर्व—पार्थर्व एका जागीं जाऊन मिसळतात. पण सूर्याचा पुनः पुनः उदय झाला, दिग्मंडलावर तो प्रकाशित झाला म्हणजे हींच किरणें दशदिशेच्या अंतापर्यंत जाऊन पसरतात; त्याप्रमाणें—

शिष्य—म्हणजे सूर्य मावळला असतां सर्व किरण एकत्र होऊन तेजोराशींत जाऊन मिसळतात व तो उगवला म्हणजे सर्वत्र पसरलेले असे दृग्गोचर होतात त्याप्रमाणें, असेंचना ?

सिद्धान्ती—होय. ह्या दृष्टांताप्रमाणें येथें आपले सर्व विषय आणि इंद्रियें हीं सर्व अति श्रेष्ठ व सुप्रकाशित असणाऱ्या मनांमध्यें—

शिष्य—मनाला श्रेष्ठ म्हटलें याचें कारण सर्व इंद्रियें मनाच्या तंत्रानें चालतात. इंद्रिय देवता मनोदेवतेच्या स्वाधीन आहेत, म्हणून हें श्रेष्ठत्व आलें आहे ?

सिद्धान्ती—होय. असो, या मनामध्यें सर्व इंद्रियें स्वप्नकालीं एक होतात तसेच त्यांचे विषयही एकरूप होतात.

शिष्य—तेजोमंडळांत सर्व किरण एकरूप होतात त्याप्रमाणें मनाचे ठिकाणीं सर्व इंद्रियें आणि त्यांचे विषय एक होतात. यावेळीं विषयाची अथवा इंद्रियांची निवडानिवड करितां येत नाहीं.

सिद्धान्ती—पण ज्यावेळीं जाग्रत अवस्था प्राप्त होते त्यावेळीं सर्व इंद्रियें आणि त्यांचे विषय आपापले देवसेवीचे व्यापार करण्यास प्रवृत्त होतात. तेजोमंडळांतून किरण बाहेर पडून दश दिशेकडे धांवत जातात; त्याप्रमाणें जाग्रत झालेल्या मनापासून इंद्रियें व त्यांचे विषय जाग्रत होऊन स्वकार्य करण्याला सिद्ध होतात.

पूर्वपक्षी—असें कसें म्हणतां ? स्वप्नकालीं ही आपण पाहतों, ऐकतों, खातों, पितों, बोलतों, इत्यादि अनुभव प्रसिद्ध आहे. इंद्रियांचे व्यापार किंवा विषयांचें प्रकाशन या वेळीं स्तब्ध होत नाहीं. स्वप्नांत कितीकवेळीं मी पुष्कळ ठिकाणीं गेलों आहें व पुष्कळ गोष्टी बघितल्या आहेत.

सिद्धान्ती—तुम्हीं आमचा अभिप्राय समजला नाहीं. स्वप्नामध्यें जे आपण इंद्रियांच्या साहाय्यानें व्यापार करितों, ते सर्व वासनामय आहेत. शब्दादिक बाह्य विषयांचें ग्रहण श्रोत्रादि इंद्रियें करीत नाहींत. हीं इंद्रियें

त्यावेळीं व्यापार-शून्य असतात. म्हणून आमचें म्हणणें यथार्थच आहे. यावेळीं इंद्रियें कांहीं करीत नाहींत. तीं स्तब्ध शांत, आणि व्यापार-शून्य असतात. तीं सर्वस्वी सर्व आपल्या स्वामीच्या मनाच्या ठिकाणीं लीन झालेलीं असतात. विषयप्रकाशन करणारीं ज्ञानेंद्रियें व विषयांचा संयोग-वियोग करणारीं कर्मेंद्रियें एक होऊन मनाच्या ठिकाणीं लीन होतात. यावेळीं त्यांस आपले व्यापार करितां येत नाहींत. म्हणून स्वप्नकाळीं देवदत्तादि पुरुष कांहीं ऐकत नाहीं, पहात नाहीं, त्याला वास येत नाहीं, स्वाद समजत नाहीं, स्पर्श कळत नाहीं, बोलतां येत नाहीं, देतां घेतां येत नाहीं, त्याला रतिसुखाचा आनंद होत नाहीं, तो मलविसर्जन करीत नाहीं, किंवा कोठें जात येत नाहीं. अशी स्थिति असली म्हणजे व्यवहारांत आपण देवदत्त निजला आहे असें म्हणतों.

शिष्य—सर्व इंद्रियें एकरूप होतात म्हणजे काय ?

सिद्धान्ती—आपापले व्यापार सोडून मनाच्या ठिकाणीं एकत्र राहणें हा तीं इंद्रियें एकरूप होतात, याचा अर्थ आहे. मनाची घटना निराळी आणि प्रत्येक इंद्रियाची घटना निराळी म्हणून त्यांचें एकस्वरूप होणें हें अशक्य आहे. म्हणूनच भाष्यामध्यें आचार्यांनीं 'इव' शब्दाची योजना केली आहे. एक होतात म्हणजे एका ठिकाणीं राहतात. इंद्रियें आपले व्यापार सोडितात; पण आपले गुणधर्म टाकीत नाहींत, हें 'इव' या शब्दानें आचार्यांनीं सुचविलें आहे.॥२॥

---

## मंत्र तिसरा.

**प्राणाग्नय एवैतस्मिन्पुरे जाग्रति । गार्हपत्यो ह वा एषोऽपानो व्यानोऽन्वाहार्यपचनो यद्गार्हपत्यात्प्रणीयते प्रणयनादाहवनीयः प्राणः ॥ ३ ॥**

अन्वय व अर्थ—प्राणाग्नयः एव एतस्मिन् पुरे जाग्रति (ह्या देहामध्यें प्राणाग्नि मात्र जागृत राहतात.) गार्हपत्यः ह वै एषः अपानः (हा अपानवायु गार्हपत्य अग्नि आहे.) व्यानः अन्वाहार्यपचनः (व्यानवायु हा अन्वाहार्यपचन म्हणजे दक्षिणाग्नि होय.) यत् गार्हपत्यात् प्रणीयते, प्रणयनात् प्राणः आहवनीयः (आणि गार्हपत्यापासून आहवनीय अग्नि प्रणयन करितो म्हणून त्याला आहवनीयाग्नि म्हणतात.)

सारांश, प्राणापान व्यान हे तीन शरीरस्थ वायु अग्निहोत्रापैकीं तीन अग्नि आहेत. अग्निहोत्रांतील गार्हपत्य, दक्षिण आणि आहवनीय हे तीन अग्नि होत.॥३॥

सुप्तवत्सु श्रोत्रादिषु करणेष्वेतस्मिन्पुरे नवद्वारे देहे प्राणाग्नयः प्राणादिपञ्चवायवोऽग्नय इवाग्नयो जाग्रति । अग्निसामान्यं हि । गार्हपत्यो ह वा एषोऽपानः । कथमित्याह—यस्माद्गार्हपत्यादग्नेरग्निहोत्रकाल इतरोऽग्निराहवनीयः प्रणीयते प्रणयनात्प्रणीयतेऽस्मादिति प्रणयनो गार्हपत्योऽग्निः । तथा सुप्तस्यापानवृत्तेः प्रणीयत इव प्राणो मुखनासिकाभ्यां संचरत्यत आहवनीयस्थानीयः प्राणः । व्यानस्तु हृदयाद्दक्षिणसुषिरद्वारेण निर्गमाद्दक्षिणदिक्संबन्धाद्दन्वाहार्यपचनो दक्षिणाग्निः ॥ ३ ॥

सिद्धान्ती—कर्णनेत्रादि सर्व इंद्रियें स्तब्ध झाली असतां या नऊ द्वारें असणाऱ्या देहांत प्राणापानादि पंच वायु अग्नीसारखे नित्य जागृत असतात.

शिष्य—इंद्रियें स्तब्ध झाली तरी प्राणापानादि वायु जागे असतात, हा मलाही अनुभव आहे. पण ह्या प्राणांस अग्नीची उपमा दिली आहे, त्याचें रहस्य काय ?

सिद्धान्ती—अग्निहोत्राचा विधि चालला असतां गार्हपत्य अग्नीपासून आहवनीय अग्नीला नेतात, त्याचें प्रणयन करितात, म्हणून त्याला आहवनीय अग्नि म्हणतात. गार्हपत्य अग्नि गृहस्थाच्या येथें नित्य असतो. अग्निहोत्रकाली मात्र आहवनीय अग्नीची स्थापना होते. त्यावेळीं तो अग्नि गार्हपत्य अग्नीपासूनच नेत असतात व म्हणून त्याला आहवनीय अग्नि म्हणतात. याचप्रमाणें प्रसुप्त झालेल्या पुरुषाच्या अपान वायुवृत्तीपासून प्राणवायु, प्रसृत होऊन मुखाच्या आणि नासिकाच्या द्वारानें व्यापार करितो. म्हणून त्याला प्राण असें म्हणतात. आणि अपानाला गार्हपत्य अग्नीची उपमा दिली म्हणजे प्राणवायूची योजना आहवनीयअग्नीचें पद प्राप्त करून घेण्यामध्येंच केली पाहिजे. आतां व्यान वायु हृदयांतून दक्षिण छिद्राच्या द्वारानें निघतो म्हणून त्याला दक्षिणदिशेकडे संबंध असणारा जो अन्वाहार्यपचन अग्नि असतो, त्याची उपमा दिली आहे.

शिष्य—अन्वाहार्यपचन म्हणजे काय ?

सिद्धान्ती—प्रति महिन्यांत जें दर्शश्राद्ध आपण करितों त्याला अन्वाहार्य असें म्हणतात. त्यावेळीं जो अग्नि आपण प्रज्वलित करितों, त्याला अन्वाहार्यपचन किंवा दक्षिणाग्नि म्हणतात. याप्रमाणें प्राण, अपान आणि व्यान यांस आहवनीय, गार्हपत्य आणि दक्षिण अग्नीची उपमा श्रुतीनें दिली आहे.

---

## मंत्र चवथा.

**यदुच्छ्वासनिश्वासावेतावाहुती समं नयतीति स समानः। मनो ह वाव यजमान इष्टफलमेवोदानः स एनं यजमानमहरहर्ब्रह्म गमयति ॥ ४ ॥**

अन्वय व अर्थ—यत् उच्छ्वासनिश्वासौ, एतौ आहुती, समं नयति, इति सः समानः (उच्छ्वास आणि निश्वास या दोन आहुतींना जो समस्थितीला नेतो त्याला समानवायु असें म्हणतात.) मनः ह वाव यजमानः (मन हें यजमानस्वरूपी आहे.) इष्टफलं एव उदानः (जें इष्ट फल आपल्यास प्राप्त होईल, तें उदानवायु-कृत होय.) सः एनं यजमानं अहरहः ब्रह्म गमयति (हा उदानवायु मनोरूपी यजमानाला प्रतिदिवशी ब्रह्माकडे घेऊन जातो.)

सारांश, या मंत्रांत समान, उदान, आणि मन यांचे अग्निहोत्रस्थ व्यापार सांगितले आहेत. ॥ ४ ॥

अत्र च होताऽग्निहोत्रस्य यद्यस्मादुच्छ्वासनिश्वासावग्निहोत्राहुती इव नित्यं द्वित्वसामान्यादेव त्वेतावाहुती समं साम्येन शरीरस्थितिभावाय नयति यो वायुरग्निस्थानीयोऽपि होता चाऽऽहुत्योर्नेतृत्वात्। कोऽसौ स समानः अतश्च विदुषः स्वापोऽप्यग्निहोत्रहवनमेव। तस्माद्विद्वान्नाकर्मीत्येवं मन्तव्य इत्यभिप्रायः। सर्वदा सर्वाणि भूतानि विचिन्वन्त्यपि स्वपत इति हि वाजसनेयके। अत्र हि जाग्रत्सु प्राणाग्निषूपसंहृत्य बाह्यकरणानि विषयांश्चाग्निहोत्रफलमिव स्वर्गं ब्रह्म जिगमिषुर्मनो ह वाव यजमानो जागर्ति यजमानवत्कार्यकरणेषु प्राधान्येन संव्यवहारात्स्वर्गमिव ब्रह्म प्रति प्रस्थितत्वाद्यजमानो मनः कल्प्यते। इष्टफलं यागफलमेवोदानो वायुः। उदाननिमित्तत्वादिष्टफलप्राप्तेः। कथम्, स उदानो मन आख्यं यजमानं स्वप्नवृत्तिरूपादपि प्रच्याव्याहरहः सुषुप्तिकाले स्वर्गमिव ब्रह्माक्षरं गमयति। अतो यागफलस्थानीय उदानः ॥ ४ ॥

सिद्धान्ती—प्राणपंचकावर जें श्रुतीनें अग्निहोत्राचें रूपक केलें आहे, त्यांत तीन अग्नींची मात्र व्यवस्था लागली. आतां, होता आणि फळ यांची व यजमानाची व्यवस्था लागली पाहिजे. ह्या रूपकांत होता म्हणजे होमाचा कर्ता

ऋत्विज् कोण? ह्या प्रश्नाला पहिल्या प्रथम येथें उत्तर आहे. ऐक-उच्छ्वास आणि निश्वास हे अग्निहोत्रांतील आहुतींप्रमाणें आहेत, कारण अग्निहोत्र विधींत नित्य दोनच आहुती लागतात. एक उच्छ्वास आणि एक निश्वास मिळून दोहोंची संख्या होते. म्हणून यां उच्छ्वास-निश्वासांस आहुति, असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. आणि या दोन आहुति सारख्याच प्रकारानें शरीर संरक्षणाच्या कामीं दक्ष असणारा समान वायु तो उपयुक्त करितो, शरीरसंरक्षणाच्या कामीं उच्छ्वास निश्वासरूपी दोन आहुति समरूप करून त्यांचाच उपयोग करितो, तो वायु अग्निस्थानीय जरी आहे तथापि त्याला होता असें म्हणतात.

शिष्य—तो आहुति नेतो म्हणून वाटतें ?

सिद्धान्ती—अग्निहोत्री प्रतिदिवशीं दोन आहुति आहवनीय अग्नीला देतो म्हणून त्याला होता असें म्हणतात. यात्रमाणेंच जो वायु उच्छ्वास-निश्वासाच्या आहुति प्राणाला नित्य देतो, त्याला ही होता असें म्हटलें पाहिजे.

शिष्य—हा वायु तरी कोणता ?

सिद्धान्ती—हा समान वायु होय.

पूर्वपक्षी—अहो, सर्व प्राण अग्निरूपी आहेत असें तिसऱ्या मंत्रांत प्रारंभींच सांगितलें आहे. मग येथें समानालाच होतृत्व कसें सांगता ?

सिद्धान्ती—कारण तो नित्य आहुति देतो. वर जी प्राणांला अग्नीची पदवी दिली आहे, ती अग्निरूप असणाऱ्या व नसणाऱ्या वस्तूंस दिली आहे. म्हणून येथें समान वायूला ' होता ' असें म्हटलें.

पूर्वपक्षी—म्हणजे तुमच्या म्हणण्याचा अभिप्राय हा कीं, समान वायूच्या साहाय्यानें आपण या अग्निहोत्रांतील अग्नीला नित्य आहुति देत जाव्या व याप्रमाणें लक्षणेनें अग्नीची स्थापना करून त्याची उपासना करावी.

सिद्धान्ती—नाहीं. हा अभिप्राय नव्हे; कारण येथें निर्विशेष ( एकत्व, भेदशून्य ) आत्मप्रकरण चाललें आहे. तेव्हां येथें उपासनेची अपेक्षा नाहीं. शिवाय तिन्ही अवस्थांमध्यें ( जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति या तीन अवस्थांमध्यें ) जीवांचे श्वासोच्छ्वास चाललें असतात. हें नित्य घडत आहे म्हणून उपासनेचा येथें संबंध नाहीं. श्वासोच्छ्वासावर आहुतींची जी लक्षणा केली आहे, ती केवळ इंद्रियें स्तब्ध होतात आणि प्राण जागत राहतात यावरून होय. त्व पदार्थाचें ( जीवाचें ) शोधनरूप जें ज्ञान त्याची स्तुति चालली आहे. येथें ज्ञानाची स्तुति आहे. उपासनेचा किंवा कर्माचा संबंध नाहीं. म्हणून विद्वान् जे पुरुष आहेत त्यांची सुषुप्तिमुद्रा अग्निहोत्रस्थ हवनरूप होते. गाढ निद्रेंतही यांचें हवनरूपी कर्म सहज होत असतें. हाच अजपाजप होय. नित्य जो विद्वान पुरुष आत्म-चिंतनांत मग्न असतो त्याचे श्वासोच्छ्वासही आहुति-

रूप होत असतात. असें आहे म्हणून विद्वान् पुरुष अकर्मी आहे, असें केव्हांही मानतां येत नाहीं. त्याचा अजपाजप सदैव चालू असतो. हा अभिप्राय आहे. वाजसनेयक श्रुति म्हणते कीं, गाढ निद्रेचा उपभोग घेणारा विद्वान् झोपेमध्येंही सर्व भूतांच्या द्वारानें अग्निचयन करून अग्निहोत्राची सांगता करीत असतो. येथेंही असेंच म्हटलें आहे कीं प्राणाग्नि जागृत असतां सर्वबाह्य इंद्रियांचा व विषयांचा उपसंहार करून या ज्ञानी मुमुक्षूचें मन यजमानत्व पद प्राप्त करून घेतें. अग्निहोत्राचें फल स्वर्गप्राप्ति हें आहे. त्याप्रमाणें ब्रह्मचिंतन करणाऱ्या मनाला ब्रह्मप्राप्तीचें फल मिळतें. येथें मन यजमानाच्या स्थानीं असतें आणि सदैव जागृत राहतें. ज्याप्रमाणें यजमान कार्यांचे ठिकाणीं आणि करणांचे ( साधनांचे ) ठिकाणीं प्रधानत्वानें (मुख्यपणानें ) व्यवहार करितो आणि स्वर्गप्राप्तीचें साधन सिद्ध करितो. त्याप्रमाणें ब्रह्माकडे जाण्यास सिद्ध झालेलें जागृत मन यजमानस्थानापन्न होतें.

शिष्य—प्राण हे अग्नि, श्वासोच्छ्वास या आहुति, समानवायु होता, आणि मन यजमान, हें रूपक ठीक जुळलें. आतां येथें इष्ट फल कोणतें आहे?

सिद्धान्ती—अग्निहोत्र्याला जसा स्वर्ग इष्ट, त्याप्रमाणें विद्वानाला मोक्षफल हें इष्ट आहे. मरण प्राप्त होण्याची वेळ आली असतां ज्ञानी जीव उदान वायूच्या साहाय्यानें मस्तकांत जें ब्रह्मरंध्र आहे तें फोडून त्या मार्गानें मोक्षलोकाप्रत जातो. उदान वायु हें मोक्षाचें साधन आहे. म्हणून येथें उदान वायूलाच इष्ट फल असें म्हटलें.

शिष्य—येथें कारणाला कार्यरूपानें संबोधिलें आहे. मला असें विचारावयाचें आहे कीं विद्वान् पुरुष नित्य झोपीं जातो, तेव्हां त्याचें मन काय करीत असतें?

सिद्धान्ती—उदान वायूचें कार्य तुला समजलेंच. विद्वान् पुरुष गाढ निद्रा घेत असतां मनाला म्हणजे यजमानाला स्वप्नांच्या वृत्तींतून ओढून काढून सुषुप्तिकालीं त्या मनाला ब्रह्मस्थिति प्राप्त करून देतो. ब्रह्म अक्षर आहे. हें तुला ठाऊकच आहे. यजमानाला जशी स्वर्गप्राप्ति त्याप्रमाणें ज्ञानी पुरुषाच्या मनाला ब्रह्मप्राप्ति होत असते. ही प्राप्ति करून देणाऱ्या उदानाला इष्ट फल असें म्हटलें.

पूर्वपक्षी—मग हा उदान वायु अज्ञानी पुरुषालाही ब्रह्मप्राप्ति करून देत असेल?

सिद्धान्ती—आपण निद्रावश झालों, आपलीं सर्व इंद्रियें स्तब्ध झालीं, विषय विनिवृत्त झाले, बाह्य वस्तूंचें चिंतन संपलें, म्हणजे आपल्यास गाढ निद्रा आली असें आपण म्हणतों. यावेळीं प्राणांशिवाय बाकीचीं सर्व साधनें

व्यापारशून्य असतात. ही स्थिति सर्व जीवांना सारखीच आहे. पण विद्वान् पुरुषाचें मन अहोरात्र ब्रह्मचिंतन करीत असतें; म्हणून निद्रेमध्येंही त्याचें ब्रह्मज्ञान जागृत असतें. अज्ञानी पुरुषाचें मन व्यापारशून्य असतें तरी तें जागृत असतें हें खरें; पण त्याला त्यावेळीं कोणत्याही वस्तूचें ज्ञान नसतें. तें पूर्ण अज्ञानी असतें. म्हणून गाढ निद्रेमध्यें आपणा सर्वांना जरी ब्रह्मप्राप्ति होते; तथापि आपल्याला ती समजत नाहीं; आणि ज्ञानी पुरुषाला समजते. एवंच ज्ञानी पुरुषाचें मन मात्र यजमानस्वरूपी होऊन ब्रह्मप्राप्ति करून घेतें. इतरांच्या अज्ञानी मनाला हा लाभ मिळत नाहीं. असो; याप्रमाणें पंचप्राणांची व्यवस्था लागली. प्राण, अपान आणि व्यान हे आहवनीय, गार्हपत्य व दक्षिणाग्नि; समान प्राण हा होता, उदान हा इष्ट फल, श्वासनिश्वास या आहुति आणि मन यजमान असा सर्व संग्रह होऊन प्राण हे वायुशरीररक्षक होतात असें ठरलें. गार्हपत्य अग्नि जसें गृहाचें रक्षण करितो त्याप्रमाणेंहि तीन वायु प्राण शरीराचें रक्षण करितात. उदान वायु सुषुम्नानाडीच्या द्वारानें ब्रह्मरंध्रांत शिरून तेथें मनाला नेतो. आणि ब्रह्मप्राप्ति करून देतो. असा उदान वायूचा महिमा आहे. ॥ ४ ॥

---

एवं विदुषः श्रोत्राद्युपरमकालादारभ्य यावत्सुप्तोत्थितो भवति तावत्सर्वयागफलानुभव एव नाविदुषामिवानर्थायेति विद्वत्ता स्तूयते । न हि विदुष एव श्रोत्रादीनि स्वपन्ते प्राणाग्नयो वा जाग्रति जाग्रत्स्वप्नयोर्मनः स्वातन्त्र्यमनुभवदहरहः सुषुप्तं वा प्रतिपद्यते । समानं हि सर्वप्राणिनां पर्यायेण जाग्रत्स्वप्नसुषुप्तिगमनमतो विद्वत्तास्तुतिरेवेयमुपपद्यते । यत्पृष्टं कतर एष देवः स्वप्नान्पश्यतीति तदाह—

सिद्धान्ती—याप्रमाणें कर्ण नेत्रादि इंद्रियें व्यापारशून्य झाल्यापासून गाढ निद्रेतून उठेतोंपर्यंत असणारा सगळा काळ विद्वानाला ज्ञानरूपी यज्ञाच्या फलाचा म्हणजे मोक्षसुखाचा अनुभव देतो. अज्ञानी पुरुषाला मात्र [illegible] अनुभव मिळत नाहीं. म्हणून अज्ञान हें अनर्थ उत्पन्न करणारें आहे; जीवाला जन्ममरण-रूपी दुःखमय संसारांत ढकलणारें आहे, असें झालें. [illegible] अभिप्राय मनांत आणून येथें विद्वत्तेची स्तुति केली आहे. श्रोत्रादि बाह्येंद्रियांचा धर्म जीवास जागें ठेव-ण्याचा आहे. प्राणांचा धर्म, शरीररक्षण करणें हा आहे; इंद्रियें व प्राण आत्म-धर्मात्मिक नाहींत, आत्मा हा निराळाच आहे, असें त्वं पदार्थाचा विवेक करितां करितां ज्ञानी पुरुषाला मान समजतें. अशीहि ज्ञानी पुरुषाची स्तुति आहे. आतांच ग्रन्थांत सांगितलें कीं ज्ञानी पुरुषाचीं मात्र इंद्रियें निजतात; व प्राण जागृत राहतात व जागृतींत व सुषुप्तींत विद्वानाचें मात्र मन स्वातंत्र्य सुखाचा अनुभव घेतें, किंवा निद्रासुखाचा अनुभव घेतें, असें नाहीं. सर्व

प्राण्यांना तिन्ही अवस्थांची ( जागृति, स्वप्न आणि सुषुप्तीची ) प्राप्ति होते. मात्र विद्वानाचें मन स्वातंत्र्य-सुखाचा अनुभव घेते आणि अविद्वानाचें मन अज्ञानांत जातें, इतकाच उभयतांमध्यें विवेक आहे. तेव्हां विद्वत्तेची स्तुति केली हें योग्यच आहे. याप्रमाणें दुसऱ्या प्रश्नाचें उत्तर झालें. सर्वांचे प्राण जागृत राहतात आणि विद्वानाचें मात्र मन जागृत (ज्ञानावस्था) राहतें. हें दुसऱ्या प्रश्नाला श्रुतीनें उत्तर दिलें आहे, तिसरा प्रश्न असा आहे कीं कोणता देव स्वप्नस्थितीचा साक्षी असतो. त्याला पांचव्या मंत्रांत उत्तर दिलें आहे.

## मंत्र पांचवा.

**अत्रैष देवः स्वप्ने महिमानमनुभवति । यद्दृष्टं दृष्टमनुपश्यति श्रुतं श्रुतमेवार्थमनुशृणोति देशदिगन्तरैश्च प्रत्यनुभूतं पुनः पुनः प्रत्यनुभवति दृष्टं चादृष्टं च श्रुतं चाश्रुतं चानुभूतं चाननुभूतं च सच्चासच्च सर्वं पश्यति सर्वः पश्यति ॥ ५ ॥**

अन्वय व अर्थ—अत्र एषः देवः स्वप्ने महिमानं अनुभवति ( येथें हा देव स्वप्नामध्यें आपलें विलक्षण सामर्थ्य पाहातो. ) यत् दृष्टं दृष्टं अनुपश्यति, श्रुतं श्रुतं एव अर्थं अनुशृणोति, देशदिगन्तरैः च प्रत्यनुभूतं पुनः पुनः प्रत्यनुभवति, दृष्टं च अदृष्टं च श्रुतं च अश्रुतं च अनुभूतं च अननुभूतं च सत् च असत् च सर्वं पश्यति, सर्वः पश्यति ( जें वारंवार पाहिलें आहे तें स्वप्नांत पाहातो, जें वारंवार ऐकलें आहे तेंच श्रवण—स्वप्नकालीं अनुभवास येतें, देश—दिगंतराला जाऊन जो अनुभव वारंवार आला असतो; तोच अनुभव स्वप्नांत प्राप्त होतो. याप्रमाणें पाहिलेलें व न पाहिलेलें, ऐकिलेलें व न ऐकिलेलें, अनुभव आलेलें व न आलेलें; सत् वस्तु, असत् वस्तु सर्व पाहातो, सर्व—द्रष्टा मनोदेव सर्व स्वप्न—सृष्टि पाहतो.)

तात्पर्य, स्वप्नसृष्टीचा द्रष्टा मन आहे. ॥ ५ ॥

अत्रोपरतेषु श्रोत्रादिषु देहरक्षार्थं जाग्रत्सु प्राणादिवायुषु प्राक्सुषुप्तिप्रतिपत्तेः। एतस्मिन्नन्तराल एष देवोऽर्करश्मिवत्स्वात्मनि संहृतश्रोत्रादिकरणः स्वप्ने महिमानं विभूतिं विषयविषयिलक्षणमनेकात्मभावगमनमनुभवति प्रतिपद्यते।

सिद्धान्ती—अत्र म्हणजे ज्याकाळीं सर्व बाह्य नेत्रकर्णादि इंद्रियें आपा-पल्या व्यापारापासून निवृत्त होतात. आणि प्राणापानादि वायु जागे राहून देहाचें

रक्षण करीत असतात तो काळ म्हणजे स्वप्नस्थितीचा काळ होय. यावेळीं या सूर्यसम तेजस्वी मनामध्यें सर्व श्रोत्रादि साधनरूपी किरणांचा उपसंहार झालेला असतो. ही स्वप्नस्थिति होय. ही स्थिति गाढ निद्रेच्या आधीं विद्यमान असते.

शिष्य—पूर्ण जागृति आणि गाढ निद्रा यांच्या अवकाशांत असणारा जो काळ तो स्वप्नकाळ होय. नव्हे ?

सिद्धान्ती—होय. या वेळीं मन ( मनोदेव ) आपलें ऐश्वर्य पाहात असतें. एकाच काळीं विषय आणि विषयी होणें ( पाहण्याचे पदार्थ व पाहणारा होणें ) अनेक स्वरूपें घेणें, या मनाचा महिमा मनाला स्वप्न-स्थितीमध्यें अनुभवितां येतो.

पूर्वपक्षी—अहो, पाहणारा हा पाहण्याचा विषय होणें शक्य नाहीं.

सिद्धान्ती—स्वप्न स्थितीचा विचार केला असतां तुमचें तुम्हालाच कळेल, कीं आपलें मन स्वप्नांतील अनंत पदार्थ उत्पन्न करून अथवा ते पदार्थ आपण होऊन आपलें मन स्वतः उत्पन्न केलेल्या किंवा आपण झालेल्या पदार्थांचें साक्षी असतें.

ननु महिमानुभवने करणं मनोऽनुभवितुस्तत्कथं स्वातंत्र्येणानुभवतीत्युच्यते स्वतंत्रो हि क्षेत्रज्ञः । नैष दोषः । क्षेत्रज्ञस्य स्वातंत्र्यस्य मनउपाधिकृतत्वात्र हि क्षेत्रज्ञः परमार्थतः स्वतः स्वपिति जागर्ति वा । मनउपाधिकृतमेव तस्य जागरणं स्वप्नश्चेत्युक्तं वाजसनेयके—"सधीः स्वप्नो भूत्वा ध्यायतीव लेलायतीव" इत्यादि । तस्मान्मनसो विभूत्यनुभवे स्वातंत्र्यवचनं न्याय्यमेव । मनउपाधिसहितत्वे स्वप्नकाले क्षेत्रज्ञस्य स्वयंज्योतिष्ट्वं बाध्येतेति केचित् । तन्न । श्रुत्यर्थापरिज्ञानकृता भ्रान्तिस्तेषाम् । यस्मात्स्वयंज्योतिष्ट्वादिव्यवहारोऽप्यामोक्षान्तः सर्वोऽविद्याविषय एव मनआद्युपाधिजनितः ।

पूर्वपक्षी—हें मला समजत नाहीं. स्वप्नांतील चमत्कार पाहण्याचें साधन मन आहे, आणि अनुभविता जीव निराळा आहे. जीवाचें मन हें एक साधन आहे. असें जर खरें आहे तर स्वतंत्रतेनें मन स्वप्न विषयाचा अनुभव घेतें, असें कसें म्हणतां ? मन स्वतंत्र नाहीं. क्षेत्रज्ञ म्हणजे पाहणार, चैतन्ययुक्त जीव, स्वतंत्र आहे व मन त्याच्या वंशानें चालणारें आहे.

सिद्धान्ती—तुम्ही म्हणतां हा दोष नव्हे. क्षेत्रज्ञाला जें स्वातंत्र्य प्राप्त होतें तें मनोरूपी उपाधीनें प्राप्त करून दिलें असल्यामुळें प्राप्त होतें. एरवीं खरोखर पाहिलें असतां क्षेत्रज्ञ झोंपी जातो किंवा तो जागृत असतो असें म्हणतांच येत नाहीं. कारण, ज्ञानरूपी जीव नेहमी जागृति सुषुप्त्यादि अवस्थांच्या पलीकडचा आहे.

तो जागा आहे किंवा निजला आहे असें आपण म्हणतों तें मनाची उपाधि लक्षांत आणून म्हणतों. मन आहे म्हणून त्याला जागेपणाची किंवा सुषुप्तीची अवस्था प्राप्त होतेशी दिसते. मन ही उपाधि आहे. आणि या उपाधीमुळें जीव भिन्न भिन्न स्थितींत असतो. बृहदारण्यक उपनिषदांत आम्हीं म्हणतों असाच अभिप्राय आहे. 'बुद्धीसह स्वप्नस्थितींत जाऊन तो चिंतन करितोसा, क्रीडा करितोसा दिसतो.' म्हणून ( म्हणजे मन हेंच स्वप्नांतील चमत्कार पदार्थ म्हणून ) मनाला स्वतंत्र असें म्हटलें. मन स्वतंत्रतेनें स्वतःचा महिमा पाहतें, असें म्हटलें, तें योग्यच आहे.

पूर्वपक्षी—मन उपाधि असतां जो स्वप्न-काळ प्राप्त होतो, त्या काळांत क्षेत्रज्ञाच्या स्वयंप्रकाशत्वाला बाध येईल तर मग! क्षेत्रज्ञाला मनही उपाधि आहे व तिच्यायोगें निरनिराळ्या अवस्थांचा तो भोग घेतो, असें म्हटलें तर त्याचें स्वयंप्रकाशत्व नष्ट होईल असें कोणी म्हणतात. याचा उलगडा कसा!

सिद्धान्ती—हें म्हणणें असत्य आहे. श्रुतीचा अर्थ बरोबर रीतीनें न कळल्यामुळें त्यांना तुम्ही म्हणतां तसें म्हणण्याची भ्रांतीनें पाळी येते. कारण मोक्ष मिळण्यापर्यंतचा स्वयंप्रकाशत्वादि जो व्यवहार आहे, तो सर्व व्यवहार मनःप्रभृति उपाधींनीं उत्पन्न केलेला आहे म्हणून तो सर्व अविद्येचा विषय आहे. सारांश, सर्व व्यवहार मायेच्या राज्यांतील आहेत, तेव्हां ते म्हणतात किंवा तुम्ही म्हणतां याला आत्मविद्येच्या राज्यांत आधार मिळणें अशक्य आहे.

यत्र वा अन्यदिव स्यात्तत्रान्योऽन्यत्पश्येन्मानासंसर्गस्त्वस्य भवति "यत्र त्वस्य सर्वमात्मैवाभूत्तत्केन कं पश्येत्" इत्यादिश्रुतिभ्यः। अतो मन्दब्रह्मविदामेवेयमाशङ्का न त्वेकात्मविदाम्। नन्वेवं सत्यत्रायं पुरुषः स्वयंज्योतिरिति विशेषणमनर्थकं भवत्यत्रोच्यते। अत्यल्पमिदमुच्यते य एषोऽन्तर्हृदय आकाशस्तस्मिञ्शेत इत्यत्रान्तर्हृदयपरिच्छेदे सुतरां स्वयंज्योतिष्ट्वं बाध्येत, सत्यमेवमयं दोषो यद्यपि स्यात्स्वप्ने केवलतया स्वयंज्योतिष्ट्वेनार्थं तावदपनीत भास्येति चेन्न। तत्रापि पुरीतति नाडीषु शेत इति श्रुतेः पुरीतति नाडीसंबन्धाच्चत्रापि पुरुषस्य स्वयंज्योतिष्ट्वेनार्धभारापनयाभिप्रायो मृषैव। कथं तर्ह्यत्रायं पुरुषः स्वयंज्योतिरिति। अन्यत्राज्ञातत्वादनपेक्षा सा श्रुतिरिति चेन्न। अर्थैकत्वस्येष्टत्वादेको ह्यात्मा सर्ववेदान्तानामर्थो विजिज्ञापयिषितो बुभुत्सितश्च। तस्मादुक्ता स्वप्न आत्मनः स्वयंज्योतिष्ट्वोपपत्तिर्वक्तुम्। श्रुतेर्यथार्थतत्त्वप्रकाशकत्वात्। एवं तर्हि शृणु श्रुत्यर्थं हित्वा सर्वमभिमानं। न त्वभिमानेन वर्षशतेनापि श्रुत्यर्थो ज्ञातुं शक्यते सर्वैः पण्डितंमन्यैः।

सिद्धान्ती—जर कोठें दुसरें कांहीं असेल, आत्मवस्तूशिवाय दुसरी वस्तु असेल तर एक दुसऱ्याला पाहील ! सुषुप्तिकालीं तर दृश्य विषयांचा अभावच असतो. दुसरें कांहींच सुषुप्तिकाळीं जर नसतें तर पाहणारा कोण आणि पाहण्याची वस्तु तरी काय असेल ? जेथें ब्रह्मज्ञपुरुषाला सर्वत्र आत्मस्वरूप होतें तेथें तो पाहील कशानें व पाहील काय ?' इत्यादि श्रुति आम्ही म्हणतों याला प्रमाण आहेत. म्हणून ज्यांना ब्रह्मविद्येचें अत्यंत अल्प ज्ञान आहे, त्यांना तुम्ही म्हणतां अशली शंका येते. एकच आत्मवस्तु आहे, असा ज्यांचा निश्चय झाला त्यांना पूर्वोक्त शंका येणारच नाहीं.

पूर्वपक्षी—तुम्हीं म्हणतां हें खरें धरून चाललें तर ' हा पुरुष स्वयंप्रकाश आहे ' हें पुरुषाचें स्वयंप्रकाशत्व सांगणारें विशेषण अर्थशून्य किंवा अनर्थकारी होतें. तात्पर्य मंत्रामध्यें ' अत्र ' ( स्वप्नकालांत ) असा जो कालनिर्देश केला आहे, तो व्यर्थ होऊन मंत्रांच्या या उपस्थितीला बाध येतो.

सिद्धान्ती—तुमचें म्हणणें काय आहे ? वरील विशेषणानें मनाचा अभाव तुम्हांस सिद्ध करावयाचा आहे किंवा विशेषणाचें सामर्थ्य मात्र विचारावयाचें आहे ! पहिला पक्ष घेऊन मनाचा अभाव स्वीकृत केलातरी अंतःकरणांतील हृदयाकाशाची व तत्कृत परिच्छेदाची सिद्धि श्रुतीनेंच केली आहे म्हणून येथें जीवात्म्याचें स्वयंप्रकाशत्व समूळ नाहींसेंच होतें ! आणि ज्या विशेषणासंबंधानें दुसरी आक्षेप घेतला आहे तो तसाच जिवंत असून नसल्यासारखा होतो.

शिष्य—हृदयाच्या आंत जें आकाश आहे तेथें हा प्रत्यगात्मा राहतो. म्हणून प्रत्यगात्म्याला हृदयाकाश नियमन करणारें होतें आणि त्यामुळें या आत्म्याचें स्वयंप्रकाशत्व बाधित होतें, असें म्हणावें लागेल !

सिद्धान्ती—बरोबर आहे. यानीं आमच्या प्रवचनावर काढलेला आक्षेप यानांच बाधक होत आहे.

पूर्वपक्षी—तुम्ही म्हणतां हा दोष आहे खरा; म्हणजे स्वप्नकाळीं हृदयाकाशाची उपाधि असते म्हणून आत्म्याचें स्वयंप्रकाशत्व जाणणें शक्य नाहीं, हें खरें आहे. तथापि स्वप्नकाळीं मनाचा अभाव असतो म्हणून ( आत्म्याच्या स्वयंप्रकाशत्वाच्या ज्ञानाला प्रतिबंध करणाऱ्या वस्तूचा अभावच असतो म्हणून ) त्याचें स्वयंप्रकाशत्व कळणें शक्य आहे. सारांश, स्वप्नकाळीं स्वयंप्रकाशत्वाच्या बोधाचें बाधक जें मन तें नसतें, असें धरलें म्हणजे आत्म्याचें स्वयंज्योतिस्त्व स्पष्ट कळतें आणि मंत्रांतील विशेषण सार्थ होतें. निदान मनाच्या अस्तित्वानें उत्पन्न होणारी अडचण अर्धी तरी नाहींशी होते. असें आम्ही म्हणतों याचें कारण हृदयाकाशाचें अस्तित्व आहे म्हणून होय. ही अडचण सुषुप्तीमध्यें नाहींशी होते आणि सर्व प्रतिबंधाचा अभाव झाल्यामुळें आत्मप्रकाशाचें ज्ञान संपूर्ण होतें.

सिद्धान्ती—याही स्थितींत अडचणी नाहींत असें नाहीं. तेथें 'पुरीतति नाडीमध्यें जाऊन निजतो' अशी श्रुति आहे म्हणून सुषुप्ति कालींही पुरीतति-नाडीचा संबंध राहतोच राहतो. अर्थातच पुरुषाच्या स्वयंप्रकाशत्वज्ञानाचा सर्व-भाग नाहींसा होतो. हें म्हणणें खोटें आहे. म्हणून स्वप्नांमध्यें अर्धभाग नाहींसा होतो. हेंही म्हणणें खोटें आहे.

पूर्वपक्षी—मग या विशेषणाची वाट तरी कशी लावतां ?

शिष्य—'पुरुष हा स्वयंप्रकाश आहे' ही श्रुति अन्य शाखेंतील आहे, म्हणून या श्रुतीचा येथें विचारच करूं नये.

पूर्वपक्षी—असें कसें होईल ? सर्व श्रुतींचा समन्वय असून सर्वही श्रुति आत्मवर्णनामध्यें समर्पित होतात आणि एकच आत्मा आहे असा सर्व वेदा-ताचा डिंडिम 'नगारा' तार स्वरानें गर्जना करीत आहे; आणि 'आत्मा एकच आहे.' हेंच ज्ञान मुमुक्षुला करून घ्यावयाचें आहे. तेव्हां आम्हीं काढलेल्या श्रुती-वर बहिष्कार टाकितां येत नाहीं, तात्पर्य, स्वप्नकालीं आत्मा मात्र स्वतंत्र असून तो स्वयंप्रकाश असतो हें आमचें म्हणणें उपपन्न म्हणजे न्यायास धरून आहे. तसेंच श्रुतीचें मत यथार्थतत्त्वाचा प्रकाश करणें हें आहे म्हणून आम्हीं म्हणतों हाच अर्थ ग्रहण केला पाहिजे.

सिद्धान्ती—हें तुम्हांस मान्य असेल तर (श्रुति यथार्थाचें मात्र प्रतिपादन करिते. हे तुम्हांस संमत असेल तर) श्रुतीचा अर्थ काय आहे तो ऐका. सर्व प्रकारचे अभिमान व दुराग्रह सोडून द्या. अभिमान किंवा दुराग्रह यांचा स्वीकार कराल तर शंभर वर्षें जरी तुम्ही वादप्रतिवाद केला, मोठ्या अहंमन्य पंडितांनीं दुराग्रह कायम ठेवून हजारों वर्षें यद्यपि मीमांसा केली तथापि त्यांना श्रुतीचा अर्थ कळणार नाहीं.

यथा हृदयाकाशे पुरीतति नाडीषु च स्वपतस्तत्संबन्धाभावात्तो विविच्य दर्शयितुं शक्यत इत्यात्मनः स्वयंज्योतिष्ट्वं न बाध्यते । एवं मनस्यविद्याकामकर्मनिमित्तोद्भूतवासनावति कर्म-निमित्ता वासनाऽविद्ययाऽन्यद्वस्त्वन्तरमिव पश्यतः सर्वकार्य-करणेभ्यः प्रविविक्तस्य द्रष्टुर्वासनाभ्यो दृश्यरूपाभ्योऽन्यत्वेन स्वयंज्योतिष्ट्वं सुदर्पितेनापि तार्किकेण न वारयितुं शक्यते । तस्मात्साधूक्तं मनसि प्रलीनेषु करणेष्वप्रलीने च मनसि मनोमयः स्वप्नान्पश्यतीति ।

सिद्धान्ती—ऐका—हृदयाकाशांत व पुरीतति नाडीमध्यें निद्रा घेणारा असतो तथापि त्याचा स्वयंप्रकाश आत्म्याशीं कोणत्याही प्रकारचा संबंध नसतो म्हणून व हृदयाकाश आणि पुरीतति नाडी यांच्यापासून आत्मस्वरूप निराळें काढतां

येतें म्हणून, आत्म्याचें स्वयंप्रकाशत्व बाधित होत नाहीं. ह्या दुसऱ्या वस्तु तेथें असतात. तथापि आत्म्याच्या स्वधर्माला त्यांच्यापासून कोणतीही बाधा उत्पन्न होत नाहीं. याच प्रमाणें मनामध्यें जरी अविद्येनें उत्पन्न केलेल्या ( इच्छेनें निर्माण केलेल्या ) कर्मापासून वासना उत्पन्न झालेली असते; तथापि वासनाही अविद्यानिर्मित कर्मापासून झालेली आहे, आत्मस्वरूपाहून ही वासना निराळी वस्तु आहे, असें पाहणारा जो विद्वान् असतो तो सर्व कार्यें आणि सर्व साधनें निरनिराळीं आहेत, आत्मभिन्न आहेत असें समजतो. आणि वासना व दृश्य विषय याहून स्वयंप्रकाश आत्मा निराळा आहे असें समजतो, नव्हे, असा त्याचा सिद्धांत असतो. त्या सिद्धांताचें निवारण कसल्याही जाड्या तार्किक विद्वानालाही करितां येणार नाहीं. सारांश, विद्वान् पुरुषाला स्वप्नामध्येंही वासना आणि त्यांचे विषय यांचा आणि स्वयंप्रकाश आत्म्याचा विवेक करितां येतो. या विवेचनावरून तुम्हांस कळलेंच असेल कीं कर्णनेत्रादि इंद्रियांस प्रलीन करणारें मन अप्रलीन असतां ( म्हणजे जागें असतें ) म्हणजे तेथें राहून मनोमय झालेला ( मनच असणारा ) आत्मा द्रष्टा मात्र आहे, म्हणून मन स्वप्नें पाहतें, स्वप्नांचें साक्षी होतें, हें म्हणणें सर्वथा योग्य आहे.

शिष्य—म्हणजे वासना आणि तद्विषय हीं निराळीं करून मनोमूर्ति झालेला आत्मा किंवा विद्वानाचें दिव्य मन स्वप्नांचा साक्षी होतें.

कथं महिमानमनुभवतीत्युच्यते । यन्मित्रं पुत्रादि वा पूर्वं दृष्टं तद्वासनावासितः पुत्रमित्रादिवासनासमुद्भूतं पुत्रं मित्रमिव वाऽविद्यया पश्यतीत्येवं मन्यते, तथा श्रुतमर्थं तद्वासनयाऽनुशृणोतीव, देशदिगन्तरैश्च देशान्तरैर्दिगन्तरैश्च प्रत्यनुभूतं पुनःपुनस्तत्प्रत्यनुभवतीवाविद्यया, तथा दृष्टं चास्मिञ्जन्मन्यदृष्टं च जन्मान्तरदृष्टमित्यर्थः । अत्यन्तादृष्टे वासनानुपपत्तेः । एवं श्रुतं चाश्रुतं चानुभूतं चास्मिञ्जन्मनि केवलेन मनसाऽननुभूतं च मनसैव जन्मान्तरेऽनुभूतमित्यर्थः । सच्च परमार्थोदकादि । असच्च मरीच्युदकादि । किं बहुनोक्तानुक्तं सर्वं पश्यति सर्वः पश्यति सर्वमनोवासनोपाधिः सन्नेवं सर्वकरणात्मा मनोदेवः स्वप्नान्पश्यति ॥ ५ ॥

शिष्य—हा स्वप्नांतील चमत्कार कोणत्या स्वरूपाचा असतो ?

सिद्धान्ती—ऐका–पूर्वी म्हणजे जागेपणीं ज्या पुत्र–मित्र–कलत्रादि जीवांचें व धन, गृह इत्यादि वस्तूंचें दर्शन वारंवार झालें असतें, त्या दर्शनामुळें उत्पन्न झालेल्या वासनांत मग्न झाल्यामुळें त्या वासनांच्या योगानेंच पुत्र मित्रादि वस्तूंचें स्वप्नामध्यें अविवेकानें दर्शन होत आहे, असें ज्ञानी पुरुषांस वाटतें. याचप्रमाणें

ऐकलेल्या अर्थाचें श्रवण देशांतरीं व दिगंतरीं अनुभवलेल्या वस्तूंचे अनुभव ह्या जन्मीं किंवा पूर्व जन्मीं पाहिलेल्या वस्तूंचें दर्शन—

शिष्य—मंत्रांतील अदृष्ट शब्दाचा अर्थ काय?

सिद्धान्ती—आपण न पाहिलेली वस्तु स्वप्नांत केव्हांही दिसत नाहीं, असा सिद्धांत आहे. बरोबरच आहे. जी वस्तु पाहिली नाहीं, तिच्या विषयीं वासना उत्पन्न होणें शक्यही नाहीं. पण केव्हां केव्हां न पाहिलेल्या वस्तु आपल्या स्वप्नामध्यें दिसतात. तेव्हां असेंच म्हणावयास पाहिजे कीं ह्या वस्तु आपण कोणत्यातरी पूर्व जन्मांत पाहिल्या असतील. असो; याप्रमाणें या जन्मीं किंवा पूर्वजन्मीं ऐकलेल्या गोष्टीचें श्रवण व ह्या जन्मीं किंवा पूर्व जन्मीं घेतलेल्या अनुभवांचा स्वप्नांतील अनुभव इत्यादिकांची मीमांसा आहे. आपण स्वप्नांत कधीं कधीं सत्य उदक पाहतो. केव्हां मृगजळही दिसतें. तात्पर्य सर्व प्रकारच्या उक्त व अनुक्त गोष्टी स्वप्नामध्यें दिसतात.

शिष्य—शेवटच्या दोन पदांचें रहस्य काय आहे?

सिद्धान्ती—मन आणि वासना, या सर्व उपाधी असतांही सर्व इंद्रियांचा राजा जो मनोदेव हा स्वप्नाचा द्रष्टा असतो, हें विचाराच्या प्रश्नाचें उत्तर झालें. ५

---

## मंत्र सहावा.

**स यदा तेजसाऽभिभूतो भवति । अत्रैष देवः स्वप्नान्न पश्यत्यथ तदैतस्मिञ्शरीर एतत्सुखं भवति ॥ ६ ॥**

अन्वय व अर्थ—सः यदा तेजसा अभिभूतः भवति (मनाचा अधिष्ठाता देव ज्या वेळीं सूर्याच्या तेजानें व्यापला जातो) अत्र एषः देवः स्वप्नान् न पश्यति (त्या वेळीं या देवाला स्वप्नें दिसत नाहींत.) अथ तदा एतस्मिन् शरीरे एतत् सुखं भवति (त्या वेळीं ह्या शरीरांत हें शुद्ध-सुख प्राप्त होतें.)

सारांश, ज्या वेळीं मनावर तेजाचा प्रादुर्भाव होतो त्यावेळीं त्याला स्वप्न वगैरे कांहीं दिसत नाहीं. त्यावेळीं तें मन शुद्ध सुखाच्या आनंदांत असतें. ॥ ६ ॥

स यदा मनोरूपो देवो यस्मिन्काले सौरेण पित्ताख्येन तेजसा नाडीशयेन सर्वतोऽभिभूतो भवति तिरस्कृतवासनाद्वारो भवति तदा सह करणैर्मनसो रश्मयो हृद्युपसंहृता भवन्ति । यदा मनो

दार्वग्निवदविशेषविज्ञानरूपेण कृत्स्नं शरीरं व्याप्यावतिष्ठते तदा सुषुप्तो भवति । अत्रैतस्मिन्काल एष मनआख्यो देवः स्वप्नान्न पश्यति दर्शनद्वारस्य निरुद्धत्वात्तेजसा । अथ तदैतस्मिञ्शरीर एतत्सुखं भवति यद्विज्ञानं निराबाधमविशेषेण शरीरव्यापकं प्रसन्नं भवतीत्यर्थः ॥ ६ ॥

सिद्धान्ती—मनाची अभिमानी देवता ज्यावेळीं सूर्यसंबंधीं नाडींत राहणाऱ्या पित्त नामक तेजानें सर्वतः व्यापून जाते, म्हणजे ज्यावेळीं मनात असणाऱ्या वासना लीन होतात, त्यावेळीं इंद्रियांसह मनाचे सर्व रश्मि अंतःकरणामध्यें निवृत्त होतात आणि तेथें लीन होतात.

शिष्य—मला कांहीं एक समजलें नाहीं. !

सिद्धान्ती—तुला ठाऊक आहे कीं, लांकडामध्यें सर्वत्र अग्नीची वसति असते. अग्नि कोठेंही विशेष स्वरूपानें दिसत नाहींतरी सामान्यरूपानें तो सर्व लाकूडभर पसरलेला असतो.

शिष्य—हें कशावरून !

सिद्धान्ती—केव्हांही लाकडांवर लांकूड घासलें असतां अग्नि उत्पन्न होतो, यावरून अग्नीचें वास्तव्य लांकडात आहे, हें स्पष्ट ठरतें. तो विशेष ठिणगीच्या रूपानें अथवा ज्वालेच्या रूपानें तेथें नसला तरी सामान्यरूपानें तेथें असतो, यात शंका नाहीं. याच न्यायानें मनानें आपल्या विशेष ज्ञानाचें रूप टाकून देऊन सामान्य ज्ञानरूप हेंच आश्रयस्थान केलें आणि आपल्या सामान्यरूपानें सर्व शरीराला व्यापून टाकलें म्हणजे त्याला झोंप लागते.

शिष्य—हें असें, तें तसें असें जें विशेष ज्ञान तें नाहींसें होऊन सामान्य ज्ञान मात्र शिल्लक राहील, त्यावेळीं मनाला झोंप लागते असेंच ना !

सिद्धान्ती—ठीक आहे. मनाला शुद्ध विज्ञानत्व प्राप्त झालें म्हणजे त्याला स्वप्नें पाहता येत नाहींत. कारण, सूर्यसंबंधी पित्तनामक तेजानें त्याच्या सर्व रश्मि (वासना) निरुद्ध होतात. त्यांना बाहेर येण्याचें सामर्थ्यच असत नाहीं.

शिष्य—भगवन्, हें सूर्यतेज पित्तनामक आहे असें म्हणालां, याचा अर्थ काय !

सिद्धान्ती—शारीरिक दृष्टीनें बोलावयाचें झालें म्हणजे आपल्या शरीरांतील पित्तद्रव्य मनाला व्यापून टाकितें आणि त्याचें चांचल्य नाहींसें करितें. हें द्रव्य सूर्यशक्तीचें द्योतक आहे. आत्मदृष्टीनें पाहूं गेलें असतां हें द्रव्य एक उपकरण आहे. हें उदाहरणाकरितां मात्र घेतलें आहे. खरा अर्थ सुषुप्तिकालीं ज्ञानरूपी ब्रह्म मनाला व्यापून राहून स्तब्ध करितें. 'तें मन प्राणाचा मात्र आश्रय करितें' अशी

श्रुति आहे. येथें प्राण याचा अर्थ ब्रह्म असा आहे. तात्पर्य मनाचा लय ब्रह्मांत होतो. याकाळीं वासनांचा उद्भव होत नाहीं. कारण, ब्रह्माचा आणि मनाचा संबंध झाला असतां दर्शनद्वारें स्तब्ध झाल्यामुळें वासनेचा उद्भव होण्याला संधि मिळत नाहीं, असो; यावेळीं या शरीरांत तें निर्मळ आणि निरामय सुख होतें कीं, जें शुद्ध ज्ञानरूप आहे. या सुखांत किंवा ज्ञानांत विशेषाचा, एकदेशीपणाचा ( हें अमक्यापासून झालेलें सुख, तें तमक्या पदार्थाचें ज्ञान इत्यादि परिच्छिन्न सुखाचा व ज्ञानाचा ) अभाव असतो. हें सुख निराबाध असतें. या सुखाला विकार करण्याचें सामर्थ्य कोणालाही नाहीं.

पूर्वपक्षी—हें तुमचें म्हणणें व्यर्थ आहे. गाढ निद्रेच्या मात्र वेळीं उत्पन्न होणाऱ्या सुखाचा अभाव होतो, असें म्हणणें असंभवनीय आहे. कारण जें सुख नित्य आहे तें उत्पन्न होतें, असें म्हणणें मूर्खत्वाचें दर्शक आहे. स्वरूपाचें सुख पूर्वीप्रमाणेंच सुषुप्तिकालींही होतें, हेंही म्हणणें जुळत नाहीं.

सिद्धान्ती—तुम्हीं मुख्य अभिप्राय समजला नाहीं. मंत्रांत सुख होतें असें म्हटलें आहे. त्याचा अर्थ हा आहे कीं, विशेष ज्ञान ( एकदेशी ज्ञान ) झालें असतां जी स्वरूपच्युति होते, स्वरूपाचें ज्ञान तिरस्कृत होतें, तिचा ( एकदेशी सुखानें उत्पन्न होणाऱ्या भ्रमाचा ) अभाव येथें आहे; हें सांगावयाचें आहे. एखाद्या निर्वात प्रदेशांत ठेवलेला प्रदीप जसा आपल्या पूर्ण वैभवानें प्रकाशित असतो; त्याप्रमाणें भ्रमशून्य झालेलें ज्ञान, आत्मज्ञान, स्वरूपसुख आपल्या संपूर्ण वैभवानें सुषुप्तिकालीं प्रकाशत असतें. ॥ ६ ॥

---

एतस्मिन्कालेऽविद्याकामकर्मनिबन्धनानि कार्यकरणानि शान्तानि भवन्ति । तेषु शान्तेष्वात्मस्वरूपमुपाधिभिरन्यथा विभाव्यमानमद्वयमेकं शिवं शान्तं भवतीत्येतामेवावस्थां पृथिव्याद्यविद्याकृतमात्रानुप्रवेशेन दर्शयितुं दृष्टान्तमाह—

सिद्धान्ती—यावेळीं ( गाढ निद्रेच्या काळीं ) अविद्या, वासना, कर्म इत्यादि कार्यें व करणें शांत होतात. कार्य करण्याचीं आयुधें कोणतीं ? पहिलें अज्ञान, दुसरी वासना आणि तिसरें कर्म करण्याची प्रबल इच्छा हीं त्रितीचीं साधनें आहेत. असो, हीं सर्व उपकरणें शांत झालीं असतां आत्मस्वरूप मंगलकारक, शांत, अद्वय, एक, अशा स्वरूपानें प्रकाशत असतें. आपल्यास तें निराळ्या स्वरूपाचें दिसतें, याचें कारण, जन्मापासून आपल्या पाठीमागें लागलेल्या उपाधी होत. त्या नाहींशा झाल्या म्हणजे आत्मस्वरूप स्वप्रकाशानें निर्भर होऊन राहातें. सुषुप्तिकालीं वरील सर्व उपकरणें शांत होतात म्हणून गाढनिद्रेंत असत् ज्ञान होत नाहीं. उपाधींची ही अवस्था पृथिव्यादि, अविद्याकृत

तन्मात्रांच्या प्रवेशानें उत्पन्न झालेली आहे. हें सांगण्यासाठीं व हें स्पष्ट दाखविण्यासाठीं पुढील दृष्टान्ताची योजना केली आहे.

### मंत्र सातवा.

**स यथा सोम्य वयांसि वासोवृक्षं संप्रतिष्ठन्ते ।
एवं ह वै तत्सर्वं पर आत्मनि संप्रतिष्ठते ॥ ७ ॥**

अन्वय व अर्थ—सोम्य ! यथा वयांसि वासोवृक्षं संप्रतिष्ठंते एवं ह तत्सर्वं परे आत्मनि संप्रतिष्ठते ( हे सोम्य, ज्याप्रमाणें पक्षी वसतीस योग्य असणाऱ्या वृक्षाचा आश्रय करितात, त्याप्रमाणेंच हें सर्व पदार्थजात सर्वश्रेष्ठ आत्मा आपल्यामध्यें सामावून घेतो, त्या सर्वांस आश्रय देतो. ) ॥ ७ ॥

स दृष्टान्तो यथा येन प्रकारेण सोम्य प्रियदर्शन वयांसि पक्षिणो वासार्थं वृक्षं वासोवृक्षं प्रति संप्रतिष्ठन्ते गच्छन्ति । एवं यथा दृष्टान्तो ह वै वक्ष्यमाणं सर्वं पर आत्मन्यक्षरे संप्रतिष्ठते ॥ ७ ॥

सिद्धान्ती—ज्याप्रमाणें हे सोम्य, ज्यारीं पक्षी वसतीस योग्य असणाऱ्या वृक्षाकडे धावत जातात; त्या प्रमाणें यच्चयावत् सर्व वस्तु परमात्म्याचे ठिकाणीं आश्रय घेण्यास जातात.

शिष्य—या सर्व वस्तु कोणत्या ?

सिद्धान्ती—त्या पुढें येणाऱ्या आठव्या मंत्रांत सांगितल्या आहेत ॥ ७ ॥

---

किं तत् सर्वं—

सिद्धान्ती—हें सर्व काय आहे हें या मंत्रांत सांगितलें आहे.

### मंत्र आठवा.

**पृथिवी च पृथिवीमात्रा चाऽऽपश्चाऽऽपोमात्रा च तेजश्च तेजोमात्रा च वायुश्च वायुमात्रा चाऽऽकाशश्चाऽऽकाशमात्रा च चक्षुश्च द्रष्टव्यं च श्रोत्रं च श्रोतव्यं च घ्राणं च घ्रातव्यं च रसश्च रसयितव्यं च त्वक्च स्पर्शयितव्यं च वाक्च वक्तव्यं च हस्तौ**

**चाऽऽदातव्यं चोपस्थश्चाऽऽनन्दयितव्यं च पायुश्च विसर्जयितव्यं च पादौ च गन्तव्यं च मनश्च मन्तव्यं च बुद्धिश्च बोद्धव्यं चाहंकारश्चाहंकर्तव्यं च चित्तं च चेतयितव्यं च तेजश्च विद्योतयितव्यं च प्राणश्च विधारयितव्यं च ॥ ८ ॥**

अन्वय व अर्थ—पृथिवी च पृथिवीमात्रा च, आपः च, आपोमात्रा च, तेजः च तेजोमात्रा च, वायुः च वायुमात्रा च, आकाशः च आकाशमात्रा च, चक्षुः च द्रष्टव्यं च, श्रोत्रं च श्रोतव्यं च, घ्राणं च घ्रातव्यं च, रसश्च रसयितव्यं च त्वक् च स्पर्शयितव्यं च, वाक् च वक्तव्यं च, हस्तौ च आदातव्यं च, उपस्थः च आनदयितव्यं च, वायुः च विसर्जयितव्यं च, पादौ च गंतव्यं च, मनः च मन्तव्य च, बुद्धिः च बोद्धव्यं च, अहकारः च अहकर्तव्यं च, चित्तं च चेतयितव्यं च, तेजश्च विद्योतयितव्यं च, प्राणः च विधारयितव्यं च, ( पृथ्वी आणि पृथ्वीमात्रा, जल आणि त्याच्या मात्रा, तेज आणि त्याच्या मात्रा, वायु आणि वायूच्या मात्रा, आकाश आणि आकाशाच्या मात्रा, नेत्र आणि द्रष्टव्य, कर्ण आणि श्रोतव्य, घ्राण—गंध घेण्याचें इंद्रिय—आणि घ्रातव्य, रसना आणि रस घेण्यास योग्य असें द्रव्य, स्पर्शेंद्रिय आणि त्याचा विषय, वाणी आणि तिचा विषय, हस्तद्वय आणि हातानें उचलण्यासारख्या वस्तु, उपस्थ आणि त्याच्या आनंदाचें स्थान, वायु—गुदद्वार—आणि मल, चरण आणि जाण्यास योग्य स्थळ, मन आणि मननीय गोष्ट, बुद्धि आणि ज्ञेयपदार्थ, अहंकार आणि त्याचे विषय, चित्त आणि चेतविण्यास योग्य वस्तु ( चिंतनीय वस्तु ) तेज आणि प्रकाशित होणाऱ्या वस्तु, प्राण आणि त्याच्या आश्रयानें असणारे पदार्थ, हे सर्व मिळून परम स्वरूपाच्या ठिकाणीं आश्रय घेतात. ) ॥ ८ ॥

पृथिवी च स्थूला पञ्चगुणा तत्कारणा च पृथिवीमात्रा च गन्धतन्मात्रा, तथाऽऽपश्चाऽऽपोमात्रा च । तेजश्च तेजोमात्रा च । वायुश्च वायुमात्रा च । आकाशश्चाऽऽकाशमात्रा च । स्थूलानि च सूक्ष्माणि च भूतानीत्यर्थः । तथा चक्षुश्चेन्द्रियं रूपं च द्रष्टव्यं च । श्रोत्रं च श्रोतव्यं च । घ्राणं च घ्रातव्यं च रसश्च रसयितव्यं च । त्वक्च स्पर्श-

यितव्यं च । वाक्च वक्तव्यं च । हस्तौ चाऽऽदातव्यं च । उपस्थश्चाऽऽनन्दयितव्यं च पायुश्च विसर्जयितव्यं च । पादौ च गंतव्यं च । बुद्धीन्द्रियाणि कर्मेन्द्रियाणि तथा चोक्तानि । मनश्च पूर्वोक्तम् । मन्तव्यं च तद्विषयः । बुद्धिश्च निश्चयात्मिका । बोद्धव्यं च तद्विषयः । अहंकारश्चाभिमानलक्षणमन्तःकरणमहंकर्तव्यं च तद्विषयः । चित्तं च चेतनावदन्तःकरणम् । चेतयितव्यं च तद्विषयः । तेजश्च त्वगिन्द्रियव्यतिरेकेण प्रकाशविशिष्टा या त्वक्तया निर्भास्यो विषयो विद्योतयितव्यम् । प्राणश्च सूत्रं यदाचक्षते तेन विधारयितव्यं संग्रथनीयं सर्वं हि कार्यकरणजातं पारार्थ्येन संहतं नामरूपात्मकमेतावदेव ॥ ८ ॥

सिद्धान्ती—स्थूल पृथ्वी ही पंचगुणात्मक आहे. शब्द, स्पर्श, रूप,रस, आणि गंध हे पांचही गुण तिच्यामध्ये दृग्गोचर होतात. पण पृथ्वीची विशेषतन्मात्रा (सूक्ष्मावस्था किंवा गुण) गंध होय,म्हणून पृथ्वी आणि गंध–तन्मात्रा, जळ आणि रस–तन्मात्रा, तेज आणि रूप–तन्मात्रा वायु आणि स्पर्श–तन्मात्रा आकाश आणि शब्दतन्मात्रा होत. हीं सर्व अनुक्रमें स्थूल आणि सूक्ष्म भूतें आहेत. याच प्रमाणें नेत्रेंद्रिय आणि द्रष्टव्यरूप, कर्ण आणि श्रोतव्य शब्द, घ्राण आणि घ्रातव्य गंध, रसना आणि आस्वाद घेण्यास योग्य रस, स्पर्शेंद्रिय आणि स्पृश्य वस्तु, वाणी आणि वक्तव्य, हस्त आणि ग्रहणीय पदार्थ, उपस्थ आणि आनंदाचें आगर, गुदद्वार आणि मळ, चरण आणि गंतव्यस्थान, याप्रमाणें सर्व ज्ञानेंद्रियें आणि कर्मेंद्रियें व त्यांचे अर्थ हीं ही सांगितलीं. संकल्प–विकल्पात्मक मन, निश्चय करणारी बुद्धि, अभिमान आहे ज्याचें लक्षण तो अहंकार, चित्त ( चैतन्ययुक्त अंतःकरण ) आणि या सर्वांचे निरनिराळे विषय यांचाही वरील मंत्रांत अवतार केला आहे. तसेंच स्पर्शेंद्रियाशिवाय प्रकाशानें विशिष्ट असणारी जी त्वचा तें तेज, तिच्या योगानें प्रकाशित होणारा विषय याला विद्योतयितव्य असें म्हणावें.

शिष्य—भगवन्, या मंत्रांत तेज हा जो शब्द आहे त्याचा अर्थ भौतिक प्रकाश असा नसून अंतःकरणचतुष्टयांत ( मन, बुद्धि, चित्त आणि अहंकार मिळून अंतःकरण चतुष्टय होतें. ) सामान्यत्वानें नित्य असणारी ज्ञानशक्ति असा अर्थ करावा. या सामान्य शक्तीच्या सामान्य विषयाला विद्योतयितव्य ( अंतःकरणचतुष्टयानें सामान्यतः प्रकाशण्यास योग्य ) असें म्हणावें.

सिद्धान्ती—तात्पर्य एकच आहे. ज्ञानानें विशिष्ट असणारी जी त्वचा अथवा स्पर्शेंद्रियव्यतिरिक्त जो भाग तोच अंतःकरणचतुष्टयव्यापी चैतन्यांश आहे. असो, प्राणाला सूत्र असें म्हणावें त्याच्या आधारानें गुरणाऱ्या सूत्रानें

प्रोथित झालेल्या वस्तु हे प्राणाचे विषय आहेत. याप्रमाणें स्थूल, म्हणजे पंचीकृत व अपंचीकृत महाभूतांपासून अंतःकरणांत असणाऱ्या उपाधिविशिष्ट सामान्य चैतन्यात्मक वस्तू पर्यंतच्या सर्व वस्तु कार्य–कारणात्मक असून दुसऱ्यासाठीं ( आत्म्यासाठीं ) एकत्र झालेल्या आहेत. असो; नामरूप असणारें जें, कांहीं आहे तें आत्म्याच्या आधारानें विद्यमान असतें. एवंच स्थूलसूक्ष्म महाभूतें, इंद्रियें, त्यांच्या शक्ति व त्यांचे विषय, मन, बुद्धि आदि अंतःकरणचतुष्टय व त्यांचे विषय आणि सोपाधिक चैतन्य, सामान्य वस्तु आणि प्राण व प्राणाचे आश्रित मिळून सर्व वस्तु परमात्म्याच्या आश्रयानें विद्यमान असतात. याप्रमाणें कोणाच्या आश्रयानें या वस्तु राहतात ? या प्रश्नाला पिप्पलादांनीं उत्तर दिलें.

शिष्य—आत्म्यांशिवाय बाकीच्या सर्व वस्तु आत्म्याच्या उपाधि असून त्याच्या आश्रयानें मात्र राहतात. सर्व वस्तु अस्वतंत्र आहेत असें ठरलें. परमार्थतः आत्माही एकच वस्तु आहे. आणि बाकीच्या सर्व वस्तु परमार्थतः सत्य नाहींत व परतंत्र आहेत, असें ठरलें. ॥ ८ ॥

---

अतःपरं यदात्मरूपं जलसूर्यकादिवद्भोक्तृत्वकर्तृत्वेनेहानुप्रविष्टम्—

सिद्धान्ती—याच्या पलीकडे असणारें जें आत्मरूप आहे, तें भोक्तृत्वाचा ( भोगण्याचा ) व कर्तृत्वाचा ( कर्तेपणाचा ) पत्कर घेऊन मागें सांगितलेल्या प्रपंचामध्यें प्रविष्ट झालें आहे. हें या मंत्रांत सांगणार आहेत. जलांत प्रवेश करून सूर्य जसा प्रतिबिंबरूपानें हालतोसा दिसतो, तसा हा कर्ताभोक्तासा दिसणारा पण स्वतः निर्विकार असणारा आत्मा ( जीव ) आहे.

## मंत्र नववा.

**एष हि द्रष्टा स्प्रष्टा श्रोता घ्राता रसयिता मन्ता बोद्धा कर्ता विज्ञानात्मा पुरुषः । स परेऽक्षर आत्मनि संप्रतिष्ठते ॥ ९ ॥**

अन्वय व अर्थ—एषः हि द्रष्टा, स्प्रष्टा, श्रोता, घ्राता, रसयिता, मंता, बोद्धा, कर्ता, विज्ञानात्मा पुरुषः ( हाही पहाणारा, स्पर्श करणारा, श्रवण करणारा, वास घेणारा, रस चाखणारा, मनन करणारा, जाणणारा, कार्य करणारा, विज्ञानात्मक पुरुष आहे. ) सः परे अक्षरे आत्मनि संप्रतिष्ठते ( हा पुरुष सर्वश्रेष्ठ व अविकारी जो परमात्मा त्याच्या आश्रयानें राहतो. )

सारांश, जीवात्मा हाही परमात्म्याच्या आश्रयानें राहतो. ॥ ९ ॥

शिष्य—भगवन्, जडवस्तूंचा लय परब्रह्मांत होतो; तसाच जीवांचाहि लय तेथें होतो; असें आपण म्हणतां. पृथ्वीप्रमुख जडवस्तू परब्रह्मांत लीन होतील; पण द्रष्टा जो जीवात्मा त्याचा लय कसा होतो?

सिद्धान्ती—जीव हा सोपाधिक आहे. उपाधीचा लय झाला, उपाधि नाहींसा झाल्या म्हणजे जीव व ब्रह्म एकच होतात. अर्थात् जीवाचा लय म्हणजे त्याच्या उपाधी नाहींशा होणें हें होय. हा लय झाला म्हणजे जीव आणि ब्रह्म एकच होतात. जीवावर उपाधींचा नुसता आरोप आहे. स्फटिकाशेजारीं रक्तपुष्प ठेविलें असतां तो तांबडा दिसूं लागतो, हें तुला ठाऊक आहे. स्फटिकाचा हा तांबडेपणा आरोपित म्हणजे पुष्पाच्या रक्तपणानें उत्पन्न केला आहे. स्फटिक जसा शुद्ध असतो तसाच जीव ही शुद्ध असतो. तथापि जोंपर्यंत तो उपाधिग्रस्त आहे तोंपर्यंत शास्त्रज्ञांनीं असें म्हटलेंच पाहिजे कीं जीवात्म्याचा लय परमात्म्यामध्यें होतो व परमात्मा जीवाचा आश्रय असतो. परमार्थतः उभयतांही एकच आहेत.९

---

तदेकत्वविदः फलमाह—

सिद्धान्ती—सर्व एकच आहे असें जाणणाऱ्या पुरुषाला फलप्राप्ति काय होते, तें सांगतात—

## मंत्र दहावा.

परमेवाक्षरं प्रतिपद्यते स यो ह वै तदच्छायम-
शरीरमलोहितं शुभ्रमक्षरं वेदयते यस्तु सोम्य ।
स सर्वज्ञः सर्वो भवति तदेष श्लोकः ॥ १० ॥

अन्वय व अर्थ—यः ह वै तत् अच्छायं, अशरीरं, अलोहितं, शुभ्रं, अक्षरं, वेदयते, सोम्य सः परं एव अक्षरं प्रतिपद्यते (ज्याला त्या छायाशून्य, शरीरशून्य, वर्णशून्य, शुभ्र, स्वच्छ आणि अविनाशी परब्रह्माचें ज्ञान होतें, तो त्या श्रेष्ठ व अक्षर परब्रह्माला जाऊन मिळतो.) सः सर्वज्ञः सर्वः भवति (तो सर्वज्ञ, आणि सर्वव्यापी असा होतो.) तत् एषः श्लोकः (याविषयीं पुढील मंत्र प्रमाण आहे.) ॥ १० ॥

परमेवाक्षरं वक्ष्यमाणविशेषणं प्रतिपद्यत इत्येतदुच्यते । स यो ह वै तत्सर्वैषणाविनिर्मुक्तोऽच्छायं तमोवर्जितम् । अशरीरं नामरूपसर्वोपाधिशरीरवर्जितम् । अलोहितं लोहितादिसर्वगुणवर्जितम् । यत एवमतः शुभ्रं शुद्धम् । सर्वविशेषण-

रहितत्वादक्षरम् । सत्यं पुरुषाख्यम् । अप्राणममनोगोचरम् । शिवं शान्तं सबाह्याभ्यन्तरमजं वेदयते विजानाति । यस्तु सर्व-त्यागी सोम्य स सर्वज्ञो न तेनाविदितं किंचित्संभवति । पूर्वम-विद्ययाऽसर्वज्ञ आसीत्पुनर्विद्ययाऽविद्यापनये सर्वो भवति तदा त [ तच्च ] स्मिन्नर्थं एष श्लोको मन्त्रो भवति उक्तार्थसंग्राहकः॥१०॥

सिद्धान्ती—जीव आणि ब्रह्म एकच आहे असें ज्ञान ज्याला होतें; त्याला ज्या ब्रह्माचें पद प्राप्त होतें. त्याचीं लक्षणें या मंत्रांत सांगितलीं आहेत. एकः—सर्व वासनांचा त्याग केलेला जो कोणी अधिकारी पुरुष या पृथ्वीवर कोठें कोठें दिसतो; तो या अधकारशून्य ( अज्ञानशून्य ), नामरूपादि सर्व उपाधींचा व शरीराचा जेथें अभाव आहे, जो रक्तवर्णादि सर्व गुणविरहित आहे आणि यामुळें जो अत्यंत शुद्ध आहे, जो सर्वथा विशेषणशून्य असल्यामुळें अविनाशी आहे, जो सत्यस्वरूप आहे, ज्याला पुरुषोत्तम म्हणतात, जो प्राणाला व मनाला अगोचर आहे, त्या शांत, कल्याणकारी, एकरस ( अंतर्बाह्य एकस्वरूप असणाऱ्या ), जन्मशून्य पुरुषोत्तमाचें ज्ञान करून घेतो. ज्या अधिकारी पुरुषाला हें ब्रह्मस्वरूपाचें ज्ञान होतें, तो सर्व-त्यागी ज्ञानी पुरुष सर्वज्ञ होतो, त्याला ठाऊक नाहीं अशी वस्तूच नवते. वरोबरच आहे. जों पर्यंत तो मायेच्या पाशांत गुंतलेला होता, तोंपर्यंत तो असर्वज्ञ होता; पण विद्येनें अविद्येचा क्षय झाला. जीव आणि ब्रह्म एकच आहे, असें ज्ञानविज्ञान झालें म्हणजे 'मीच सर्व आहें' असा निश्चय होतो आणि ब्रह्मज्ञपुरुष सर्वज्ञ होतो यात कांहीं आश्चर्य नाहीं. हें मंत्रांतील विधान सिद्ध करणारा हा पुढील श्लोक ( मंत्र ) आहे तो पहा—

शिष्य—मंत्रात 'अच्छायं' इत्यादि तीन निषेधात्मक विशेषणें आहेत. त्यांचें कांहीं विशेष रहस्य आहे काय ?

सिद्धान्ती—हीं विशेषणें शरीरत्रयाचा ( कारण, सूक्ष्म, आणि स्थूल हें शरीर-त्रय होय ) निरास करून अवस्थात्रयाचा ( जागृति, सुषुप्ति आणि स्वप्न या तीन अवस्था आहेत ) ही निरास करितात. शुभ्र हें विशेषण चौथ्या अवस्थेचा अवतार करितें. शुभ्र आणि अक्षर हीं दोन्हीं विशेषणें परब्रह्माचीं वाचक आहेत. आत्मा हा सत्यरूप, एकरस, अज, अप्राण, अमना, आणि शुभ्र आहे अशी दुसरी एक श्रुति आहे. 'काय जाणलें असतां सर्व कांहीं जाणतां येतें.' या प्रश्नात्मक श्रुतीलाही येथें उत्तर दिलें आहे व आत्मज्ञानी पुरुष सर्वज्ञ होतो असें सांगितलें आहे.

शिष्य—सर्वज्ञ होतो असें म्हटलें तर पूर्वी तो नव्हता असें होईल.

सिद्धान्ती—याचसाठींच आचार्य म्हणतात कीं, आत्म्यावर अज्ञानाचा आरोप असतो त्याची निवृत्ति झाली म्हणजे तो स्वस्वरूपांत आहे, असें ज्ञान

होतें. ब्रह्माची उत्पत्ति होत नाहीं. अज्ञानानें ब्रह्माच्या स्वरूपावर झांकण पडलेलें असतें, तें काढून टाकिलें म्हणजे ब्रह्मस्वरूप प्रकट होतें ॥ १० ॥

---

## मंत्र अकरावा.

**विज्ञानात्मा सह देवैश्च सर्वैः प्राणा भूतानि संप्रतिष्ठन्ति यत्र । तदक्षरं वेदयते यस्तु सोम्य स सर्वज्ञः सर्वमेवाविवेशेति ॥ ११ ॥**

अन्वय व अर्थ—सर्वैः देवैः सह विज्ञानात्मा, प्राणाः भूतानि यत्र संप्रतिष्ठंति ( सर्व देवासह विज्ञानात्मा, प्राण आणि पंचमहाभूतें जेथें लय पावतात. ) तत् अक्षरं यः तु वेदयते, सोम्य ! सः सर्वज्ञः सर्वं एव आविवेश ( हे सौम्य तें अक्षर—परब्रह्मस्वरूप—ज्याला समजतें तो सर्वज्ञ होऊन सर्वव्यापी होतो. ) ॥ ११ ॥

विज्ञानात्मा सह देवैश्चाग्न्यादिभिः प्राणाश्चक्षुरादयो भूतानि पृथिव्यादीनि संप्रतिष्ठन्ति प्रविशन्ति यत्र यस्मिन्नक्षरे तदक्षरं वेदयते यस्तु सोम्य प्रियदर्शन स सर्वज्ञः सर्वमेवाऽऽविवेशाऽऽविशतीत्यर्थः ॥ ११ ॥

इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यश्रीमद्गोविन्दभगवत्पूज्यपादशिष्यश्रीमच्छंकरभगवतः कृतौ प्रश्नोपनिषद्भाष्ये
चतुर्थः प्रश्नः ॥ ४ ॥

सिद्धान्ती—अग्निप्रमुख सर्व देवता, नवव्या मंत्रांत सांगितलेला विज्ञानात्मा, नेत्रेंद्रियादि सर्व प्राण, पृथ्वीप्रमुख पंचमहाभूतें, हीं सर्व ज्या स्वरूपांत प्रवेश करून लीन होतात. तें अविकारी व अविनाशी ब्रह्मस्वरूप ज्याला समजतें, तो हे प्रियदर्शना गार्ग्यशिष्या ! सर्वज्ञ होतो. इतकेंच नव्हे तर सर्वांमध्यें प्रवेश करून सर्वांस प्रतिष्ठित करितो. सारांश तो सर्वव्यापी होतो. तो ब्रह्म असून ब्रह्म होतो ! ॥ ११ ॥

चौथा प्रश्न समाप्त.

## चौथ्या प्रश्नोत्तराचा सारांश.

या प्रश्नांत जागृतिस्थितिव्यतिरिक्त इतर स्थितींत म्हणजे स्वप्नस्थितींत आणि निद्रास्थितींत जागें कोण असतें, सुख कोणास होतें आणि आपलीं इंद्रियें, प्राण व मन इत्यादि काय काय कर्मे करितात याचें वर्णन आहे. हें वर्णन मूळ ग्रंथाच्या वाचनानें व उपसंहारांतील स्पष्टीकरणानें बरेंच स्पष्ट होईल असें वाटतें. मला येथें केवळ आचार्यांनीं देव याचा अर्थ मन असा केला आहे, त्यासंबंधानें एकदोन शब्द लिहावयाचे आहेत. स्वप्नामध्यें आपल्यास जे जे चमत्कार दिसतात, ते आपण पाहातों किंवा मनाच्या द्वारानें ते आपल्यास दिसतात, याचा विचार करावयाचा आहे. स्वप्नाचा मूळ द्रष्टा कोण ? या प्रश्नाला एकच उत्तर आहे तें हें कीं, स्वप्नांतील चमत्कार मनालाच प्रथमतः दिसतात. कारण, क्षेत्रज्ञ ( जीव व जीवात्मा ) हा आचार्यांच्या सिद्धांताप्रमाणें व माझ्या समजुतीप्रमाणें ज्ञानरूप असल्यामुळें त्याला जागृतीची अथवा निद्रेची अवस्था केव्हांही नसते. क्षेत्रज्ञ झोंपी गेला किंवा जागृत राहिला असें म्हणणें म्हणजे सूर्याला प्रकाश दिसला किंवा त्याला अंधेरी आली असें म्हणण्यासारखें होय. त्याला जागृति आदि अवस्था नाहींत. म्हणून तो स्वप्नाचा साक्षी नाहीं. तर मग स्वप्न पाहतो कोण ? मन पाहतें. मन [illegible] स्वप्नस्थितीचा द्रष्टा आहे. मनच पाहिलेल्या व ऐकलेल्या गोष्टींच्या संस्कारांस एकत्र करून अनेक चमत्कार आपणच उत्पन्न करतें आणि आपणच ते पाहात राहतें. यास्तव त्याला आचार्यांनीं स्वप्न स्थितींतील स्वातंत्र्य दिलें आहे. "मी अमुक अमुक स्वप्न पाहिलें." असा व्यवहार आपण नित्य करितों हें खरें. पण वास्तविक पाहवां मनच स्वप्नसृष्टि उत्पन्न करून ती पाहात असतें. अथवा मनाची उपाधि आहे म्हणून जीवात्म्याला 'आपण स्वप्न पाहिलें' अशी भ्रांति होते. मन नसेल तर, मन झोंपी जातें तेव्हां, जीवात्म्यास स्वप्नस्थितीचाअनुभव येत नाहीं. तसेंच मनाचें अधिष्ठान जीवात्मा आहे, तथापि मनाच्या उपाधीनें मात्र स्वप्न-सृष्टीचा चमत्कार उत्पन्न होतो व लयाला जातो. स्वप्नसृष्टींतील चमत्कारांच्या उत्पत्तिस्थितिलयांचें कार्य मन हें स्वतंत्रतेनें करीत असतें म्हणून मन हेंच स्वप्नाचें मूळ कारण आहे, असें आचार्यांनीं म्हटलें आहे. आणि हें म्हणणें माझ्या समजुतीनें योग्य आहे; पण त्यावेळीं मन हेंही निद्रावस्थेचा उपभोग घेतें, त्यावेळीं जें एक अनिर्वचनीय सुख होत असतें, त्याचा उपभोक्ता जीवात्मा असतो. असो; या सर्वांचें स्पष्टीकरण मूळभाष्यांत उत्तम रीतीनें विशद झालें आहे म्हणून त्याचें विवरण करण्याचें प्रयोजन दिसत नाहीं. या सर्व अवस्थांमध्यें प्राण आपलें काम चोख बजावीत असतो. हें केव्हांही विसरतां कामा नये. आणि प्राणांसह सर्व ज्ञानेंद्रियें मन, बुद्धि चित्त, अहंकार व कर्मेंद्रियें आत्मस्वरूपाच्या आधारावर स्थित होतात आणि तेथेंच कांहीं कालपर्यंत लीन होतात. जो

पुरुष परमात्म्याच्या छायाशून्य, अशरीर, अरूप, शुद्ध आणि अविनाशी स्वरूपाचें ज्ञान करून घेतो, तो सर्वज्ञ आणि सर्वरूप होऊन उपाधिशून्य होत्साता परमात्मपदाप्रत जातो. त्याचा जीवात्मा परमात्मरूप होतो, सारांश तो मुक्त होतो.

---

## प्रश्न पांचवा.

### मंत्र पहिला.

### अथ हैनं शैब्यः सत्यकामः पप्रच्छ

अन्वय व अर्थ—अथ ह एनं शैब्यः सत्यकामः पप्रच्छ ( नंतर शिबिकुलांतील सत्यकाम नामक शिष्यानें पिप्पलादमुनीस विचारिलें ).

अथ हैनं शैब्यः सत्यकामः पप्रच्छ ।

सिद्धान्ती—चौथ्या प्रश्नांत उत्तम अधिकाऱ्यानें पदार्थशोधन करून वाक्यार्थज्ञानाची प्राप्ति करून घेतली असतां त्याला ब्रह्मप्राप्ति होते असें सांगितलें. आतां या मन्त्रांत अनधिकारी व मंद वैराग्य असणाऱ्या लोकांचा विचार कर्तव्य आहे. येथें ॐकार–उपासनेचा विचार सांगावयाचा आहे.

अथेदानीं परापरब्रह्मप्राप्तिसाधनत्वेनोंकारस्योपासनविधित्सया प्रश्न आरभ्यते—

सिद्धान्ती—आतां येथें पर आणि अपर जें ब्रह्म आहे ( निर्गुण आणि सगुण ब्रह्म आहे ) त्याची प्राप्ति करून देण्याला उत्तम साधन असणारी जी ॐकाराची उपासना ती कशी करावयाची, ही जाणण्याचा हेतु मनांत धरून पांचव्या प्रश्नाचा अवतार झाला आहे. ॐकाराची उपासना विहित मार्गानें केली असतां ब्रह्मप्राप्ति साध्य होते म्हणून या प्रश्नांत ॐकारोपासनेचा विधि-विचार–कसा असतो हा प्रश्न विचारला आहे.

### स यो ह वै तद्भगवन्मनुष्येषु प्रायणान्तमोंकारमभिध्यायीत । कतमं वाव स तेन लोकं जयतीति तस्मै स होवाच ॥ १ ॥

अन्वय व अर्थ—भगवन्, मनुष्येषु सः यः ह वै तत् प्रायणांतं ॐकारम् अभिध्यायीत ( हे भगवन्, मनुष्यामध्यें जो कोणी सर्व जन्मभर ॐकारस्वरूपाचें ध्यान करितो ) सः तेन कतमम् वाव लोकं

जयति इति ( तो या ध्यानानें कोणता लोक प्राप्त करून घेतो बरें ? ) तस्मै सः ह उवाच ( या शिष्याला पिप्पलादांनीं उत्तर दिलें. ) ॥ १ ॥

स यः कश्चिद्ध वै भगवन्मनुष्येषु मनुष्याणां मध्ये तदद्भुतमिव प्रायणान्तं मरणान्तं यावज्जीवमित्येतदोंकारमभिध्यायीताऽऽभिमुख्येन चिन्तयेत् । बाह्यविषयेभ्य उपसंहृतकरणः समाहितचित्तो भक्त्यावेशितब्रह्मभाव ओंकारे । आत्मप्रत्ययसंतानाविच्छेदो भिन्नजातीयप्रत्ययान्तराखिलीकृतो निर्वातस्थदीपशिखासमोऽभिध्यानशब्दार्थः । सत्यब्रह्मचर्याहिंसापरिग्रहत्यागसंन्यासशौचसंतोषामायावित्वाद्यनेकयमनियमानुगृहीतः स एवं यावज्जीवव्रतधारणः । कतमं वाव अनेके हि ज्ञानकर्मभिर्जेतव्या लोकास्तिष्ठन्ति तेषु तेनोंकाराभिध्यानेन कतमं स लोकं जयतीति पृष्टवते तस्मै स होवाच पिप्पलादः ॥ १ ॥

सिद्धान्ती—भगवन्, हजारों मनुष्यांमध्यें जो कोणी एखादा आपल्या मरणाच्या क्षणापर्यंत, त्याचा जीवमान आहे तोंपर्यंत त्या अद्भुत-ॐकारस्वरूपाचें दृढ निश्चयानें एकाग्र चिंतन करितो, उत्तम प्रकारचें ध्यान करितो.—

शिष्य—ध्यानाचें स्वरूप कसें असतें ?

सिद्धान्ती—बाह्य विषयांपासून ज्यानें आपलीं सर्व अंतर्बाह्य इंद्रियें पराङ्च केलीं आहेत, तीं अंतर्मुख झाल्यामुळें ज्याचें अंतःकरण शांत झालें आहे आणि ज्यानें परम आदरानें ॐकारस्वरूपाचे ठिकाणीं ब्रह्माची भावना स्थापन केली आहे तो पुरुष उत्तम प्रकारचें चिंतन करितो असें म्हणावें. हें धारणेचें स्वरूप झालें. आतां ध्यानाचें स्वरूप काय तें सांगतों. एकाच वस्तूच्या ज्ञानाचा अखंड प्रत्यय असणें आणि भिन्न जातीच्या प्रत्ययाचा मागमूसही नसणें हा जो विधि विधि त्यास ध्यान असें म्हणावें. निर्वात प्रदेशामध्यें दीपज्योति जशी शांत असते, मुळींच हालचाल करीत नाहीं, त्याप्रमाणें चिंतनाच्या विषयाखेरीज अन्य विषयाला जेथें मुळींच थारा मिळत नाहीं, त्याला ध्यान असें म्हणावें. हें ध्यान करणारा पुरुष सत्यवक्ता, ब्रह्मचारी, हिंसाशून्य, पूर्णवैराग्यशील, संन्यासी, शुद्ध, संतुष्ट, मायेचें स्वरूप ओळखणारा, अज्ञान नसणारा, कपटी व दांभिक नसणारा इत्यादि गुणविशिष्ट असून अनेक यमनियमांनीं अनुगृहीत झालेला असतो. यावज्जीव तो नैष्ठिक व्रताचा आश्रय करित असतो. सत्यकाम विचारतो,–भगवन्, ज्ञानानें आणि कर्मानें प्राप्त होणारे अनेक लोक आहेत. यांपैकीं आतांच मी वर्णन केल्याप्रमाणें जो अधिकारी पुरुष ॐकाराची ध्यान–धारणा करितो, त्याला कोणता लोक प्राप्त होतो बरें ? हा प्रश्न ऐकून पिप्पलादांनीं उत्तर देण्यास आरंभ केला.

शिष्य—असें विचारण्याचा काय हेतु आहे.

सिद्धान्ती—दहरादि उपासना केल्या असता अपरब्रह्माची प्राप्ति होते, त्याप्रमाणें ॐकारोपासना ही अपरब्रह्मप्राप्तीचें साधन आहे किंवा, परब्रह्माचीही प्राप्ति या साधनानें सिद्ध होते हें प्रश्नकर्त्यास विचारावयाचें आहे. ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

### एतद्वै सत्यकाम परं चापरं च ब्रह्म यदोंकारः। तस्माद्विद्वानेतेनैवाऽऽयतनेनैकतरमन्वेति ॥ २ ॥

अन्वय व अर्थ—सत्यकाम, एतत् वै परं च अपरं च ब्रह्म यत् ॐ कारः ( हे सत्यकाम, जें ॐ आहे तें हें पर आणि अपर ब्रह्म आहे ) तस्मात् एतेन एव आयतनेन विद्वान् एकतरं अन्वेति ( म्हणून ॐकार या आलंबनाच्या साहाय्यानें विद्वान् पुरुष पर किंवा अपर ब्रह्माची प्राप्ति करून घेतो. )

साराद्य, ॐकार हें पर आणि अपर ब्रह्माचें आलंबन आहे. हें ज्याला समजलें तो ह्याचा आधार घेऊन पर किंवा अपर ब्रह्मप्राप्ति करून घेतो. ॥ २ ॥

एतद्वै सत्यकाम । एतद् ब्रह्म वै परं चापरं च ब्रह्म परं सत्यमक्षरं पुरुषाख्यमपरं च प्राणाख्यं प्रथमजं यत्तदोंकार एवोंकारात्मकमोंकारप्रतीकत्वात् । परं हि ब्रह्म शब्दाद्युपलक्षणानर्हं सर्वधर्मविशेषवर्जितमतो न शक्यमतीन्द्रियगोचरत्वात्केवलेन मनसाऽवगाहितुमोंकारे तु विष्ण्वादिप्रतिमास्थानीये भक्त्यावेशितब्रह्मभावे ध्यायिनां तत्प्रसीदतीत्यवगम्यते शास्त्रप्रामाण्यात्तथाऽपरं च ब्रह्म । तस्मात्परं चापरं च ब्रह्म यदोंकार इत्युपचर्यते । तस्मादेवं विद्वानेतेनैवाऽऽत्मप्राप्तिसाधनेनैवोंकाराभिध्यानेनैकतरं परमपरं वाऽन्वेति ब्रह्मानुगच्छति नेदिष्ठं ह्यालंबनमोंकारो ब्रह्मणः ॥ २ ॥

सिद्धान्ती—सत्यकामाचा अभिप्राय अथवा मनांतील हेतु कोणता आहे, हें पिप्पलादमुनींस सहज समजलें. तेव्हां त्यांनीं अपराचें आलंबन करून ध्यान केलें असता अपरब्रह्माची मात्र प्राप्ति होते व पराचें आलंबन करून ध्यान केलें असतां क्रमानें परब्रह्माचीही प्राप्ति होते, असें या मंत्रांत उत्तर दिलें आहे. कसें तें ऐक–सत्यकामा! हें ब्रह्म पर आणि अपर या स्वरूपाचें आहे. पर म्हणजे

## मंत्र तिसरा.

**स यद्येकमात्रमभिध्यायीत स तेनैव संवेदितस्तूर्णमेव जगत्यामभिसंपद्यते । तमृचो मनुष्यलोकमुपनयन्ते स तत्र तपसा ब्रह्मचर्येण श्रद्धया संपन्नो महिमानमनुभवति ॥ ३ ॥**

अन्वय व अर्थः—सः यदि एकमात्रं अभिध्यायीत सः तेन एव संवेदितः, तूर्णं एव जगत्याम् अभिसंपद्यते ( तो जर एकमात्रा रूपी ध्यान करीत असेल तर त्या ध्यानाच्या संस्कारानीं दृढ परिणाम घडवून आणून त्या पुरुषाला मनुष्य लोक लवकरच प्राप्त होतो. ) ऋचः तं मनुष्यलोकं उपनयंते ( ऋग्वेदांतील मंत्र ह्या ध्यानी पुरुषास—योग्यास—मनुष्यलोकीं नेतात. ) सः तत्र तपसा, ब्रह्मचर्येण, श्रद्धया, संपन्नः महिमानं अनुभवति ( या लोकीं तो योगी तपानें, ब्रह्मचर्यानें आणि श्रद्धेनें संपन्न होऊन श्रेष्ठ पदाचा अनुभव घेतो. )

सारांश, ॐकारस्वरूपाच्या एकमात्रेचें ( अकाराचें ) ध्यान करील तर त्याला ऋग्वेदांतील मंत्र मनुष्यलोकाची प्राप्ति करून देतात. आणि तेथें तो तप, श्रद्धा, आणि ब्रह्मचर्य यांच्या साहाय्यानें श्रेष्ठ पदवी प्राप्त करून घेतो. ॥३॥

स यद्यप्योंकारस्य सकलमात्राविभागज्ञो न भवति तथाऽप्योंकाराभिध्यानप्रभावाद्विशिष्टामेव गतिं गच्छति एतदेकदेशज्ञानवैगुण्यतयोंकारशरणः कर्मज्ञानोभयभ्रष्टो न दुर्गतिं गच्छति किं तर्हि यद्यप्येवमोंकारमेवैकमात्राविभागज्ञ एव केवलोऽभिध्यायीतैकमात्रं सदा ध्यायीत स तेनैवैकमात्राविशिष्टोंकाराभिध्यानेनैव संवेदितः संबोधितस्तूर्णं क्षिप्रमेव जगत्यां पृथिव्यामभिसंपद्यते । किं, मनुष्यलोकम् । अनेकानि हि जन्मानि जगत्यां संभवन्ति तत्र तं साधकं जगत्यां मनुष्यलोकमेवर्च उपनयन्त उपनिगमयन्ति । ऋच ऋग्वेदरूपा ह्योंकारस्य प्रथमैकमात्राऽभिध्याता । तेन स तत्र मनुष्यजन्मनि द्विजाऽग्र्यः संस्तपसा ब्रह्मचर्येण श्रद्धया च संपन्नो महिमानं विभूतिमनुभवति न वीतश्रद्धो यथेष्टचेष्टो भवति योगभ्रष्टः कदाचिदपि न दुर्गतिं गच्छति ॥ ३ ॥

सिद्धान्ती—मागें सांगितलेल्या योग्याला यद्यपि संपूर्ण ॐकार स्वरूपाचें व या स्वरूपांतील विशेषमात्रांचें ज्ञान नसलें; तथापि या प्रणवाच्या ध्यान-सामर्थ्यानें त्याला विशेष ऐश्वर्य प्राप्त करून घेण्याचें सामर्थ्य येतें.

शिष्य—ॐकारस्वरूपाच्या मात्रा कोणत्या आहेत?

सिद्धान्ती—अ,उ, आणि म् ह्या तीन मात्रांनीं ॐकाराचें स्वरूप घटित होतें. अ ऋग्वेदाचा दर्शक आहे.उ यजुर्वेदाचा आणि म् सामवेदाचा दर्शक आहे. अ, उ आणि म् मिळून ॐकाररूप प्रणव आहे. असो; प्रणवाचें ध्यान करावयाचें म्हणून कोणी त्याच्या एकदेशाचें म्हणजे अकाराचें केवळ अज्ञानवशात् ध्यान केलें असता जें कांहीं वैगुण्य प्राप्त होतें, (ध्यानाला कमीपणा येतो). त्यामुळें कांहीं एक अपाय न घडतां प्रणवाचा आश्रय करणारा पुरुष कर्मभ्रष्ट किंवा ज्ञानभ्रष्ट होत नाहीं. व त्याला दुर्गतिही प्राप्त होत नाहीं. आतांच सांगितल्याप्रमाणें या एकदेशी योग्याला सुद्धा विशेष चांगली स्थिति प्राप्त होते, हें दाखविण्यासाठीं या मंत्राची योजना आहे.

शिष्य—चांगली गति तरी कोणती मिळते.

सिद्धान्ती—ऐक. प्रणवाच्या पूर्ण स्वरूपाचें ज्ञान नसणाऱ्या पुरुषानें यद्यपि एका मात्रेचें (' अ 'काराचें ) एकाग्र चित्तानें दृढ ध्यान केलें, तथापि त्या एक-मात्रा विशिष्ट ॐकाराच्या ध्यानानें सुद्धां त्याला ज्ञान होऊन तो लवकरच पृथ्वीवर राहण्याच्या अधिकाराला योग्य होतो.

शिष्य—येथें एकमात्रेचें ध्यान म्हणजे अ, उ, म् पैकीं एका मात्रेला प्रधान करून बाकीच्या दोन मात्रांस गौण समजावयाचें आणि याप्रमाणें ॐकार स्वरूपाचें ध्यान करावयाचें किंवा दीपिकेंत म्हटलें आहे त्याप्रमाणें अ कार मात्र ॐकारस्वरूप आहे असें समजावयाचें ?

सिद्धान्ती—श्रुतीला दुसरा पक्ष इष्ट आहे असें दिसतें.

शिष्य—भगवन्, पृथ्वीवर येऊन याला काय मिळतें ?

सिद्धान्ती—त्याला मनुष्य जन्म मिळतो. बाबा ! या पृथ्वीवर जीवांच्या अनंत कोटी आहेत. त्यांतील मनुष्य कोटी आतांच सांगितलेल्या योग्याला प्राप्त होते.

शिष्य—मनुष्यजन्माचें सार्थक येथें काय आहे ?

सिद्धान्ती—तुला आतांच सांगितलें कीं, अकार हा ऋग्वेदाचा दर्शक आहे. ऋग्वेद हा अ कार असून पृथ्वी हें त्याचें रूपक आहे; असें प्रत्यक्ष श्रुति सांगते. यावरून ॐकाराची प्रथम जी अ-कार मात्रा ती ऋग्वेदरूप आहे, हें ठरतें. ऋग्वेद पृथ्वीरूप आहे; म्हणून अकाराच्याच पृथ्वीलोकावर धर्माधिकारी मनुष्यजन्म येतो. येथें या ध्यान-प्रभावानें मनुष्य जन्म पावलेला

हा जीव द्विजांमध्ये अग्रणी ( ब्राह्मण ) होऊन तप, श्रद्धा आणि ब्रह्मचर्य या संपत्तीनें विराजमान होतो आणि उक्त स्थितीला जाण्यास योग्य होऊन आपल्या ऐश्वर्याचा अनुभव घेतो.

शिष्य—त्याची श्रद्धा नाहींशी होत नाहीं काय, किंवा तो इच्छेप्रमाणें बऱ्या वाईट चेष्टा करीत नाहीं काय ?

सिद्धान्ती—नाहीं. या योगभ्रष्ट पुरुषाला केव्हांही दुर्गति प्राप्त होत नाहीं. भगवान् गीताकारांचाही असाच सिद्धांत आहे हें तुला आठवत असेलच. एकनिष्ठेनें चांगल्या मार्गास लागलेला मनुष्य केव्हांही दुर्गति प्राप्त करून घेत नाहीं असें. ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

### अथ यदि द्विमात्रेण मनसि संपद्यते सोऽन्तरिक्षं यजुर्भिरुन्नीयते सोमलोकं स सोमलोके विभूतिमनुभूय पुनरावर्तते ॥ ४ ॥

अन्वय व अर्थ—अथ यदि द्विमात्रेण मनसि संपद्यते सः यजुर्भिः अंतरिक्षं सोमलोकं उन्नीयते ( आतां दुसऱ्या मात्रेचें—उकाराचें—ॐकारस्वरूपाचें मनन केलें; तर हा योगी पुरुष यजुर्वेदाच्या साह्यानें अंतरिक्षांत उन्नत होऊन सौम्य जन्म प्राप्त करून घेतो. ) सः सोमलोके विभूतिं अनुभूय पुनःपुनः आवर्तते ( हा योगी अंतरिक्षांतील ऐश्वर्याचा अनुभव घेऊन पुनः मनुष्यलोकीं जन्माला येतो. ॥ ४ ॥

अथ पुनर्यदि द्विमात्राविभागज्ञो द्विमात्रेण विशिष्टमोंकारमभिध्यायीत स्वप्नात्मके मनसि मननीये यजुर्मये सोमदैवत्ये संपद्यत एकाग्रतयाऽऽत्मसात्वं गच्छति । स एवं संपन्नो मृतोऽन्तरिक्षमन्तरिक्षाधारं द्वितीयमात्रारूपं द्वितीयमात्रारूपैरेव यजुर्भिरुन्नीयते सोमलोकं सौम्यं जन्म प्रापयन्ति तं यजूंषीत्यर्थः । स तत्र विभूतिमनुभूय सोमलोके मनुष्यलोकं प्रतिपुनरावर्तते ॥ ४ ॥

सिद्धान्ती—आतां जर प्रणवाच्या द्वितीय मात्रेनें ( उकारानें ) मात्र ॐकारस्वरूपानें ध्यान करील तर—

शिष्य—भगवन्, उकार विशिष्ट ॐकार स्वरूप आहे असें ध्यान करील, असेंच समजावयाचें ना ?

सिद्धान्ती—होय, हें ध्यान म्हणजे उकारविशिष्ट प्रणव ( ॐकार ) 'मी आहें' असें ध्यान करील. सारांश, योग्याच्या चित्तांत प्रणवस्वरूपच 'मी आहें,' अशी एकाग्रवृत्ति परिपक्क होईल तर—

शिष्य—महाराज, मन हें स्वप्नात्मक आहे असें सांगणारी एक श्रुति आहे. तेव्हां यजुर्वेदाचा दर्शक जो उकार त्याचें दृढ चिंतन केलें असतां यजुर्वेदाची जी सोमदेवता तिचें स्वरूप प्राप्त व्हावें अशी भावना असते. तात्पर्य, उकारध्यानानें उकार देवता आपणच आहोंत असें भान होतें, म्हणून उकारविशिष्ट प्रणवाचें ध्यान करणारा पुरुष स्वाप्निकभावनेनें तरी सोमस्वरूप होतो, असें मला वाटतें.

सिद्धान्ती—बरोबर आहे. उकाराच्या एकाग्र चिंतनानें सोमभावना निश्चित झालेला योगी मरण पावल्यावर अंतरिक्षाचा आधार असणारा उकारस्वरूपी जो सोमलोक त्याप्रत उकारस्वरूपी यजुर्वेदाच्या साहाय्यानें जातो आणि तेथें याच वेदाच्या आश्रयानें त्याला सौम्य जन्म प्राप्त होतो. असो; तेथील ऐश्वर्यांचा पूर्ण उपभोग घेतल्यावर हा आपला योगी पुनः मृत्युलोकीं प्राप्त होतो.

शिष्य—भगवन्! कांहीं पंडित या मंत्राचें व्याख्यान करितांना असें म्हणतात कीं, अकाराचे ठायीं विश्वाहून भिन्न नसणारें जें विराट्स्वरूप त्याची उपासना व उकाराचे ठायीं तेजःस्वरूपी हिरण्यगर्भाची उपासना, तें तें स्वरूप प्राप्त होण्यासाठीं सांगितली आहे. या उपासनांनीं विराट्स्वरूप अथवा हिरण्यगर्भस्वरूप प्राप्त होतें, असें हे पंडित म्हणतात.

सिद्धान्ती—तात्पर्य एकच आहे. दीपिकेमध्येही असें व्याख्यान केलें आहे कीं अ आणि उ या दोन मात्रांची प्रणवरूपानें उपासना करणें आणि मनानें एकाग्र चिंतन करणें, हा मुख्य भाग आहे. ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा.

**यः पुनरेतं त्रिमात्रेणोमित्येतेनैवाक्षरेण परं पुरुषमभिध्यायीत स तेजसि सूर्ये संपन्नः। यथा पादोदरस्त्वचा विनिर्मुच्यत एवं ह वै स पाप्मना विनिर्मुक्तः स सामभिरुन्नीयते ब्रह्मलोकं स एतस्माज्जीवघनात्परात्परं पुरिशयं पुरुषमीक्षते तदेतौ श्लोकौ भवतः ॥ ५ ॥**

अन्वय व अर्थ—यः पुनः त्रिमात्रेण, ॐ इति एतेन, एव अक्षरेण पुनः एतं परं पुरुषं अभिध्यायीत, सः तेजसि सूर्ये संपन्नः (पुनः जो योगी त्रिमात्रात्मक, मात्रात्रयात्मक जो प्रणवस्वरूपी ॐकार आहे—अविनाशी ॐकारस्वरूप आहे—त्याच्या द्वारानें परम पुरुषाचें एकनिष्ठ ध्यान करितो, तो अत्यंत तेजस्वी जो सूर्य त्याचें स्वरूप प्राप्त करून घेतो.) यथा पादोदरः त्वचा विनिर्मुच्यते एवं ह वै सः, पाप्मना विनिर्मुक्तः सः सामभिः ब्रह्मलोकं उन्नीयते (ज्याप्रमाणें सर्पाला त्याची त्वचा टाकून देते, त्याप्रमाणेंच ह्या योग्याला पापानें टाकून दिल्यावर तो महात्मा ब्रह्मलोकाला सामवेदाच्या साहाय्यानें जातो) एतस्मात् जीवघनात् सः परात्परं पुरिशयं पुरुषं ईक्षते (नंतर ह्या जीव—घन हिरण्यगर्भापासून अत्यंत दूर असणाऱ्या व सर्व शरीरांत प्रवेश करणाऱ्या पुरुषोत्तमाला पाहतो.) तत् एतौ श्लोकौ भवतः (हाच अर्थ सांगणारे पुढील दोन मंत्र आहेत.) ॥ ५ ॥

यः पुनरेतमोंकारं त्रिमात्रेण त्रिमात्राविषयविज्ञानविशिष्टेनो मित्येतेनैवाक्षरेण परं सूर्यान्तर्गतं पुरुषं प्रतीकेनाभिध्यायीत तेनाभिध्यानेन, प्रतीकत्वेन, ह्यालम्बनत्वं प्रकृतमोंकारस्य परं चापरं च ब्रह्मेत्यभेदश्रुतेरोंकारमिति च द्वितीयाऽनेकशः श्रुता याध्येतान्यथा यद्यपि तृतीयाभिधानत्वेन करणत्वमुपपद्यते तथाऽपि प्रकृतानुरोधात्त्रिमात्रं परं पुरुषमिति द्वितीयैव परिणेया त्यजेदेकं कुलस्यार्थे इति न्यायेन, स तृतीयमात्रारूपस्तेजसि सूर्ये संपन्नो भवति ध्यायमानो मृतोऽपि सूर्यात्सोमलोकादिवन्न पुनरावर्तते किंतु सूर्ये संपन्नमात्र एव। यथा पादोदरः सर्पस्त्वचा विनिर्मुच्यते जीर्णत्वग्विनिर्मुक्तः स पुनर्नवो भवति। एवं ह वा एष यथा दृष्टान्तः स पाप्मना सर्पत्वक्स्थानीयेनाशुद्धिरूपेण विनिर्मुक्तः सामभिस्तृतीयमात्रारूपैरूर्ध्वमुन्नीयते ब्रह्मलोकं हिरण्यगर्भस्य ब्रह्मणो लोकं सत्याख्यम्। स हिरण्यगर्भः सर्वेषां संसारिणां जीवानामात्मभूतः। स ह्यन्तरात्मा लिङ्गरूपेण सर्वभूतानां तस्मिन्हि लिङ्गात्मनि संहताः सर्वे जीवाः। तस्मात्स जीवघनः। स विद्वांस्त्रिमात्रोंकाराभिज्ञ एतस्माज्जीवघनाद्धिरण्यगर्भात्परात्परं परमात्माख्यं पुरुषमीक्षते पुरिशयं सर्वशरीरानुप्रविष्टं पश्यति ध्यायमानः। तदेतस्मिन्यथोक्तार्थप्रकाशकौ मन्त्रौ भवतः ॥ ५ ॥

सिद्धान्ती—पुनः जो योगी प्रणवाच्या मात्रात्रयाचें साहाय्यानें सूर्यबिंबाच्या आंत असणारा जो पुरुष त्याचें प्रणवरूपी प्रतीकानें ध्यान करितो.–

शिष्य—भगवन्! पूर्वीच्या दोन मंत्रांत पहिली मात्रा व दुसरी मात्रा ग्रहण केली, त्याच प्रमाणें प्रकृत मंत्रांत 'त्रिमात्रेण' याचा अर्थ तिसऱ्या मात्रेनें असा कां नाहीं घेतला?

सिद्धान्ती—कारण मंत्रांत 'ॐ रूपी' अक्षरानें असे स्पष्ट शब्द आहेत. असो; प्रणवाच्या तीन मात्रांचे जे तीन निरनिराळे विषय आहेत त्यांचें स्पष्ट ज्ञान येथें झालें आहे. अशा योगानें ॐकार हें प्रतीक घेऊन परम पुरुषाचें ध्यान करावें असें येथें सांगावयाचें आहे. ॐकाराला जें आलंबनत्व प्राप्त झालें आहे, परब्रह्माचें ध्यान करण्यास ॐकार हाच जो आलंब किंवा आश्रय मिळतो तो केवल ॐकारप्रतीक आहे ह्या दृष्टीनें मिळतो. [redacted] प्रणवध्यानाचें साधन आहे, असा अर्थ नव्हे; तर प्रणव हा केवळ प्रतीक आहे असें समजावयाचें आहे. ईश्वराची पूजा करितांना विष्णूची, शंकराची अथवा गणपतीची मूर्ति स्थापन करून आपण पूजा करितों हें खरें; पण मूर्ति कांहीं ईश्वर नव्हे. ही ईश्वराचें एक प्रतीक आहे, ईश्वराचें स्मरण करून देण्याचें एक आलंबन आहे, इतकाच अर्थ समजावयाचा. तसाच प्रणवाचा विचार आहे. शिवाय परब्रह्म आणि अपरब्रह्म ॐकार आहे असें दुसऱ्या मंत्रांत सांगून उभयतांत अभेदाचें वर्णन केलें आहे. प्रणव हें साधन आहे असें समजलें तर एकाच साधनानें परब्रह्माची व अपरब्रह्माची प्राप्ति होईल; असें होणें संभवनीय नाहीं. शिवाय ॐकाराला तर परब्रह्म व अपरब्रह्म असें म्हटलें आहे. अर्थात् ॐकार [redacted] परापरब्रह्माचें स्मरण करविणार आहे, प्रतीक (आलंबन) आहे, असें ठरतें. शिवाय 'ॐकाराचें ध्यान करा' तो 'ॐकाराचें जरी ध्यान करीत असला' इत्यादि अनेक वेळ ॐकार शब्द द्वितीया विभक्तीमध्यें अवतीर्णही झाला आहे. आपण येथें या अक्षराची तृतीया विभक्ति घेतली तर आतांच सांगितलेल्या द्वितीयेचा बाध होईल.

पूर्वपक्षी—द्वितीयेप्रमाणेंच ॐकार शब्द तृतीया विभक्तींत हा दोनदां दिसत आहे.

शिष्य—कोठें आहे असें?

पूर्वपक्षी—मंत्र चौथा व पांचवा पहा. येथें तृतीया विभक्तीचा अर्थ 'करण' म्हणजे साधन, असा आहे. मग मुख्यतः करणदर्शक अर्थच कां घेऊं नये. आणि ॐकारोपासना परब्रह्मप्राप्तीचें साधन आहे असें कां म्हणूं नये?

सिद्धान्ती—असें करितां येत नाहीं. कारण, प्रकृत अन्वयाला ती गोष्ट जुळत नाहीं. [illegible] विभक्ति आहे. पुरुषोत्तमाविषयीं येथें त्रिमात्रक पुरुषोत्तमाची [illegible] घेऊन प्रणव हा केवळ प्रतीक बोधा[illegible]चें आहे. म्हणून द्वितीयापरत्व [illegible] आहे, असें समजलें पाहिजे.

शिष्य—सर्व कुलाचा नाश होत असेल तर एका पुरुषाचा बळी देऊन कुलाचें संरक्षण करावें, हा जसा न्याय आहे. त्या प्रमाणेंच येथें ही व्यवस्था करून प्रणवरूपी प्रतीकानें परमेश्वराचें ध्यान करावें हें इष्ट आहे, असें स्पष्ट दिसतें.

सिद्धान्ती—बरोबर आहे. दुसऱ्या मंत्रांतील आयतन हें पद व एका पाठी-मागून दुसऱ्याकडे जातो, ही,पदें स्पष्ट प्रणव आलंबन आहे असें सुचवितात. म्हणून पूर्वपक्षीमानें तृतीया विभक्तीची दोन स्थळें दाखविलीं तीं त्याज्य आहेत. असो; हा आपला योगी तृतीयमात्रक जो 'ॐ' त्याच्या अखंड ध्यानानें आपण तेजस्वी सूर्य आहों अशी भावना करून घेतो. हा योगी पंचत्व पावला असतां सूर्यलोकांत जातो; तथापि सोम लोकांतील पुरुष जसे परत येतात, तसा हा परत येत नाहीं. तो सूर्यस्वरूपी मात्र होतो. 'म' ही मात्रा आदि-त्यात्मक आहे. तिच्या सामर्थ्यानें सूर्यलोकप्राप्ति होते. असो; ज्या प्रमाणें एखाद्या सर्पाची जीर्ण त्वचा (कात) नाहींशी झाल्यावर (कात टाकल्यावर) तो सर्प नवा होतो, त्याप्रमाणेंच हा आपला ॐकार-स्वरूपाचें अखंड ध्यान करून सूर्यात्मक 'मकार-मात्रेच्या साहाय्यानें आपण सूर्य आहों अशी भावना करितो आणि अशुद्ध व अमंगल असणारें जें पाप त्यापासून विमुक्त होतो. नव्या सर्पाप्रमाणें पापमुक्त झालेला हा योगी 'मकार-मात्रेचा आधार असणाऱ्या सामवेदानें ब्रह्मलोकाप्रत जातो.

शिष्य—ब्रह्मलोक म्हणजे ?

सिद्धान्ती—हिरण्यगर्भाचा सत्य नामक जो लोक आहे तेथें हा योगी जातो. तुला ठाऊकच आहे की, सर्व संसारी जीवांचा आत्मा म्हणजे हिरण्यगर्भ होय. तो लिंगरूपानें सर्व भूतांचा अंतरात्मा आहे. त्याच्यामध्यें सर्व जीव एकवट होतात; म्हणून श्रुति हिरण्यगर्भाला जीवघन असें नांव देते.

शिष्य—जीवाला जसा लिंगदेह असतो, तसाच विराट्पुरुषाला लिंग-देह असतो ?

सिद्धान्ती—होय. हा समष्टिलिंगदेह आहे. जीवाच्या लिंगदेहाला व्यष्टि-लिंगदेह म्हणावें आणि हिरण्यगर्भाला समष्टिलिंगदेह म्हणावें. असो; हा विद्वान् पुरुष ( ॐकारस्वरूपाचें पूर्ण ज्ञान असणारा योगी ) या जीवघन हिरण्यगर्भा-च्याही पलीकडे राहणारा जो परमात्मा नांवाचा पुरुष आहे, त्याला ब्रह्मलोकांतून पाहतो आणि साक्षात्कार झाल्यावर मुक्त होतो. मंत्रांत ' पुरिशय ' असें जें पद आहे, त्याचा अर्थ सर्व जीवाच्या सर्व शरीरांत ( कारण, सूक्ष्म आणि स्थूल शरी-रांत ) प्रवेश करणारा असा आहे. या योग्याला ध्यान करीत असतां परमेश्वरी स्वरूपाचा अखंड साक्षात्कार होतो आणि तो मुक्त होतो. आम्ही जो अर्थ केला आहे, तोच अर्थ प्रकाशित करणारे पुढील दोन मंत्र आहेत ॥ ५ ॥

---

## मंत्र सहावा.

**तिस्रो मात्रा मृत्युमत्यः प्रयुक्ता अन्योन्यसक्ता अनविप्रयुक्ताः । क्रियासु बाह्याभ्यन्तरमध्यमासु सम्यक्प्रयुक्तासु न कम्पते ज्ञः ॥ ६ ॥**

अन्वय व अर्थ—तिस्रः मृत्युमत्यः मात्राः क्रियासु बाह्याभ्यंतर-मध्यमासु सम्यक्प्रयुक्तासु प्रयुक्ताः अन्योन्यसक्ताः अनविप्रयुक्ताः ज्ञः न कंपते ( ज्यांच्यावर मृत्यूची सत्ता आहे, त्या तीन अकारादि मात्रा ध्यानक्रियेमध्यें—बाह्य, आभ्यंतर आणि मध्यम ध्यानक्रियेमध्यें योग्य रीतीनें प्रयुक्त केलेल्या ध्यानक्रियांमध्यें परस्परासक्त रीतीनें व एक-मेकींपासून एकमेकींचा वियोग होत नाहीं अशा रीतीनें प्रयुक्त केल्या असतां ज्ञानी पुरुषाला भयकंप प्राप्त होत नाहीं. )

सारांश, ॐकार स्वरूपाचें पूर्ण ज्ञान झालेल्या पुरुषास कोणत्याही प्रकारचें भीति असत नाहीं. ॥ ६ ॥

तिस्रस्त्रिसंख्याका अकारोकारमकाराख्या ओंकारस्य मात्राः मृत्युमत्यः, मृत्युर्यासां विद्यते ता मृत्युमत्यो मृत्युगोचराद-नतिक्रान्ता मृत्युगोचरा एवेत्यर्थः । ता आत्मनो ध्यानक्रि-यासु प्रयुक्ताः । किंचान्योन्यसक्ता इतरेतरसंबद्धाः । अनविप्र-युक्ता विशेषेणैकैकविषय एव प्रयुक्ता विप्रयुक्ताः । न तथा विप्रयुक्ता अविप्रयुक्ता नाविप्रयुक्ता अनविप्रयुक्ताः । किं तर्हि विशेषेणैकस्मिन्ध्यानकाले तिसृषु क्रियासु बाह्याभ्यन्तर मध्य-मासु जाग्रत्स्वप्नसुषुप्तस्थानपुरुषाभिध्यानलक्षणासु योगक्रियासु सम्यक्प्रयुक्तासु । सम्यग्ध्यानकाले प्रयोजितासु न कम्पते न चलति ज्ञो योगी यथोक्तविभागज्ञ ओंकारस्येत्यर्थः । न तस्यै-वंविदश्चलनमुपपद्यते । यस्माज्जाग्रत्स्वप्नसुषुप्तपुरुषाः सह स्थानै-र्मात्रात्रयरूपेणोंकारात्मरूपेण दृष्टः स ह्येवं विद्वान्सर्वात्मभूत ओंकारमयः क्वो वा चलेत्कस्मिन्वा ॥ ६ ॥

शिष्य—ह्या कशा प्रयुक्त करावयाच्या ?

सिद्धान्ती—त्या परस्परांशीं संबद्ध असल्या पाहिजेत. प्रत्येकीबरोबर सर्वांचा च सर्वांबरोबर प्रत्येकीचा संबंध असला पाहिजे;[1] तरेंच त्या अनविप्रयुक्त असाव्या.

शिष्य—अनविप्रयुक्त या आलेल्या शब्दाचा अर्थ काय ?

सिद्धान्ती—विशेषतः एकेकच विषयाच्या ठिकाणीं विशेष रीतीनें प्रयुक्त झालेल्या ज्या मात्रा त्यांस विप्रयुक्त म्हणावें. त्याप्रमाणें विप्रयुक्त नव्हेत त्या अविप्रयुक्त मात्रा असें म्हणावें. अविप्रयुक्त नव्हेत त्या अनविप्रयुक्त होत.

शिष्य—हें लक्षण मला समजत नाहीं.

सिद्धान्ती—अ, उ आणि म् ह्या तीन प्रणवाच्या मात्रांचे तीन निरनिराळे विषय आहेत. अ ही मात्रा जाग्रत स्थितींतील वैश्वानरसदृश विश्व नामक पुरुषाची दर्शक असून तिचें स्थान स्थूल शरीर आहे. उ ही मात्रा स्वप्न स्थितींतील हिरण्यगर्भात्मक तैजस पुरुषाची दर्शक असून तिचें स्थान लिंगशरीर आहे. आणि म् ही मात्रा सुषुप्तिस्थितींतील ईश्वरात्मक प्राज्ञ पुरुषाची दर्शक असून तिचें स्थान अव्याकृत ( कारण शरीर ) आहे. आतांच जीं तीन निरनिराळीं स्थानें सांगितलीं तीं तीन पुरुषावस्थांचीं स्थानें आहेत. अर्थातच या तीन मात्रांचे विषय ही निरनिराळे आहेत. अकाराचा विषय विश्व पुरुष, उकाराचा तैजस पुरुष आणि मकाराचा प्राज्ञ पुरुष असे हे निरनिराळे विषय आहेत. या तीन निरनिराळ्या पुरुषांचें मात्र एकेकटें ध्यान करणें हें विप्रयुक्त ध्यान झालें. तसें न करतां तिन्ही मात्रांचें म्हणजे प्रणवाचें ध्यान करणें म्हणजे अविप्रयुक्त ध्यान झालें आणि विशेषभाव सोडून देऊन केवळ सर्व विषयसंग्रहात्मक ब्रह्माचें ध्यान करणें हा मात्रांचा अनविप्रयुक्त प्रयोग होय. समजलें ? सारांश, एकाच ध्यानकालीं बाह्य, आभ्यंतर आणि मध्यम ज्या क्रिया असतात. म्हणजे जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति या अवस्थांचे अधिष्ठाते जे विश्वतैजसादि पुरुष आहेत, त्यांचें दृढ ध्यान ब्रह्मस्वरूपानें करणें हेंच त्याचें लक्षण आहे, अशा योगक्रियांमध्यें योग्य रीतीनें जर या तिन्ही मात्रांचा यथायोग्य प्रयोग केला, तर ज्ञानी पुरुष अथवा ॐकाराचे सर्व भागप्रभाग जाणणारा योगी भयकंप पावत नाहीं.

शिष्य—कां बरें ?

सिद्धान्ती—कारण असें ज्ञान ज्याला असतें म्हणजे जाग्रतींतील विश्वपुरुष स्वप्नावस्थेतील तैजस पुरुष आणि सुषुप्तिस्थितींतील प्राज्ञ पुरुष यांचें व यांच्या विशिष्ट, पण परस्परसंबद्ध स्थानांचें ज्ञान असून सर्वही पुरुष मात्रात्रय रूपानें ॐकार स्वरूपानें ज्याला दिसूं लागले, सर्वत्र प्रणवस्वरूप ज्याला दिसूं लागलें, तो खरा विद्वान् होय. तो सर्वांचा आत्मा असणारा जो प्रणव त्या प्रणवरूपाशीं

तादात्म्य पावतो. अर्थात्च प्रणवमय झालेला व सर्वत्र ॐकार पाहणारा विद्वान् भितो कशाला आणि जाईल कोठें ? त्याला भीतीचें अथवा विक्षेपाचें ( दुसरा विषय दिसण्याचें ) कारण किंवा संभव उरत नाहीं. ॥ ६ ॥

सर्वार्थसंग्रहार्थो द्वितीयो मंत्रः—

सिद्धान्ती—सर्व अर्थाचा संग्रह करण्यासाठीं या दुसऱ्या ( ग्रेवटच्या ) मंत्राची योजना आहे.

## मंत्र सातवा.

ऋग्भिरेतं यजुर्भिरन्तरिक्षं सामभिर्यत्तत्कवयो वेदयन्ते तमोंकारेणैवाऽऽयतनेनान्वेति विद्वान्यत्त-च्छान्तमजरममृतमभयं परं चेति ॥ ७ ॥

अन्वय व अर्थ—एतं ऋग्भिः, अंतरिक्षं यजुर्भिः, यत् सामभिः तत् कवयः वेदयन्ते ( ऋग्वेदांतील ऋचा मनुष्यलोकाला व यजुर्वेदांतील यजु अंतरिक्षाला अनुलक्षून असतात. सामवेदांतील सामें ज्या तिसऱ्या लोकाला अनुलक्षून असतात, तो लोक विद्वान् पुरुषाना मात्र विदित असतो. ) ॐकारेण एव आयतनेन तं विद्वान् अन्वेति ( ॐकाराचा आश्रय घेऊन मात्र विद्वान् पुरुष त्या तिसऱ्या लोकाला प्राप्त होतो. ) यत् तत् शांतं, अजरं, अमृतं, अभयं परं च इति ( ज्या लोकाला विद्वान् जातो, तो लोक शांत, अजरामर, भयशून्य, सर्वश्रेष्ठ आणि सर्वातीत आहे ॥ ७ ॥

ऋग्भिरेतं लोकं मनुष्योपलक्षितम् । यजुर्भिरन्तरिक्षं सोमाधिष्ठितम् । सामभिर्यत्तद्ब्रह्मलोकमिति तृतीयं कवयो मेधाविनो विद्यावन्त एव नाविद्वांसो वेदयन्ते । तं त्रिविधं लोकमोंकारेण साधनेनापरब्रह्मलक्षणमन्वेत्यनुगच्छति विद्वान् । तेनैवोंकारेण यत्तत्परं ब्रह्माक्षरं सत्यं पुरुषाख्यं शान्तं विमुक्तं जाग्रत्स्वप्नसुषुप्त्यादिविशेषसर्वप्रपञ्चविवर्जितमत एवाजरं जरावर्जितममृतं मृत्युवर्जितमत एव यस्माज्जरादिविक्रियारहितमतोऽभयम् । यस्मादेवाभयं तस्मात्परं निरतिशयम् । तदप्योंका-

रेणाऽऽयतनेन गमनसाधनेनान्वेतीत्यर्थः । इति शब्दो वाक्यपरिसमाप्त्यर्थः ॥ ७ ॥

इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यश्रीमद्गोविंदभगवत्पूज्यपाद-
शिष्यश्रीमच्छंकरभगवतः कृतौ प्रश्नोपनिषद्भाष्ये
पञ्चमः प्रश्नः ॥ ५ ॥

सिद्धान्ती—ज्या प्रणवाच्या प्रयोगानें अपरब्रह्माची प्राप्ति होते, त्याच्याच ध्यान–साहाय्यानें, त्याच प्रतीकद्वारा व त्याच पद्धतीनें परब्रह्मलोक प्राप्त होतो. ॐकार प्रतीक घेऊन दृढ ध्यान केलें असतां क्रमाक्रमानें *निर्विशेष ब्रह्माचा साक्षात्कार होतो, हें दाखविण्यासाठीं या मंत्राची* योजना आहे. असो; आपण राहतों हा मनुष्यलोक ऋग्वेददर्शक अकारमात्रेनें साध्य होतो. सोम'( चंद्र ) ज्याचा अधिष्ठाता आहे, तो यजुर्वेद–दर्शक लोक उकारमात्रेच्या ध्यानानें साध्य होतो. तिसरा जो ब्रह्म लोक राहिला त्याची प्राप्ति सामवेददर्शक मकार मात्रेनें होते. पण हे लोक ( भुवनें ) जे बुद्धिमान् *व कुशल पंडित आहेत त्यांस मात्र विदित असतात.* प्राकृत लोकांस हे लोक ठाऊक असणें शक्य नाहीं. हा त्रिविध लोक ॐकाररूपी प्रतीकाच्या साहाय्यानें विद्वान् पुरुषाला प्राप्त होतो. हा लोक म्हणजेच अपरब्रह्म लोक होय. येथें सगुण ब्रह्माची वसति असते. जो ( प्रणव ) अपरब्रह्माच्या प्राप्तीचें साधन होतो, तोच प्रणव परब्रह्मप्राप्तीचेंहि साधन होतो. हें ब्रह्म अक्षर (अविनाशी) आहे, सत्य आहे, पुरुष हें त्याचें नांव आहे. *तेथें शांति असते व मुक्ति वास्तव्य करिते.*

शिष्य—कारण, जागृति, स्वप्न, सुषुप्ति इत्यादिकांनीं विशिष्ट जो सर्व विश्वप्रपंच त्याचें येथें वास्तव्यच नसते, म्हणून तेथें जरा अथवा मृत्यु यांचे बिऱ्हाड येऊं शकत नाहीं. होय ना ?

सिद्धान्ती—होय. जरा–मरणादि विकार नसल्यामुळें त्या लोकांत भीतीचें कारण असत नाहीं. जेथें भीतीचें कारण नाहीं, तेथील स्थिति सर्वश्रेष्ठ असते, निरतिशय श्रेष्ठ असते, हें सांगावयास नको. ही शांत, अजरामर, अभय आणि सर्वश्रेष्ठ स्थिति ( मुक्ति ) मुद्दां ॐकाराचा मात्र आश्रय घेतला असतां, ॐकाररूपी वाहन घेऊन गेलें तर मात्र साध्य होते.

शिष्य—मंत्रांत शेवटीं इति शब्द आहे त्याचा अर्थ काय ?

सिद्धान्ती—इति या पदानें वाक्य परिसमाप्ति झाली व 'दोन मंत्रांचें अवतरण करितों' असें जें पाचव्या मंत्रांत सांगितलें आहे तें हें अवतरण संपलें हें इति शब्दानें सिद्ध होतें. ॥ ७ ॥

पांचवा प्रश्न समाप्त.

## पांचव्या प्रश्नोत्तराचा सारांश.

या प्रश्नांत ॐकाराच्या एकनिष्ठ ध्यानाचें फळ सांगितलें आहे. अभिध्यान हें अशें ध्यान असतें कीं, येथें सर्व बाह्येंद्रियें व त्यांचे विषय निवृत्त होतात व चित्त स्थिर होतें. दृढभक्तीनें ब्रह्मभावाचा प्रवेश ॐकारद्वारा होतो. सारांश निर्वातस्थळीं दीप ठेविला असतां जसा तो निश्चल राहतो, त्या प्रमाणें निश्चळ राहावयाचें; अंतःकरणांत एक आत्मप्रत्ययाची अखंड संतति जागृत ठेवावयाची आणि येथें भिन्न जातीच्या ज्ञानाला सर्वथा अर्धचंद्र द्यावयाचा; तें खरें एकनिष्ठ ध्यान होय. अशो, अशा एकनिष्ठ ब्रह्मभावानें ॐकाराचें ध्यान करणाऱ्यास फलप्राप्ति काय होते, हें या प्रश्नांत विचारलें आहे. याला उत्तर असें आहे कीं, ब्रह्म पर आणि अपर आहे. आपण ज्या ब्रह्माचें एकनिष्ठ ध्यान ॐकारद्वारा करावें तो विषय परब्रह्म किंवा अपरब्रह्म असेल तदनुसार श्रेष्ठ ब्रह्माची किंवा अपरब्रह्माची (हिरण्यगर्भाची) प्राप्ति होते. सारांश ज्याचें ॐकारस्वरूपानें ध्यान करावें, ती वस्तु आपल्यास प्राप्त होते. ॐकाराच्या पहिल्या मात्रेचें म्हणजे 'अ' या मात्रेचें जर ध्यान केलें तर एक विशेष प्रकारचें ज्ञान प्राप्त होऊन तो पुरुष पृथ्वीवर अवतीर्ण होण्याचा अधिकार प्राप्त करून घेतो व हाच पुढें तप, ब्रह्मचर्य, आणि श्रद्धा यांच्या साहाय्यानें श्रेष्ठ पदवीला जातो. पहिल्या मात्रेसहित दुसऱ्या मात्रेचें म्हणजे उकाराचें ध्यान केलें तर ध्यात्याला सोमलोक प्राप्त होतो. पण जर याच पुरुषानें त्रिमात्रांच्या साहाय्यानें ध्यान केलें तर त्या जीवाला तेजःपूर्ण सूर्याची प्राप्ति होते. ॐकार हा आपल्या अंतःकरणांत गूढ राहणाऱ्या जीवात्म्याच्या पलीकडे असणारा जो परमात्मा त्याचें दर्शन करण्यास साधनीभूत होतो. याप्रमाणें ॐकाराचें ध्यान सदैव फलप्रद होत असतें आणि ज्याप्रमाणें आपला ध्यानविषय असेल तसें फल आपल्यास प्राप्त होतें. ॐकाराचा प्रश्न आणखी एकदां यावयाचा आहे, त्यावेळीं त्याची विशेष चर्चा करण्याचा पुनः एकवार प्रसंग यावयाचाच आहे.

---

### प्रश्न सहावा.

### मंत्र पहिला.

**अथ हैनं सुकेशा भारद्वाजः पप्रच्छ ।**

अन्वय व अर्थ—अथ ह एनं सुकेशा भारद्वाजः पप्रच्छ (नंतर सुकेशा नामक भारद्वाजानें—भरद्वाजपुत्रानें—पिप्पलादास प्रश्न विचारिला.)

अथ हैनं सुकेशा भारद्वाजः पप्रच्छ, समस्तं जगत्कार्यकारणलक्षणं सह विज्ञानात्मना परस्मिन्नक्षरे सुषुप्तिकाले संप्रतिष्ठि-

[प्र]त इत्युक्तम्। सामर्थ्यात् प्रलयेऽपि तस्मिन्नेवाक्षरे संप्रतिष्ठन्ते जगन्त्युत्पद्यन्त इति सिद्धं भवति। न ह्यकारणे कार्यस्य संप्रतिष्ठानमुपपद्यते। उक्तं च—"आत्मन एष प्राणो जायते" इति। जगतश्च यन्मूलं तत्परिज्ञानात्परं श्रेय इति सर्वोपनिषदां निश्चितोऽर्थः। अनन्तरं चोक्तं स सर्वज्ञः सर्वो भवतीति। वक्तव्यं च क तर्हि तदक्षरं सत्यं पुरुषाख्यं विज्ञेयमिति। तदर्थोऽयं प्रश्न आरभ्यते। वृत्तान्ताख्यानं च विज्ञानस्य दुर्लभत्वख्यापनेन तल्लब्ध्यर्थं मुमुक्षूणां यत्नविशेषोपादानार्थम्।

सिद्धान्ती—नंतर पिप्पलाद मुनीला सुकेशा नामक भरद्वाजपुत्राने प्रश्न विचारण्यापूर्वी प्रस्तावना केली, ती अशीः—भगवन्! हें सर्व कार्य-कारण-लक्षणात्मक विश्व विज्ञानात्म्यासह सुषुप्तिसमयीं (गाढ निद्रेच्या वेळी) त्या अत्यंत श्रेष्ठ अक्षरस्वरूपांत (ब्रह्मस्वरूपांत) लीन होतें; असें आपण सांगितलें. या आपल्या सांगण्यावरून असें सिद्ध होतें कीं, प्रलयकालींही त्याच ब्रह्मस्वरूपांत विश्वाचा लय झाला पाहिजे. आणि अर्थातच विश्वाची उत्पत्तिही तेथूनच झाली पाहिजे.

शिष्य—सुकेश्याने पहिला सिद्धांत काढिला तो ठीक आहे. सुषुप्तिकालीं जेथें विश्वाचा लय होतो, तेथेंच प्रलयकालींही झाला पाहिजे; पण विश्वाची उत्पत्ति ब्रह्मापासूनच होते, असा सिद्धांत करण्याला आपल्या जवळ काय पुरावा आहे?

सिद्धान्ती—बाबा, कार्याचा लय होतो, तो कारणाचे ठिकाणींच होतो. प्रत्येक कार्य (उत्पन्न झालेली वस्तु) आपल्या कारणाचे ठिकाणीं जाऊन लीन होते, म्हणजे नष्ट होते. जेथून उत्पत्ति होते, तेथेंच लय होतो, अथवा जेथें लय होतो तेथूनच वस्तूची उत्पत्ति होते. मेघापासून नदीची उत्पत्ति होऊन ती पर्वतापासून निघून समुद्रापर्यंत वाहत जाते आणि बाष्परूपानें अंतरिक्षांत जाऊन मेघरूप होते, हें तूं पहातोसच. तेव्हां अर्थातच सुकेश्यानें जो दुसरा सिद्धांत काढिला तो सोपपत्तिक आहे. वस्तूचें जें लयस्थान तेंच त्या वस्तूचें उत्पत्ति-कारण असतें. आपलें कारण सोडून कोणतीही वस्तु दुसरीकडे आश्रय घेण्यास जावयाची नाहीं. हा युक्तिवाद झाला. श्रुतिही असें म्हणते कीं, 'हा प्राण आत्म्यापासून उत्पन्न होतो' याप्रमाणें श्रुति व युक्ति एकाच सिद्धांताचें प्रत्यन्तर करितात. असो; सुकेशा म्हणाला—भगवन्, 'विश्वाचें जे मूळ आहे, विश्व ज्याच्यापासून उत्पन्न होतें त्याचें पूर्ण ज्ञान-विज्ञान झालें असतां अतिश्रेष्ठ पुरुषार्थ साध्य होतो.' असा सिद्धांत सर्व उपनिषदें एककंठानें सांगत असतात. 'आत्मा एकच एक आहे, हें सर्व आत्मा आहे. त्याला असें समजलें कीं या सर्व दृश्य विश्वामध्यें हा पुरुष किंवा हें ब्रह्म ओतप्रोत भरलेलें आहे. प्रज्ञान हें ब्रह्म आहे, या प्रकारचें ज्ञान आपल्या संस्कृत बुद्धीनें करून घेऊन

तो ब्रह्म झाला. ज्या पुरुषाला सद्‌गुरूचा लाभ झाला, तो ब्रह्मज्ञ होतो, ब्रह्मज्ञान करून घ्या, ब्रह्मज्ञान हें मुक्तीचा हेतु आहे. मी ब्रह्म आहें, असें ज्ञान करून घ्या.' इत्यादि श्रुति सामरस्यानें हेंच सांगतात कीं, विश्वाची उत्पत्ति करणाऱ्या ब्रह्माचें ज्ञान झालें असतां जीवाचें अत्यंत कल्याण होतें.

पर्वपक्षी—तुम्ही तर नेहमीं असें म्हणत असतां कीं, अद्वितीय जो आत्मा त्याच्या ज्ञानानें मुक्ति मिळते. मग कारण–ज्ञानाची काय आवश्यकता आहे ?

सिद्धान्ती—आत्मा सर्व कारण आहे. त्याच्याशिवाय कोणतेंही कार्य उत्पन्न होणें शक्यच नाहीं. असो; असें सार्थ आणि स्वानुभूत ज्ञान–विज्ञान होईल तरच आत्म्याच्या अद्वैताची सिद्धि होते म्हणून कारणज्ञानाचीही आवश्यकता आहे. असो, सुकेशा पुढें म्हणाला,–'जो सर्वज्ञ म्हणजे ब्रह्मज्ञ होतो; तो सर्व म्हणजे ब्रह्म होतो.' असेंही आपण सांगितलें आहे. भगवन्, कृपा करा आणि तें अक्षर, सत्यस्वरूप, पुरुषोत्तम नांवाचें तत्त्व कसें समजून घ्यावें, तें तत्त्व कोठें आहे, तें मला सांगा. मला विचारावयाचें आहे तें हेंच होय.

शिष्य—मग आचार्यांनीं काय उत्तर दिलें ?

सिद्धान्ती—आचार्यांनीं उत्तर देण्याच्या आधीं सुकेशानें पूर्वींची कांहीं हकीकत सांगितली.

पूर्वपक्षी—ही कथाला अप्रस्तुत पूर्व–कथेची भानगड मध्येंच आणिली आहे ?

सिद्धान्ती—या वृत्तांतावरून आपल्यास एक उत्तम बोध घेतां येतो. सुकेशानें सांगितलेला वृत्तांत ऐकिला म्हणजे आत्मज्ञान किती दुर्लभ आहे याची थोडीशी कल्पना येते आणि तिची प्राप्ति होण्यासाठीं मुमुक्षूनीं दीर्घ प्रयत्न केला पाहिजे, असेंही आपल्यास समजतें.

भगवन्हिरण्यनाभः कौसल्यो राजपुत्रो मामुपेत्यैतं प्रश्नमपृच्छत। षोडशकलं भारद्वाज पुरुषं वेत्थ तमहं कुमारमब्रुवं नाहमिमं वेद यद्यहमिममवेदिषं कथं ते नावक्ष्यमिति समूलो वा एष परिशुष्यति योऽनृतमभिवदति तस्मान्नार्हाम्यनृतं वक्तुं स तूष्णीं रथमारुह्य प्रवव्राज। तं त्वा पृच्छामि क्वासौ पुरुष इति ॥ १ ॥

अन्वय व अर्थ—भगवन्, कौसल्यः राजपुत्रः हिरण्यनाभः माम् उपेत्य एतं प्रश्नं अपृच्छत ( कोसल देशाचा हिरण्यनाभ नामक राजपुत्र

माझ्याकडे आला आणि मला विचारता झाला. ) भारद्वाज, षोडशकलं पुरुषं वेत्थ ? ( भरद्वाजपुत्रा, सोळा कलांचा--अवयवांचा--पुरुष तुला ठाऊक आहे काय ? ) तं कुमारं अहं अब्रुवम् न अहं इमं वेद ( त्या कुमाराला मी सांगितलें की मला हा पुरुष ठाऊक नाहीं. ) यदि इमं अहं अवेदिषं कथं ते न अवक्ष्यं इति ( जर मला तुझ्या प्रश्नाचें उत्तर ठाऊक असतें तर तें मी तुला सांगितलें नसतें, असें कसें होईल. ) यः अनृतं अभिवदति समूलः वै एषः परिशुष्यति ( जो बुद्धिपूर्वक अनृत भाषण करितो तो मूळासह नाश पावतो. ) तस्मात् अनृतं वक्तुं न अर्हामि ( म्हणून असत्य भाषण करण्याला मी योग्य नाहीं. असत्य भाषण करणें, हें माझें शील नव्हे ) सः तूष्णीं रथं आरुह्य प्रवव्राज (तो लज्जित होऊन मुकाट्यानें रथावर बसला आणि चालता झाला.) तं त्वा पृच्छामि क्व असौ पुरुषः इति (म्हणून तो पुरुष कोठें आहे असें मी आपल्यास विचारितों) १

हे भगवन्हिरण्यनाभो नामतः कोसलायां भवः कौसल्यो राजपुत्रो जातितः क्षत्रियो मामुपेत्योपगम्यैतमुच्यमानं प्रश्नमपृच्छत । षोडशकलं षोडशसंख्याकाः कला अवयवा इवाऽऽत्मन्यविद्याध्यारोपितरूपा यस्मिन्पुरुषे सोऽयं षोडशकलस्तं षोडशकलं हे भारद्वाज पुरुषं वेत्थ विजानासि । तमहं राजपुत्रं कुमारं पृष्टवन्तमब्रुवमुक्तवानस्मि नाहमिमं वेद यं त्वं पृच्छसीति । एवमुक्तवत्यपि मय्यज्ञानमसंभावयन्तं तमज्ञाने कारणमवादिषम् । यदि कथं चिदहमिमं त्वया पृष्टं पुरुषमवेदिषं विदितवानस्मि कथमत्यन्तशिष्यगुणवतेऽर्थिने ते तुभ्यं नावक्ष्यं नोक्तवानस्मि न ब्रूयामित्यर्थः । भूयोऽप्यप्रत्ययमिवाऽऽलक्ष्य प्रत्याययितुमब्रुवम् । समूलः सह मूलेन वा एषोऽन्यथा सन्तमात्मानमन्यथा कुर्वन्ननृतमयथाभूतार्थमभिवदति यः स परिशुष्यति शोषमुपैतीहलोकपरलोकाभ्यां विच्छिद्यते विनश्यति । यत एवं जाने तस्मान्नार्हाम्यहमनृतं वक्तुं मूढवत् । स राजपुत्र एवं प्रत्यायितस्तूष्णीं व्रीडितो रथमारुह्य प्रवव्राज प्रगतवान्यथागतमेव । अतो न्यायत उपसन्नाय योग्याय जानता विद्या वक्तव्यैवानृतं च न वक्तव्यं सर्वास्वप्यवस्थास्वित्येतत्सिद्धं भवति । तं पुरुषं त्वा त्वां पृच्छामि मम हृदि विज्ञेयत्वेन शल्यमिव मे हृदि स्थितं क्वासौ वर्तते विज्ञेयः पुरुष इति ॥ १ ॥

सिद्धान्ती—सुकेशा म्हणाला,—भगवन्, हिरण्यनाभ नामक कोशल देशचा क्षत्रियवर्णी राजपुत्र माझ्याकडे आला आणि पुढील प्रश्न विचारता झाला. सोळा आहे संख्या ज्यांची अशा कला ज्या पुरुषामध्यें वास्तव्य करितात तो षोडशकलात्मक पुरुष हे भरद्वाजपुत्रा, तुला ठाऊक आहे त्याचें स्वरूप मला सांग.

शिष्य—म्हणजे खरोखरच या प्रश्नविषयक पुरुषाला सोळा कला असतात की काय ?

सिद्धान्ती—नाहीं. आत्म्यावर अज्ञानानें जसा सामान्य लोक अवयवांचा आरोप करितात, त्याप्रमाणेंच पुरुषोत्तमावर कलांचा आरोप आहे. असो; वर्तमान सांगतांना सुकेशा पुढें म्हणाला, भगवन्, त्या आदरानें प्रश्न विचारणाऱ्या कुमारास मी सांगितलें कीं, आपण मला ज्या पुरुषाविषयीं विचारतां तो पुरुष मला ठाऊक नाहीं. हें माझें बोलणें त्याला खरें वाटलें नाहीं. कारण, माझ्या ठिकाणीं या विषयाचें अज्ञान असेल अशी त्याला कल्पनाच नव्हती. माझें बोलणें पटत नाहीं असें मला समजल्यावर मी त्याजवळ आपल्या अज्ञानाचें स्पष्टीकरण केलें. मी म्हणालों, 'जर मला आपण विचारलेल्या प्रश्नाचें उत्तर देतां आलें असतें व पुरुषोत्तमाचें स्वरूप मला ठाऊक असतें तर शिष्याचे सर्व गुण असणाऱ्या या आपल्यासारख्या व आपल्या योग्यतेच्या प्रश्नकर्त्यास मी उत्तर दिलें नसतें काय ? किंवा त्या पुरुषोत्तमाचें स्वरूप सांगितलें नसतें काय ?' भगवन्, मीं असें बोललों तरी त्याच्या मनाचें समाधान झालें नाहीं; असें ओळखून त्याची खात्री व्हावी एतदर्थ मीं पुनः म्हटलें 'हे राजकुमारा, वस्तुस्थिति असेल तशी न सांगतां तिचें दुसऱ्या रीतीनें वर्णन करितो, आपण एक असतां दुसरा आहे असें भासवितो, सारांश, जो अनृत अथवा अयथार्थ भाषण करितो तो समूळ आपल्या स्वतःचा नाश करून घेतो. इह लोक नाहीं, परलोक नाहीं, अशी त्याची स्थिति होते. असें मला ठाऊक आहे. म्हणून तरी मीं असत्य भाषण करणार नाहीं. असत्य भाषण करणाऱ्या मूर्खाचें शील तें माझें शील नव्हे आहे; असें जाण. राजपुत्रा, खरोखरच मला पुरुषोत्तम–स्वरूपाचें ज्ञान नाहीं व असत्य भाषण करणारास काय शिक्षा होते ती मला विदित आहे.' इतक्या निकरानें मी बोललों, तेव्हां त्याचा विश्वास माझ्या शब्दावर बसला आणि लज्जित होऊन तो एक अक्षरही न बोलतां रथावर बसून चालता झाला. तात्पर्य, जसा तो आला तसाच तो परत गेला. माझ्याकडे येण्यापासून त्याला कांहीं एक उपयोग झाला नाहीं.

शिष्य—महाराज, या गुरुशिष्यसंवादावरून दोन गोष्टी सिद्ध होतात. कोणीही अधिकारी पुरुष ज्ञान मिळविण्यासाठीं आपल्याकडे विधिपूर्वक आला असतां ज्ञानी पुरुषानें त्याला विद्यादान करावें. आणि दुसरी गोष्ट ही कीं कसल्याही प्रकारची स्थिति असो, केव्हांही अनृत भाषण करूं नये. या दोन शास्त्रसिद्ध गोष्टी आहेत.

सिद्धान्ती—शाबास! चांगला बोध दृं. घेवलास. असो; सुकेशा शेवटीं म्हणाला–भगवन्, राजपुत्रानें ज्या पुरुषाविषयीं मला प्रश्न केला, तो पुरुष कोठें राहतो आणि त्याचें स्वरूप काय तें मला सांगा. जोंपर्यंत मला ह्या विशेष पुरुषाचें ज्ञान होणार नाहीं तोंपर्यंत ह्या ज्ञेय पुरुषासंबंधाचें अज्ञान माझ्या हृदयांत मला शल्याप्रमाणें टोंचीत राहील. तात्पर्य, मी हें ज्ञान समजून घेण्याविषयीं अत्यंत उत्सुक आहें. कृपा करा, मला हें ज्ञान शिकवा आणि माझी तळमळ नाहींशी करा. ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**तस्मै स होवाच। इहैवान्तः शरीरे सोम्य स पुरुषो यस्मिन्नेताः षोडश कलाः प्रभवन्तीति ॥ २ ॥**

अन्वय व अर्थ—तस्मै सः ह उवाच ( पिप्पलाद मुनींनीं सुकेशाला सांगितलें–उत्तर दिलें ) इह एव अंतःशरीरे सोम्य! सः पुरुषः; यस्मिन् एताः षोडश कलाः प्रभवन्ति इति ( हे सौम्य, येथेंच (या अंतःशरीरामध्यें) तो पुरुष राहतो. या पुरुषाच्या ठिकाणीं सोळा कलांचा उद्भव आहे. )

सारांश, सोळा कलांचा पुरुष तो हाच होय. ॥ २ ॥

तस्मै स होवाच। इहैवान्तःशरीरे हृदयपुण्डरीकाकाशमध्ये हे सोम्य स पुरुषो न देशान्तरे विज्ञेयो यस्मिन्नेता उच्यमानाः षोडश कलाः प्राणाद्याः प्रभवन्त्युत्पद्यन्त इति षोडशकलाभिरुपाधिभूताभिः सकल इव निष्कलः पुरुषो लक्ष्यतेऽविद्ययेति तदुपाधिकलाध्यारोपापनयेन विद्यया स पुरुषः केवलो दर्शयितव्य इति कलानां तत्प्रभवत्वमुच्यते। प्राणादीनामत्यंतनिर्विशेषे ह्यद्वये शुद्धे तत्त्वे न शक्योऽध्यारोपमंतरेण प्रतिपाद्यप्रतिपादनादिव्यवहारः कर्तुमिति कलानां प्रभवस्थित्यप्यया आरोप्यन्तेऽविद्याविषयाश्चैतन्याव्यतिरेकेणैव हि कला जायमानास्तिष्ठन्त्यः प्रलीयमानाश्च सर्वदा लक्ष्यन्ते। अत एव भ्रान्ताः केचिदग्निसंयोगाद्घृतमिव घटाद्याकारेण चैतन्यमेव प्रतिक्षणं जायते नश्यतीति। तन्निरोधे शून्यमिव सर्वमित्यपरे। घटादिविषयं चैतन्यं चेतयितुर्नित्यस्याऽऽत्मनोऽनित्यं जायते विनश्यतीत्यपरे। चैतन्यं भूतधर्म इति लोकायतिकाः।

सिद्धान्ती—पिप्पलादमुनि म्हणाले, येथेंच या अंतःशरीरांत—

शिष्य—अंतःशरीर म्हणजे ?

सिद्धान्ती—आपल्या हृदयकमलामध्यें. समजलें ? येथें जें आकाश आहे, त्यांतच हे सुकेशा, हा पुरुष असतो. याला शोधण्याला देशांतरीं ( स्थलांतरीं ) जाणें नलगे. याचें स्वरूप येथेंच समजून घेतलें पाहिजे. ज्या सोळा कलांचें स्वरूप पुढें सांगणार आहेत, त्या प्राणादि कला या पुरुषाचे ठिकाणीं उत्पन्न होतात.

शिष्य—म्हणजे सोळा कला हा पुरुषाचे अवयव आणि पुरुष अवयवी होय, असें कोणी म्हटलेंच तर ?—

सिद्धान्ती—जुळावयाचें नाहीं. ह्या कला म्हणजे पुरुषाच्या तिरस्या उपाधि आहेत. ध्यानांत ठेव कीं हा पुरुष स्वभावतः कलाशून्य असूनही कलावंतसा दिसतो. याचें कारण अविद्या हें होय. या व्यवहारांत भासमान होणाऱ्या कला प्रथमतः पत्करून मग परमार्थामध्यें त्यांचा निरास करावयाचा असतो. पुरुषावर कलांचा प्रथम आरोप करून पुढें त्या नाहींत असें ठरविणें, याला विद्या असें म्हणतात. अथवा विद्येचें हें कार्य आहे.अज्ञानानें उत्पन्न केलेला आरोप ज्ञानानें नाहींसा होतो. आणि याप्रमाणें हा पुरुष निष्कल आहे, परमार्थतः कलाशून्य आहे, असें विद्येनें ब्रह्मज्ञानानें समजतें. असा आशय मनांत आणून श्रुतीनें कलांचें उत्पादकत्व ह्या पुरुषाकडे दिलें आहे. अत्यंत निर्विशेष ( विशेषणशून्य, निर्गुण ) आणि अद्वय-शुद्ध-पुरुषाचे ठिकाणीं प्राणादिकांचा आरोप केल्याशिवाय ज्याचें प्रतिपादन करावयाचें तो विषय, त्या विषयाचें प्रतिपादन, इत्यादि व्यवहार करणें शक्यच नाहीं. ब्रह्मावर जेव्हां गुणांचा आरोप करावा, तें सगुण आहे असें समजावें, तेव्हां ब्रह्मप्रतिपादन करणें हा विषय आणि त्याची सिद्धि हें संभवतें. असा व्यवहार केला नाहीं तर ब्रह्मप्रतिपादन, इत्यादि व्यवहार सिद्ध होतो. असा व्यवहार केला नाहीं तर ब्रह्म-प्रतिपादन, इत्यादि व्यवहार सिद्ध होतो. असा व्यवहार केला नाहीं तर ब्रह्म- प्रतिपादन, इत्यादि व्यवहार सिद्ध होतो.

सिद्धिही व्हावयाची नाहीं. म्हणून पूर्वोक्त सोळा कलांची उत्पत्ति, त्याची स्थिति आणि त्यांचा नाश इत्यादि गुणांचा पुरुषोत्तमावर आरोप करितात. या कला,यांची उत्पत्ति, स्थिति, लय व यांची पुरुषोत्तमाच्या ठिकाणीं स्थापना हे सर्व अविद्येचे विषय आहेत. अनुभवही पाहिला तर तुम्हांला असें आढळून येईल कीं चैतन्याचा व्यतिरेक न करितां ( चैतन्याची संगति न सोडतां, चैतन्याच्या आश्रयानें ) या कलांची उत्पत्ति होते. या कला कांहीं काळपर्यंत स्थित असतात आणि शेवटीं यांचा लय होतो. यामुळें अनेक पंडितांना अशी भ्रांति होते कीं, तुपाशीं ( तुपाशीं ) अग्नीचा संयोग झाला असतां जसें तें पातळ होऊन विरून जातें, त्याप्रमाणें घट-पटादि आकारांनीं दृश्यमान होणारें चैतन्य प्रतिक्षणीं उत्पन्न होतें व नाहीसें होतें.

शिष्य—हें आपलें प्रतिपादन मला समजलें नाहीं.

सिद्धान्ती—बुद्ध लोकांचें असें मत आहे कीं, अहमाकार ( मी आहें हें विज्ञान, आत्मविज्ञान ) हें वासनेला वश होऊन विषयाकार होतें आणि मठी-

तोस येतें. वासना संपली, पदार्थ नाहींसा झाला, म्हणजे विज्ञानही नाहींसें होतें. याप्रमाणें प्रतिक्षणीं विज्ञान उत्पन्न होतें व नाहींसं होतें. ही विज्ञानवादी लोकांची भ्रामक समजूत आहे; तथापि या भ्रांतीवरून सुद्धां ज्ञानाचा विषय आणि चैतन्य अव्यतिरिक्त असतात म्हणजे उभयतांही एकत्र असतात, हा अनुभव सिद्ध होतो. अशी स्थिति नसती तर वरील प्रकारचा भ्रम होणें असंभवनीय झालें असतें. पुनः विषय आणि चैतन्य यांची प्रतीति नियमानें एककाली होते म्हणून गाढ निद्रा, दृढ मूर्च्छा इत्यादि प्रसंगीं चैतन्याचा अभाव असतो म्हणून कित्येक लोक असें म्हणतात कीं या विश्वामध्यें सर्वत्र शून्य स्थिति आहे. कारण येथें ( सुषुप्तीच्या वेळीं ) चैतन्याचा अभाव असतो. ही ही एक भ्रांतिच आहे. तथापि ही भ्रांति सुद्धां चैतन्य आणि विषय यांचा अव्यतिरेक सिद्ध करिते. तसेंच नैयायिक लोक असें म्हणतात कीं, नित्य आणि चेतनावान् जो आत्मा त्याच्या ठिकाणीं घटादिविषयक अनित्य ज्ञान उत्पन्न होतें व नाहींसें होतें. नैयायिक पक्षाचें म्हणणें असें आहे कीं वर सांगितलेल्या सोळा कलांचा आरोप चैतन्याच्या ठिकाणीं संभवत नाहीं. कारण चैतन्य हें अनित्य आहे. हे अनित्य चैतन्य प्राणादि कलांचें कार्य आहे. प्राणादि कला चैतन्यास उत्पन्न करितात. हीही एक भ्रांतिच आहे; तथापि ह्या भ्रांतींतही चैतन्य आणि विषय यांचें नित्य साहचर्य आहे. चार्वाकादि लोकायतिक महानास्तिक आहेत. ते म्हणतात कीं, चैतन्य हा देहादिकांचा एक धर्म आहे. तुला सांगावयास नकोच कीं हें शेवटचें मतही भ्रामक आहे. तथापि येथें सुद्धां चैतन्य आणि विषय यांचे जुग फुटलेलें नाहीं. सारांश, व्यवहार काय, बौद्ध, नैयायिक, किंवा लोकायतिक पंडितांचीं मतें काय, सर्वत्र चैतन्य आणि विषय यांची अभंग सहचारिता सर्व पक्षांस मान्य आहे.

अनपायोपजनधर्मकचैतन्यमात्मैव नामरूपाद्युपाधिधर्मैः प्रत्यवभासते । सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म । प्रज्ञानं ब्रह्म, विज्ञानमानन्दं ब्रह्म, विज्ञानघन एवेत्यादिश्रुतिभ्यः । स्वरूपाव्यभिचारिषु पदार्थेषु चैतन्यस्याव्यभिचारात्तथा यथा यो यः पदार्थो विज्ञायते तथा तथा ज्ञायमानत्वादेव तस्य तस्य चैतन्यस्याव्यभिचारित्वं वस्तुतत्त्वं भवति, किंचिन्न ज्ञायत इति चानुपपन्नम् ।

सिद्धान्ती—शिष्यराया, आपल्या मनाचा एक निश्चय करून ठेव कीं चैतन्य म्हणजे आत्मस्वरूप आहे. आत्मा जसा कधीं जन्मत नाहीं किंवा मरत नाहीं, त्या प्रमाणें चैतन्य हेंही कधीं उत्पन्न होत नाहीं किंवा नाहींसें होत नाहीं. तें नानारूपांनीं भासतें याचें कारण त्याच्यावर आरोपित होणारे नामरूपादि उपाधींचे धर्म होत. नामरूपांमुळें चैतन्य अनेकरूपांनीं प्रकट होतें. स्वरूपतः तें एक आणि नित्य आहे. अर्थात् चैतन्याला अनेकत्वानें व अनि-

स्वत्वानें पाहणारे बौद्ध, नैयायिक व लोकायतिक हे भ्रांत मताचे प्रतिपादक म्हणून त्याज्य होत. ' ब्रह्म हें सत्य, ज्ञान, आणि अनंत आहे ' ' प्रज्ञान हें ब्रह्म आहे ' ' विज्ञान आणि आनंद ब्रह्मच होत.' ' आत्मा विज्ञानघन आहे. ( त्याच्या ठिकाणीं एकरस ज्ञान नित्यत्वानें संचित झालेलें आहे )' इत्यादि श्रुतिही असें सांगतात कीं, वरील तिन्ही पक्ष अवैदिक आहेत, म्हणून त्याज्य आहेत पुनः असें पहा कीं, आपलें स्वरूप बदलणारे पदार्थांमध्यें, स्वरूपांतर करणाऱ्या पदार्थांमध्यें, चैतन्य एकच स्वरूपानें असतें. केव्हांही तें स्वरूपांतर करीत नाहीं. ज्ञानकालीं विषय आपलें स्वरूप सोडितात; घट असतो व नाहींसा होतो. पण ज्ञान स्वस्वरूपाचा केव्हांही त्याग करीत नाहीं. तसेंच विषयकालींही ज्ञानाचें स्वरूप बदलत नाहीं. याप्रमाणें विषय आणि ज्ञान यांत अत्यंत भेद आहे.

शिष्य—आपलें म्हणणें असें आहे कीं, ज्ञानदृष्टीनें आपण घटपटादि पदार्थ पाहूं लागलों तर ज्ञानाचे विषय निरनिराळे होतात; पण ज्ञानरूप एकच असतें. तसेंच विषयांकडे आपण दृष्टि लाविली तरी ज्ञानाचें स्वरूप बदलत नाहीं, तें एकरूप असतें. सारांश, ज्ञानाचें अस्तित्व केव्हांही नाहींसें होत नाहीं. ज्ञान असून विषय नसणें शक्य आहे. निदान अनेक विषय असणें अशक्य नाहीं. पण विषय असून ज्ञान नाहीं अशी स्थिति केव्हांही येत नाहीं. असेंचना आर-स्याच म्हणावयाचें ?

सिद्धान्ती—होय. विषय आणि ज्ञान यांच्या स्वरूपांत जो मोठा भेद आहे त्यावरून आम्ही असें सिद्ध करितों कीं, ' ज्ञान हें नेहमीं विषयाकार मात्र असतें ' असें म्हणणारे विज्ञानवादी अपसिद्धांताचें प्रणयन करितात. याच न्यायानें आम्ही असें म्हणतों कीं, ज्या वेळीं पटाचें ज्ञान होतें, त्यावेळीं आपल्यासमोर घट नसेलही. म्हणजे विषय हे ज्ञानापासून व्यभिचरित होतात; पण आपण जेव्हां घटादि विषय पाहातों, त्यावेळीं विषयाला सोडून ज्ञान केव्हांही असत नाहीं.

पूर्वपक्षी—असें कसें म्हणतां ? आपल्या समोर घट असतो त्यावेळीं आर-स्याच घटज्ञान कोठें असतें ? यावरून घट हा विषय प्रत्यक्ष असूनही त्यावेळीं घटज्ञानाचा अभाव असतो. म्हणजे विषय आहे पण ज्ञान नाहीं असें होतें. आणि तुम्ही तर म्हणतां कीं, विषय असेल तेथें ज्ञान असलेंच पाहिजे.

सिद्धान्ती—आचार्यांनीं तुमचा अभिप्राय अर्थात आपून' इत्यादि या शब्दाची योजना बुद्धिपूर्वक केली आहे, ती याचसाठीच होय. घट प्रत्यक्ष असतां घट-ज्ञान नसेल; पण पटज्ञान असतें. विशेष ज्ञान नाहींसें झालें म्हणून सामान्य ज्ञान नाहींसें झालें असें होत नाहीं. विषय प्रत्यक्ष असतां व विषयज्ञानाची साधनें निर्दोष असून इन्द्रियसंबंध असतां तेथें ज्ञानच नाहीं अशी स्थिति केव्हांही असणें शक्य नाहीं. उत्तरपक्षी ज्ञान अनेक; पण त्यांचा बोध

ताही विषय तेथें प्रत्यक्ष नसेल. ह्या विषय आणि ज्ञान ह्यांत विशेष भेद आहे म्हणून ज्ञान उत्पन्न होतें आणि नाहींसें होतें असें म्हणणारे तार्किक व नैयायिक मिथ्यावादी आहेत. सारांश, जेव्हां जेव्हां आपल्यास पदार्थांचें ज्ञान होतें, तेव्हां तेव्हां तो पदार्थ जाणला गेला असतो, म्हणून त्या त्या पदार्थाची व चैतन्याची मिठी केव्हांही सुटत नाहीं. चैतन्य अव्यभिचारी आहे म्हणजे त्याचें स्वरूप नित्य आहे. जेथें ज्ञेय वस्तु आहे तेथें ज्ञान असलेंच पाहिजे, पण जेथें ज्ञान आहे तेथें ज्ञेय वस्तु असलीच पाहिजे असा मात्र नियम नाहीं.

पूर्वपक्षी—अहो, जे पदार्थ उत्पन्न होऊन नष्ट झाले किंवा अद्यापि उत्पन्न व्हावयाचे आहेत तसेंच पृथ्वीच्या पोटांत व मेरूच्या उदरांत असलेले पदार्थ तुम्हांस ठाऊक नाहींत म्हणून ज्ञेय पदार्थ विद्यमान असून त्यांचें ज्ञान नाहीं, हें सिद्ध आहे.

सिद्धान्ती—या पदार्थांचें विशिष्ट अज्ञान आहे. कारण, तुम्ही म्हणतां तशल्या पदार्थांची अद्यापि सिद्धि झालेली नाहीं. अथवा त्यांचें विशिष्ट ज्ञान उत्पन्न झालेलें नाहीं. या वरून सामान्य ज्ञानाचा अभाव सिद्ध होत नाहीं विशेष ज्ञानाचा अभाव मात्र सिद्ध होतो. सारांश, कांहीं ज्ञान नाहीं, अशी स्थिति असणें शक्य नाहीं. पदार्थ पुढें आला कीं त्याचें विशेष ज्ञान होतें, हें खरें, पण या विशेष ज्ञानाच्या मुळाशीं सामान्य ज्ञान असतें व तें नित्य असतें. हें केव्हांही विसरू नये.

रूपं च दृश्यते न चास्ति चक्षुरिति यथा । व्यभिचरति तु ज्ञेयं ज्ञानं न व्यभिचरति कदाचिदपि ज्ञेयम् । ज्ञेयाभावेऽपि ज्ञेयान्तरे भावाज्ज्ञानस्य । न हि ज्ञानेऽसति ज्ञेयं नाम भवति कस्य चित् । सुषुप्तेऽदर्शनाज्ज्ञानस्यापि सुषुप्तेऽभावाज्ज्ञेयवज्ज्ञानस्वरूपस्य व्यभिचार इति चेत्र । ज्ञेयावभासकस्य ज्ञानस्याऽऽलोकवज्ज्ञेयाभिव्यञ्जकत्वात्स्वव्यङ्ग्याभावे आलोकाभावानुपपत्तिवत्सुषुप्ते विज्ञानाभावानुपपत्तेः ।

सिद्धान्ती—रूप तर दिसतें आहे, पण मला बघण्याला नेत्र नाहींत, हें म्हणणें जसें अप्रयोजक, तसेंच पदार्थ असूनही त्यांचें सामान्य ज्ञान मला होत नाहीं हें म्हणणें अप्रयोजक आहे. तात्पर्य, ज्ञान असेल तेव्हां ज्ञेय असतेंच असा नियम नाहीं. ज्ञेय व्यभिचरित होतें, पण ज्ञान मात्र केव्हांही ज्ञेयापासून विभक्त राहात नाहीं. ज्ञेय आहे तेथें ज्ञान असलेंच पाहिजे. ज्ञान केव्हांही व्यभिचरित होत नाहीं. मागें तुला सांगितलेंच कीं, घट-ज्ञान आपल्यास होतें तेव्हां कदाचित् तेथें घट नसेलही, घट असलाही पटज्ञानाचा अभाव असतो पण ज्ञान स्वरूपानें कायम असतें. तात्पर्य, ज्ञान नित्य आणि सर्वव्यापी आहे,

घटपटादिकांचीं ज्ञानें विशिष्ट म्हणजे एकदेशीय असतील व त्यांचीं विशिष्ट स्वरूपांतरेंही होतील. पण नित्य आणि सर्वव्यापी ज्ञानाचें केव्हांही स्वरूपांतर होत नाहीं. तसेंच ज्ञानाच्या अभावीं ज्ञेय ( जाणावयाची वस्तु ) असेल असें संभवत नाहीं. कारण ज्ञानाचा अभाव असणें शक्य नाहीं.

पूर्वपक्षी—अहो महाराज, गाढ निद्रा लागली असतां आपल्यास कांहींएक दिसत नाहीं व त्या वेळीं ज्ञेय वस्तूप्रमाणेंच ज्ञानाचाही अभाव असतो. हें तुम्हांस ठाऊक आहेना ! येथें तरी निदान ज्ञानाचें अस्तित्व नसतें अथवा ज्ञान-स्वरूपाचा व्यभिचार होतो. तात्पर्य, निद्रेच्या प्रसंगीं, ज्ञानाची सत्ता नाहींशी होते व ज्ञान नित्य नाहीं हें ठरतें.

सिद्धान्ती—असें मुळींच ठरत नाहीं. पहा कीं एखादा आरसा आपण घेतला आणि त्याच्या पुढें कोणतीही वस्तु न ठेवतां आपण स्वस्थ राहिलों म्हणून ठेवलेला आरसा किंवा प्रतिबिंब दाखविण्याचें त्याचें सामर्थ्य, तें नाहींशीं होत नाहींत. त्याप्रमाणेंच वस्तूंना प्रकाशित करणारें जें ज्ञान त्याच्या समोर प्रकाशित होण्याला वस्तु नसते म्हणून गाढ निद्रेमध्यें ज्ञानाचा अभाव असतो असें, केव्हांही सिद्ध करितां यावयाचें नाहीं. प्रकाशित होणारा पदार्थ गाढ निद्रेमध्यें नसतो, म्हणून ज्ञानाचें प्रकाशकत्व प्रकट होत नाहीं; पण यावरून तेथें प्रकाशक ज्ञानच नाहीं असें कोणालाही म्हणतां यावयाचें नाहीं.

पूर्वपक्षी—आम्ही असें म्हणतों कीं, सुषुप्तिकाळीं ज्ञेयाचा अभाव आहे म्हणून ज्ञानाचा अभाव आहे. यांतही आमचे दोन पक्ष आहेत. ज्ञेय हें नेहमीं प्रकाशित होतें. तेंच नाहीं म्हणून ज्ञानाचाही अभाव असतो. हा पहिला पक्ष झाला. दुसरा पक्ष म्हणतो कीं ज्ञेय आणि ज्ञान हीं दोन्ही एकच आहेत म्हणून एकाचा अभाव असला म्हणजे दुसऱ्याचाही अभाव असतो. हे आमच्या पहिल्या म्हणण्याचे दोनपक्ष झाले. दुसरें म्हणणें असें आहे कीं, ज्ञानाचें दर्शनच होत नाहीं म्हणून ज्ञानाचा अभाव सिद्ध होतो. या सर्व पक्षांचें निराकरण तुम्हांस करतां आलें तर ज्ञानाच्या नित्यत्वाचा व सर्वव्यापित्वाचा पक्ष तुम्हांस सिद्ध करितां येईल.

न ह्यन्धकारे चक्षुषा रूपानुपलब्धौ चक्षुषोऽभावः शक्यः कल्पयितुं वैनाशिकेन । वैनाशिको ज्ञेयाभावे ज्ञानाभावं कल्पयत्येवेति चेद्येन तदभावं कल्पयेत्तस्याभावः केन कल्प्यत इति वक्तव्यं वैनाशिकेन ।

सिद्धान्ती—ठीक आहे. तुम्ही काढिलेल्या आक्षेपांचा आम्ही क्रमशः विचार करितों. तुमचें पहिलें म्हणणें असें आहे कीं प्रकाशित करण्याची वस्तु नसली म्हणजे प्रकाशकाचा अभाव असतो. पण याचें उत्तर आम्ही आरशाचें उदाहरण घेऊन पूर्वीच दिलें आहे. पण हें उत्तर तुम्हांस पटत नसेल तर

दुसरें एक उदाहरण देऊन तुमचें म्हणणें सयुक्तिक नाहीं असें आम्ही सिद्ध करितों. गर्द अंधकार पडला असतां रूपाची उपलब्धि आपल्याच होत नाहीं. पण डोळ्याला आपल्या सभोंवतालच्या वस्तु दिसत नाहींत म्हणून रूप-प्रकाशक नेत्रही नाहीं, असें म्हणतां येईल काय ? खचित येणार नाहीं. केवढाही मोठा वैनाशिक पंडित असला तरी त्याला असें म्हणतां येणार नाहीं. म्हणालाच तर त्याला वेड्याच्या वर्गात बसवावा लागेल किंवा तो शंकराप्रिय आहे असें त्याला उपपद द्यावें लागेल.

*शिष्य*—वैनाशिक [illegible] बौद्ध-मताची एक शाखा आहेना ?

पूर्वपक्षी—वैनाशिकांचें म्हणणें तुम्ही बरोबर समजलां नाहीं, किंवा समजलें असेल तर जाणूनबुजून तुम्ही त्याच्या मताचा विपर्यय करित आहांत. त्यांचें म्हणणें असें आहे कीं *ज्यावेळीं ज्ञेय वस्तुचा अभाव असतो त्यावेळीं ज्ञाना*-चाही अभाव असतो. तेव्हां तुम्ही म्हणतां तसा त्याच्या आक्षेपाचा निरास होत नाहीं. त्यांच्या म्हणण्याचें तात्पर्य असें आहे कीं, विज्ञानव्यतिरिक्त *(विज्ञानाच्या अभावीं)* आलोक-*वस्तूचा (आरशाचा) अभाव असतो. विज्ञा*-नच नाहींतर, तर आरशाचें ज्ञान नाहीं व ज्ञान नाहीं म्हणून आरसाही नाहीं असें झालें.

सिद्धान्ती—ठीक आहे. आतां एवढें सांगा कीं, जाणण्याच्या वस्तूचा व चक्षूचा, (आरशाचा) अभाव आहे असें तरी ज्ञान असतें कीं नाहीं ? ज्ञान असतें; असें म्हणाल तर ज्ञानाच्या अभावाची सिद्धि होत नाहीं. कारण ज्या ज्ञेयाच्या *( जाणण्याच्या वस्तूच्या ) अभावज्ञानानें ज्ञानाचा अभाव आहे अशी कल्पना होते, त्या कल्पना-ज्ञानाच्या अभावाची कल्पना कोण करतो बरें ? ही कल्पना* तुम्हांस केव्हांही करितां यावयाची नाहीं.

*शिष्य—मला हे आपले भाव आणि अभाव कांहीं एक समजत नाहींत.* माझ्यासमोर घट नसेल तर मला घटाभावाचें ज्ञान असतें आणि या ज्ञानानें ज्ञानाभावाची मला कल्पना करितां येते.

*सिद्धान्ती—नाहीं. तुला कल्पना करितां यावयाची नाहीं.* जर तुला घटाच्या *अभावाचें ज्ञान आहे तर त्या वेळीं कोणत्याही प्रकारचें* ज्ञान तुला नाहीं, ज्ञानाचा सर्वथा अभाव आहे, अशी कल्पना तुला कशी करतां येईल ? आणि कल्पना केलीस तरी तुला त्या कल्पनेचें ज्ञान असतेंच. सारांश, कोणत्याही वेळीं ज्ञानाच्या अभावाची कल्पना करितां येणें शक्य नाहीं.

तदभावस्यापि ज्ञेयत्वाज्ज्ञानाभावे तदनुपपत्तेः । ज्ञानस्य ज्ञेया-व्यतिरिक्तत्वाज्ज्ञेयाभावे ज्ञानाभाव इति चेन्न । अभावस्यापि ज्ञेयत्वाभ्युपगमादभावोऽपि ज्ञेयोऽभ्युपगम्यते वैनाशिकैर्नित्यश्च

तद्व्यतिरिक्तं चेज्ज्ञानं नित्यं कल्पितं स्यात्तदभावस्य च ज्ञानात्मकत्वादभावत्वं वाङ्मात्रमेव न परमार्थतोऽभावत्वमनित्यत्वं च ज्ञानस्य । न च नित्यस्य ज्ञानस्याभावनाममात्राध्यारोपे किंचिन्नश्छिन्नम् ।

सिद्धान्ती—बरें आतां जाणण्याच्या वस्तूचें ज्ञान नसतें, असें म्हणाल तर तुमचें म्हणणें वेडेपणाचें आहे असें म्हणावें लागेल. कारण ज्ञेयाभावाचें ज्ञानच नाहीं म्हणून ज्ञानाभावाची कल्पनाही असंभवनीय होते. कल्पना केलीच तर ती जाणण्याची वस्तु आहे म्हणून ती ज्ञेयाच्या कोटींत येते. ह्या कोटींत येणें म्हणजे ती वस्तु समजणें असें होतें. अर्थात् अभावाचें ज्ञान नाहीं असें म्हणणें विचाराच्या कक्षेंत येण्याइतकें सयुक्तिक नाहीं असें म्हणावें लागतें.

शिष्य—पटाच्या अभावाचें ज्ञानच जर मला नाहीं, तर मला ज्ञान आहे कीं नाहीं याचा निर्णय करणें अशक्य आहे. सारांश, अभावाचें ज्ञान नाहीं म्हणणें आणि त्यावरून ज्ञानाचा अभाव सिद्ध करणें, हें विचारास संमत होण्यासारखें नाहीं.

सिद्धान्ती—आतां तुमचा दुसरा आक्षेप असा आहे कीं; ज्ञेय आणि ज्ञान हीं दोन्हीं एकच किंवा एकत्र असतात म्हणून एकाचा अभाव असला म्हणजे दुसऱ्याचा अभाव असतो. हा ही आक्षेप योग्य नाहीं. तुमचे वैनाशिक पंडित असें कबूल करितात कीं, अभाव ही ज्ञेयवस्तु आहे, अभावाचें ज्ञान होऊं शकतें. तो अभाव नित्य आहे. म्हणजे त्यांच्या मताप्रमाणें ज्ञेय नाहीं. अशी जगांत कोणतीही वस्तु नाहीं कीं, जी ज्ञेय आहे, ज्ञेय वस्तूचा सर्वथा अभाव आहे; असें हे पंडित म्हणतात म्हणून त्यांस वैनाशिक असें म्हणतात. दिसते ही सृष्टि मुळींच नाहीं. हा सर्व आपल्या कल्पनांचा खेळ आहे, असें या वैनाशिकांचें मत आहे. सारांश, त्यांच्या मतें ज्ञेय वस्तूचा अभाव नित्य आहे. आतां ज्ञेयाबरोबरच ज्ञान असतें, ज्ञेय आणि ज्ञान एकत्र असतात, असें म्हटलें म्हणजे ज्ञानाही नित्यत्व येतें. कारण, ज्ञेय वस्तूच्या अभावाची जाणीव म्हणजे ज्ञान स्वरूपच होय. ज्ञेयाभाव नित्य आहे तर त्या अभावाचें ज्ञान नित्य असलें पाहिजे. या नित्य ज्ञानाला तुम्हीं अभाव म्हणा किंवा भाव म्हणा, आमचें त्यांत कांहीं बिघडत नाहीं. तुमच्या आक्षेपाचें पर्यवसान असें होतें कीं, ज्ञानाचा अभाव आणि ज्ञानाचें अनित्यत्व हीं नाहींशीं होऊन ज्ञान ही नित्य असणारी सद्वस्तु आहे असें सिद्ध होतें. या नित्य ज्ञानाचें तुम्ही अभाव असें नांव ठेवलें म्हणून आम्हांला त्याबद्दल यत्किंचितही विषाद वाटणार नाहीं. कारण, ज्ञान नित्य आहे असें जें आम्हीं म्हणतों तेंच तुम्हीं म्हणत आहांत. मात्र नित्य ज्ञानाला अभाव असें निराळें नाव देतां तुमच्या मर्जीची गोष्ट आहे. या म्हणण्यानें किंवा नामकरणानें आमच्या सिद्धांताला यत्किंचितही बाध येत नाहीं.

अथाभावो ज्ञेयोऽपि सञ्ज्ञानव्यतिरिक्त इति चेन्न तर्हि ज्ञेयाभावे ज्ञानाभावः। ज्ञेयं ज्ञानव्यतिरिक्तं, न तु ज्ञानं ज्ञेयव्यतिरिक्तमिति चेन्न। शब्दमात्रत्वाद्विशेषानुपपत्तेः। ज्ञेयज्ञानयोरेकत्वं चेदभ्युपगम्यते ज्ञेयं ज्ञानव्यतिरिक्तं ज्ञानं ज्ञेयव्यतिरिक्तं नेति तु शब्दमात्रमेतद्वह्निरग्निव्यतिरिक्तोऽग्निर्न वह्निव्यतिरिक्त इति यद्वदभ्युपगम्यते, ज्ञेयव्यतिरेके तु ज्ञानस्य ज्ञेयाभावे ज्ञानाभावानुपपत्तिः सिद्धा।

पूर्वपक्षी—आमचा भाव तुम्हांस बरोबर कळला नाहीं. आमचें म्हणणें असें आहे कीं, जाणण्याच्या वस्तूचा अभाव ही जरी ज्ञेय वस्तु आहे, तरी ती ज्ञानाहून निराळी वस्तु आहे.

सिद्धान्ती—तर मग जाणण्याच्या वस्तूचा अभाव असला म्हणजे जाणीवेचा अभाव असतो हें म्हणणें सोडून द्या.

पूर्वपक्षी—तसें नव्हे. जाणण्याची वस्तु ही ज्ञानाहून निराळी असते असें आमचें म्हणणें आहे. जाणणें हें जाणण्याच्या वस्तूहून निराळें असतें असें आमचें म्हणणेंच नाहीं.

शिष्य—मला तुमच्या बोलण्याचा अर्थ समजतो. तो असा; तुमच्या म्हणण्याप्रमाणें ज्ञेय वस्तु इतक्या पुष्कळ आहेत कीं, त्या सर्व ज्ञानाच्या कक्षेंत येऊं शकत नाहींत; पण ज्ञान हें ज्ञेय वस्तुंव्यतिरिक्त असत नाहीं. ज्ञेय वस्तु अज्ञात असेल; पण ज्ञान झालें कीं ज्ञानविषय तेथें असलाच पाहिजे. साराश, ज्ञान हें विषयानुगामी आहे. तें ज्ञेय वस्तूं-हून अन्य ठिकाणीं राहात नाहीं. ज्ञेय वस्तु मात्र ज्ञानाशिवाय असूं शकेल. हें म्हणणें बरोबर आहेना ?

पूर्वपक्षी—मनुष्य हा प्राणी आहे, या उदाहरणांत मनुष्यत्व हें प्राणित्वाव्यतिरिक्त असूं शकत नाहीं; पण प्राणित्वमात्र मनुष्यत्वव्यतिरिक्त असूं शकतें. याप्रमाणें ज्ञेय हें ज्ञानव्यतिरिक्त असूं शकतें; पण ज्ञान 'मात्र ज्ञेयव्यतिरिक्त' असूं शकत नाहीं.

सिद्धान्ती—हा केवळ शब्दवादमात्र आहे प्राणी आणि मनुष्यत्व यांत जसा विशेष भेद आहे तसा ज्ञान आणि ज्ञेय हीं एकत्र राहतात असें म्हणणाऱ्या तुमच्या मतांत विशेष ( भेद ) दिसत नाहीं. ज्ञान आणि ज्ञेय हीं एक आहेत असें जर गृहीत धरावयाचें, तर ज्ञेय ज्ञानव्यतिरिक्त 'असतें; पण ज्ञानमात्र ज्ञेयव्यतिरिक्त नसतें. असें म्हणणें म्हणजे वन्हि अग्निव्यतिरिक्त असतो पण अग्नि मात्र वन्हिव्यतिरिक्त नसतो. असें म्हणण्यासारखें अप्रयोजक आहे. आतां ज्ञेयव्यतिरिक्त ज्ञान असतें असें जर—हा आम्ही काढलेला दोष टाळण्यासाठीं म्हणाल तर सुषुप्तीमध्यें ज्ञेयाभाव असतो ( जाणण्याच्या वस्तूचा अभाव असतो )

म्हणून ज्ञानाचा अभाव असतो, असें म्हणाल ! पण असें तुम्हांस सिद्धच करितां यावयाचें नाहीं.

**ज्ञेयाभावेऽदर्शनादभावो ज्ञानस्येति चेन्न ॥ सुषुप्ते ज्ञप्त्यभ्युपगमात् । वैनाशिकैरभ्युपगम्यते हि सुषुप्तेऽपि ज्ञानास्तित्वं, तत्रापि ज्ञेयत्वमभ्युपगम्यते ज्ञानस्य स्वेनैवेति चेन्न । भेदस्य सिद्धत्वात् । सिद्धं ह्यभावविज्ञेयविषयस्य ज्ञानस्याभावज्ञेयव्यतिरेकाज्ज्ञेयज्ञानयोरन्यत्वम् ।**

पूर्वपक्षी—आपण गाढ निद्रा घेत असतों, त्यावेळीं आपल्यास कोणतीही वस्तु ज्ञेय नसते म्हणून ज्ञानाचें दर्शन होत नाहीं. आणि दर्शन होत नाहीं, म्हणून तेथें ज्ञानाचा अभाव असतो एवढें तरी तुम्ही कबूल कराल !

सिद्धान्ती—नाहीं. सुषुप्तीमध्यें ज्ञानाचें अस्तित्व गृहीत धरावेंच लागतें. वैनाशिक पंडित सुद्धां म्हणतात कीं, विशेष ज्ञानाच्या संबंधानें ज्ञान हें सदैव नित्य आहे.

शिष्य—म्हणजे काय ?

सिद्धान्ती—वस्तूंचें जें ज्ञान असतें त्याला विशेष ज्ञान असें म्हणतात. सुषुप्तीच्या पूर्वी जें विशेष ज्ञान असतें तेंच गाढ निद्रेंतून जागृत झाल्यावरही असतें. या ज्ञानाला खंड पडत नाहीं. म्हणून सुषुप्तीतही तें ज्ञान असतें, असें वैनाशिकाचें म्हणणें आहे.

पूर्वपक्षी—पण त्यांचें असें म्हणणें आहे कीं, सुषुप्तिकालीं ज्ञेयाभाव असतो म्हणून तदनुगामी (त्यानें निरूपित केलेल्या, त्यावरून कळणाऱ्या) ज्ञानाचें अदर्शन असतें. आणि सुषुप्तिकालीं जें ज्ञान असतें असें आम्ही म्हणतों, तें स्वतःच स्वतःला ज्ञेय असतें. सुषुप्तिकालीं ज्ञानच ज्ञेय होतें. तुमचें मत तसें नाहीं. तुम्ही ज्ञानच ज्ञेय होतें असें म्हणत नाहीं. सुषुप्तिकालीं दुसरें कांहीं ज्ञेय नसतें. म्हणून ज्ञान-निरूपक कांहीं नसल्यामुळें ज्ञान आहे असें तुम्हांस म्हणता येत नाहीं. सारांश, सुषुप्तिकालीं ज्ञानच ज्ञेय होऊन प्रकट होतें असें आम्ही म्हणतों; पण ज्ञानाला ज्ञेयत्व प्राप्त होतें हें तुम्ही स्वीकृत करीत नाहीं, म्हणून सुषुप्तिकालीं ज्ञान असतें असें तुम्हांस म्हणतां येत नाहीं.

सिद्धान्ती—हें तुमचें म्हणणें योग्य नाहीं. ज्ञान आणि ज्ञेय यांचा भेद नित्य सिद्ध आहे. ज्ञान हें केव्हांही ज्ञेय व्हावयाचें नाहीं. आणि पूर्वी आम्ही ज्ञान आणि ज्ञेय यांमधील भेद अभावसंबंधीं सिद्ध केला आहे. त्याच हेतूंनीं सर्वत्र ज्ञान आणि ज्ञेय यांमधील भेद सिद्ध होतो, पहा कीं आतां येथें घट नाहीं. त्यावेळीं आपणांस येथील घटाच्या अभावाचें ज्ञान आहे. अभाव हा आहे ज्ञेय विषय ज्याचा, तें अभाव-विज्ञेय-विषयज्ञान अथवा अभावज्ञान होय. आणि

अभाव हा त्या ज्ञानाचा विषय आहे. अर्थात् अभाव हा ज्ञेय आणि अभाव-ज्ञान हें ज्ञान, यांमध्यें अत्यंत भेद आहे हें स्पष्ट आहे.

न हि तत्सिद्धं मृतमिवोज्जीवयितुं पुनरन्यथा कर्तुं शक्यते वैनाशिकशतैरपि ज्ञानस्य ज्ञेयत्वमेवेति । तदप्यन्येन तदप्यन्येनेति त्वत्पक्षेऽतिप्रसङ्ग इति चेन्न । तद्विभागोपपत्तेः सर्वस्य । यदा हि सर्वं ज्ञेयं कस्यचित्तदा तद्व्यतिरिक्तं ज्ञानं ज्ञानमेवेति द्वितीयो विभाग एवाभ्युपगम्यते ऽवैनाशिकैर्न तृतीयस्तद्विषय इत्यनवस्थानुपपत्तिः।

पूर्वपक्षी—अभावस्थळीं भेद असतो हें आम्हांस कबूल आहे. पण सर्वत्र ज्ञानज्ञेयांमध्यें भेदच असतो हें मात्र आम्ही कबूल करणार नाहीं.

सिद्धान्ती—हें पहा, अभावस्थळीचा भेद ज्या हेतुसाठीं कबूल आहे तोच हेतु सर्वत्र विद्यमान असल्यामुळें ज्ञान आणि ज्ञेय हीं सर्वथा भिन्न आहेत, असें तुम्हांस म्हटलेंच पाहिजे. मेलेला मनुष्य जिवंत करणें किंवा तो मेला नाहीं असें सिद्ध करणें ही गोष्ट जशी केवळ असाध्य आहे, त्याचप्रमाणें शेंकडों जरी वैनाशिक पंडित आले तरी त्यांच्या हातून ज्ञान आणि ज्ञेय यांमध्यें सिद्ध होणारा जो भेद तो नाहींसा करतां येणार नाहीं.

पूर्वपक्षी—आपल्या स्वतःच्या व्यतिरिक्त जें आहे तें ज्ञेय होय. असा जर नियम केला तर ज्ञानासंबंधानें अनवस्था उत्पन्न होईल. म्हणजे ज्ञान हें दुसऱ्या कोणाचें ज्ञेय होईल. तें तिसऱ्याचें होईल, अशी अनवस्था होईल.

सिद्धान्ती—नाहीं. ही अनवस्था होण्याचें कारण नाहीं. आपल्या स्वतः व्यतिरिक्त जें कांहीं आहे तें ज्ञेय होय. अशा नियमाचा अंगीकार आम्हीं करितों आणि ज्ञानाला केव्हांही ज्ञेयत्व येत नाहीं, असें आम्ही म्हणतों, म्हणून तुम्ही जो दोष आमच्या माथीं मारित आहांत तो आम्हांस स्पर्शसुद्धां करीत नाहीं. सर्व वस्तुजातीचा असंकर ( अमिश्रण स्पष्टभेद, विभाग ) असतो. ज्ञान हें ज्ञानमात्र असतें. तें केव्हांही ज्ञेय नसतें. ज्ञेय हें सर्वदा ज्ञेयच असतें. तें केव्हांही ज्ञान होत नसतें. सारांश, ज्ञान आणि ज्ञेय हे परस्पर भिन्न आहेत आणि ज्ञानरूपी ज्ञेयाचें ज्ञानाचें ज्ञान, अशी अनवस्था प्राप्त होत नाहीं. जेव्हां सर्व ज्ञेय आहे असें ठरतें तेव्हां तद्व्यतिरिक्त असणारें ज्ञान सदैव ज्ञानरूपच असतें. हा जे वैनाशिक नाहींत त्यांच्या ज्ञानमीमांसेचा प्रकार आहे. त्यांना केव्हांही अनवस्थेचा प्रसंग प्राप्त होत नाहीं. कारण ते केव्हांही ज्ञानाला ज्ञेय असें म्हणत नाहींत व ज्ञान केव्हांही ज्ञेय असूं शकत नाहीं.

ज्ञानस्य स्वेनैवाविज्ञेयत्वे सर्वज्ञत्वहानिरिति चेत्सोऽपि दोषस्तस्यैवास्तु किं तन्निवर्हणेनास्माकमनवस्थादोषश्च ज्ञानस्य ज्ञेयत्वाभ्युपगमादवश्यं च वैनाशिकानां ज्ञानं ज्ञेयम्।

पूर्वपक्षी—हें तुमचें ज्ञान जर स्वतःलाच अविज्ञेय असेल, ज्ञानाला ( ज्ञानात्मक ब्रह्माला जर स्वतःचें स्वरूप अज्ञात राहील, तर तुम्ही ब्रह्माला व ब्रह्मज्ञाला सर्वज्ञ असें जें उपपद देतां तें अयोग्य होईल, ब्रह्म हें सर्वज्ञ आहे असें म्हणतां येणार नाहीं. कारण, ज्ञानात्मक जें ब्रह्म त्याला स्वतःविषयींचेंच अज्ञान असेल.

सिद्धान्ती—तुम्हांला सर्वज्ञ या शब्दाचा अर्थ कळला नाहीं असें वाटतें—त्याचा अर्थ असा आहे कीं, जाणण्यास म्हणून जें जें कांहीं योग्य आहे त्या सर्वांचें ज्ञान असणें म्हणजे सर्वज्ञत्व होय. आतां जाणण्यास योग्य अशी गोष्ट असून तिचें ज्ञान नसेल तर ब्रह्माच्या सर्वज्ञत्वाची हानि होईल. पण ब्रह्माचें चिंग माहीत नाहीं म्हणून ब्रह्म असर्वज्ञ आहे. असें म्हणाल तर तसें म्हणण्यास तुम्ही स्वतंत्र आहां; पण युक्ति मात्र स्वतंत्र नाहीं. शिवाय असर्वज्ञत्वाचा दोष वैनाशिकाकडेच जातो. कारण त्यानें ज्ञान हें ज्ञेय असतें अशा अन्याय्य सिद्धांताचा अंगीकार केला आहे.

पूर्वपक्षी—तुम्ही तरी सर्वज्ञत्व उपपदाची कशी व्यवस्था लावतां ? जर ब्रह्माला स्वतःचेंच स्वतः ज्ञान नाहीं, तर तें ब्रह्म सर्वज्ञ कसें होईल.

सिद्धान्ती—अहो महाराज, हें सर्व दिसणारें विश्व जर मायिक आहे, मायाकृत आहे, मिथ्या आहे, तर या मायेचें किंवा मायाकृत वस्तूचें ज्ञान असलें किंवा नसलें तरी त्यांत कांहीं दोष नाहीं. वस्तुतः पाहिलें असतां सर्व व्यवहाराला हेतु असणारें जें ज्ञान तें असणारा पुरुष सर्वज्ञ असतो. आतां हें ज्ञानत्व स्वयंप्रकाश असतें म्हणून स्वव्यवहारालाही हेतु असतें. तात्पर्य, सर्वज्ञत्वाचा दोष आमच्या ब्रह्माकडे येत नाहीं. वैनाशिकाकडेच तो जातो. म्हणून आम्ही पूर्वोक्त दोषाचा ( स्वज्ञानाभावाचा ) दोष स्वीकारीत नाहीं. ज्ञानाला ज्ञेयत्वाचा पोषाख चढविणाऱ्या वैनाशिकाकडे हा दोष जातो. कारण ज्ञानाला ज्ञेय म्हटलें म्हणजे त्या ज्ञेयाचा ज्ञाता कोण व त्या ज्ञात्याचें ज्ञान काय ? पुनः या ज्ञानाचा ज्ञाता कोण अशी मालिका लागते आणि अनवस्था होते.

स्वात्मना चाविज्ञेयत्वेनानवस्थाऽनिवार्या । समान एवायं दोष इति चेन्न । ज्ञानस्यैकत्वोपपत्तेः । सर्वदेशकालपुरुषाद्यवस्थमेकमेव ज्ञानं नामरूपाद्यनेकोपाधिभेदात्सवित्रादिजलादिप्रतिबिम्बवदनेकधाऽवभासत इति । नासौ दोषः । तथा चेहेदमुच्यते ।

पूर्वपक्षी—ज्ञान हें जर अज्ञेय राहणार तर व्यवहाराची सिद्धि होत नाहीं. तुम्हां आम्हांस बोलण्या चालण्याचा व्यवहारच करितां यावयाचा नाहीं. बरें, दुसऱ्या ज्ञानानें हें तुमचें ज्ञान ज्ञेय होतें असें म्हटलें तर दुसऱ्या ज्ञानाचा ज्ञाता कोण ? त्याचा ज्ञाता कोण ? अशी मालिका लागते. आणि अनवस्था उत्पन्न होते. जो दोष तुम्ही आमच्यावर लादूं पहात आहांत तो तुमच्यापाशीं येऊन आदळत आहे. उभयपक्षीं हा दोष सामान्यच आहे.

सिद्धान्ती—नाहीं. ज्ञानामध्यें भेद आहे, असें आम्ही केव्हांही म्हणत नाहीं. ज्ञान एकस्वरूप असतें, शिवाय तें स्वप्रकाश असतें म्हणून व्यवहारालाही अडचण पडत नाहीं. दिव्याला दुसरा प्रकाशक दिवा लागत नाहीं. कारण तो स्वयंप्रकाश असल्यामुळें स्वतःचें स्वरूप प्रकट करून दुसऱ्या पदार्थांचें स्वरूप प्रकाशित करितो. त्याप्रमाणें ज्ञान हें स्वयंप्रकाश असल्यामुळें दुसऱ्या ज्ञानाची अपेक्षा करित नाहीं. आणि तसेंच तें आपलें स्वरूपही स्वयमेव प्रकट करितें; तथापि तें स्वतःची ज्ञेयवस्तु केव्हांही होत नाहीं. सर्व देश, काळ, पुरुष इत्यादिकांचे ठिकाणीं वास्तव्य करणारें ज्ञान एक आणि एकरूप असतें. तें अनेक रूपांनीं व अनेक नामांनीं प्रकट होतें हें खरें, पण हीं त्याचीं नाम–रूपें उपाधींनीं घटित होतात. सूर्य एक असूनही जल, तेल, आदर्श इत्यादिकांमध्यें प्रतिबिंबित झाला असतां निरनिराळ्या स्वरूपाचा दिसतो, कारण, जल–तैलादि–उपाधींनीं तो ग्रस्त झालेला असतो. तसेंच चैतन्य हें परमार्थतः एकरूप आहे; तथापि उपाधिभेदांनीं त्याला अनेक नामरूपें प्राप्त होतात. या प्रमाणें चैतन्य एक आहे. म्हणून तें नित्य आहे. हें विश्व एकरूप नाहीं व नित्यही नाहीं; पण चैतन्य नित्य व अपरिच्छिन्न आहे, म्हणून सत्य आहे, आणि तेंच सर्वांचें अधिष्ठान आहे. या अधिष्ठानावर कलांचा जो आरोप या मंत्रांत केला आहे तो आत्मलाभासाठीं व आत्मज्ञानासाठीं केला आहे.

ननु श्रुतेरिहैवान्तः शरीरे परिच्छिन्नः कुण्डबदरवत्पुरुष इति, न प्राणादिकलाकारणत्वात् । न हि शरीरमात्रपरिच्छिन्नस्य प्राणश्रद्धादीनां कलानां कारणत्वं प्रतिपत्तुं शक्नुयात् । कलाकार्यत्वाच्च शरीरस्य । न हि पुरुषकार्याणां कलानां कार्यं सच्छरीरं कारणकारणं स्वस्य पुरुषं कुण्डबदरमिवाभ्यन्तरीकुर्यात् बीजवृक्षादिवत्स्यादिति चेत् ।

*पूर्वपक्षी—असें कसें म्हणतां ? श्रुतीनेंच प्रत्यक्ष असें म्हटलें आहे कीं हें* तुमचें चैतन्य किंवा आत्मा किंवा ज्ञान हें शरीराच्या अंतर्भागीं परिच्छिन्न होऊन राहिलेलें आहे. एखाद्या कुंडीमध्यें वाढणाऱ्या वृक्षाचें रोप परिच्छिन्न झालेलें असतें, तसाच या मंत्रांतील पुरुष शरीराच्या अंतर्भागीं मर्यादित होऊन राहिला आहे. श्रुतीला पुरुष मर्यादित आहे असें सांगावयाचें आहे.

सिद्धान्ती—नाहीं. श्रुति असें म्हणत नाहीं. कारण, पुरुष किंवा आत्मा, प्राण, श्रद्धा, पंचमहाभूतें इत्यादि कलांचें कारण आहे. पहा कीं, शरीर हें कलांचें कार्य असतें. प्राणादिकला शरीराचीं कारणें असतात. प्राणादिकांपासून शरीर उत्पन्न होतें. आतां ज्या शरीराचें कारण प्राणादि कला त्याचें कारण असणारा पुरुष तो त्या शरीरानें केव्हांही मर्यादित होणार नाहीं. शरीरानें परिच्छिन्न झालेला आत्मा

शरीरकारण ज्या कला त्यांचें कारण केव्हांही होऊं शकावयाचा नाहीं. तसेंच पुरुषापासून उत्पन्न होणाऱ्या ज्या कला त्यांचें कार्य शरीर असतें म्हणून त्या शरीराला आपल्या कारणाचें कारण जो पुरुष त्याला केव्हांही मर्यादित करितां यावयाचें नाहीं. कुंडीला बदरवृक्ष मर्यादित करितां आला म्हणून शरीराला केव्हांही आपल्या कारणाच्या कारणाला मर्यादित करितां यावयाचें नाहीं. येथें शरीराच्या अंतर्यामी पुरुष असतो असें म्हटलें आहे, तें प्रत्यगात्म्याच्या दृष्टीनें म्हटलें आहे. परिच्छिन्नत्वाच्या दृष्टीनें म्हटलें नाहीं. कारण आतांच सांगितलें आहे कीं, कोणत्याही वस्तूला आपल्या कारणाचें कारण मर्यादित करितां येणार नाहीं.

पूर्वपक्षी—न यावयास काय झालें ? बीजापासून वृक्ष होतो. वृक्षाला फळ येतें आणि त्या फळांतच बीज असतें.

शिष्य—म्हणजे कसें ?

यथा बीजकार्यं वृक्षस्तत्कार्यं च फलं स्वकारणकारणं बीजमभ्यन्तरीकरोत्याम्रादि तद्वत्पुरुषमभ्यन्तरीकुर्याच्छरीरं स्वकारणकारणमपीति चेन्न । अन्यत्वात्सावयवत्वाच्च । दृष्टान्ते कारणबीजाद् वृक्षफलसंवृत्तान्यन्यान्येव बीजानि दार्ष्टान्तिके तु स्वकारणकारणभूतः स एव पुरुषः शरीरेऽभ्यन्तरीकृतः श्रूयते ।

पूर्वपक्षी—आंब्यासारखा कोणताही वृक्ष घेतला तरी तो बीजापासून उत्पन्न होतो. वृक्ष हें बीजाचें कार्य आहे. या वृक्षाला फळें येतात. अर्थातच फळें वृक्षाचीं कार्यें असतात आणि या फळांत त्यांचें कारण जो वृक्ष, त्या वृक्षाचें कारण, बीज, अवस्थित असतें. याचप्रमाणें शरीराचें कारण ज्या कला त्या कलांचें कारण असणारा आत्मा ( पुरुष ) शरीरांत ( कार्याच्या कार्यांत ) राहूं शकेल. या विचारसरणींत मला तर दोष दिसत नाहीं.

सिद्धान्ती—दोष नाहीं कसा ? ज्या बीजापासून वृक्ष झाला तें बीज वृक्षाच्या फळांत असतें काय ? नाहीं. वृक्ष उत्पन्न करणारें बीज निराळें व वृक्षाच्या फळांत असणारें बीज निराळें. तसेंच बीज सावयव असतें. पण चैतन्य निरवयव असतें. म्हणून तुमचा दृष्टांत योग्य नाहीं. श्रुतीमध्यें ज्या पुरुषाचा उल्लेख आहे तो शरीरांत राहतो असें म्हटलें आहे. तो शरीराच्या कारणाचें कारण आहे. ' ज्यामध्यें सोळा कला असतात, तोच पुरुष शरीराच्या अंतर्यामी असतो ' असे श्रुतीमध्यें स्पष्ट शब्द आहेत.

बीजवृक्षादीनां सावयवत्वाच्च स्यादाधाराधेयत्वं निरवयवश्च पुरुषः सावयवाश्च कलाः शरीरं च, एतेनाऽऽकाशस्यापि शरीराधारत्वमनुपपन्नं किमुताऽऽकाशकारणस्य पुरुषस्य तस्मादसमानो

दृष्टान्तः । किं दृष्टान्तेन वचनात्स्यादिति चेन्न । वचनस्याकारकत्वात् । नहि वचनं वस्तुनोऽन्यथाकरणे व्याप्रियते । किं तर्हि यथाभूतार्थद्योतने । तस्मादन्तः शरीर इत्येतद्वचनमण्डस्यान्तर्व्योमेतिवद्द्रष्टव्यम् । उपलब्धिनिमित्तत्वाच्च दर्शनश्रवणमननविज्ञानादिलिङ्गैरन्तःशरीरे परिच्छिन्न इव ह्युपलभ्यते पुरुष उपलभ्यते चात उच्यतेऽन्तःशरीरेऽसोम्य स पुरुष इति न पुनराकाशकारणः सन्कुण्डबदरवच्छरीरपरिच्छिन्न इति मनसाऽपीच्छात वक्तुं मूढोऽपि किमुत प्रमाणभूता श्रुतिः ॥ २ ॥

सिद्धान्ती—आतांच आम्ही सांगितलें कीं, बीज आणि वृक्ष हे अवयवी पदार्थ आहेत म्हणून त्यांच्यामध्यें आधार आणि आधेय संबंध असू शक

शिष्य—ज्याचा आश्रय असतो तो आधार आणि ज्याला आश्रय असतो (जो आश्रय घेतो) तो आधेय, असाच अर्थ आहे कीं ? पृथ्वी सर्व पदार्थांचा आधार आहे आणि सर्व पदार्थ हे आधेय आहेत.

सिद्धान्ती—बरोबर आहे. आतां पुरुष अवयवशून्य आहे. पण कळा व शरीर हीं सावयव आहेत. अर्थातच निरवयव असणारें आकाश शरीराचा आधार घेतें, असें म्हणणें योग्य नाहीं. मग आकाशाचेंही कारण असणारा पुरुष शरीराचा आधार घेऊन राहतो, हें म्हणणें युक्तिक कसें होईल? एवंच तुमचा दृष्टांत प्रस्तुत प्रकरणीं मुळींच योग्य नाहीं.

पूर्वपक्षी—दृष्टांत योग्य नसला म्हणून काय झालें ! ' अंतःशरीरे ' हें श्रुतिवचन तर आमच्या बाजूचें आहे.

सिद्धान्ती—नाहीं. श्रुतिवचन तुमचे म्हणण्यास अनुकूल नाहीं. शिवाय वस्तु असते तशी नाहीं, हें म्हणणें श्रुतीला शक्य नाहीं. किंवा श्रुति तसें कधीही नाहीं किंवा तिला तसें करणें शक्य नाहीं. वस्तूचें यथार्थ स्वरूप प्रकट करणें हें श्रुतिवचनाचें कार्य आहे. श्रुति तसें न करील तर सर्व विचार व्यर्थ होतील. म्हणून तुम्ही जें असद्भाषण करतां त्याला श्रुति केव्हांही संमत होणार नाहीं. तात्पर्य, हें आहे कीं, ' अंतःशरीर ' हें पद इतकेंच सांगतें कीं सर्वव्यापी आत्मा शरीराच्या अंतर्भागींही असतो. अंड्याच्या आंत आकाश असतें, या म्हणण्यानें आकाश परिच्छिन्न आहे, असें जसें म्हणतां येत नाहीं तसेंच सर्वव्यापी आत्मा शरीराच्या अंतर्भागीं मात्र असतो, असेंही म्हणतां येत नाहीं. फार तर इतकें मात्र म्हणतां येईल कीं अंतःशरीर हें आत्म्याच्या अभिव्यक्तीचें (प्रकाशनाचें) एक निमित्तस्थान आहे. त्याचप्रमाणें दर्शन, श्रवण, मनन, विज्ञान इत्यादि लिंगांनीं प्रतीत होणारा आत्मा अंतःशरीरांत परिच्छिन्न झाल्यासारखा दिसतो. म्हणून श्रुति लोकव्यवहारास अनुसरून म्हणते कीं, ' हे सौम्य,

तो पुरुष शरीराच्या अंतर्भागीं असतो. ' आकाशाचें कारण असणारा आत्मा हा आकाशकार्य जें शरीर त्यानें परिच्छिन्न आहे, असलें विधान कसलाही मूर्ख पुरुष आपल्या स्वप्नांत सुद्धां करणार नाहीं. मग प्रामाणिक बोध करणारी श्रुति असें विधान करील हें केव्हांही संभवनीय नाहीं. ॥ २ ॥

यस्मिन्नेताः षोडश कलाः प्रभवन्तीत्युक्तं पुरुषविशेषणार्थं कलानां प्रभवः स चान्यार्थोऽपि श्रुतः केन क्रमेण स्यादित्यत इदमुच्यते—

सिद्धान्ती—' ज्यामध्यें ह्या सोळा कला उत्पन्न होतात. ' हें वाक्य पुरुषाचा विशेष जाणण्यासाठीं उपयोगिलें आहे. यासाठींच तो कलांचा उत्पादक आहे, असें म्हटलें आहे. अर्थातच या कलांहून तो निराळा आहे, असें सांगितलें आहे. आतां या मंत्रांत त्यांचा क्रम कसा आहे तें सांगावयाचें आहे—

---

## मंत्र तिसरा.

### स ईक्षांचक्रे। कस्मिन्नहमुत्क्रान्त उत्क्रान्तो भविष्यामि कस्मिन्वा प्रतिष्ठिते प्रतिष्ठास्यामीति ॥ ३ ॥

अन्वय व अर्थ—सः ईक्षांचक्रे ( तो पाहता झाला ) कस्मिन् उत्क्रांते अहं उत्क्रांतः भविष्यामि वा कस्मिन् प्रतिष्ठिते प्रतिष्ठास्यामि इति ( कोणता कर्ता उत्क्रांत झाल्यावर मी उत्क्रांत होईन आणि कोणाची स्थापना झाल्यावर मी स्थापित होईन ? ॥ ३ ॥

चेतनपूर्विका च सृष्टिरित्येवमर्थं च पुरुषः षोडशकलः पृष्टो यो भारद्वाजेन स ईक्षांचक्र ईक्षणं दर्शनं चक्रे कृतवानित्यर्थः । सृष्टिफलक्रमादिविषयम् । कथमित्युच्यते, कस्मिन्कर्तृविशेषे देहादुत्क्रान्त उत्क्रान्तो भविष्याम्यहमेव ( चं ) कस्मिन्वा शरीरे प्रतिष्ठितेऽहं प्रतिष्ठास्यामि प्रतिष्ठितः स्यामित्यर्थः ।

सिद्धान्ती—पुढें जो क्रम सांगितला आहे तो कलांच्या उत्पत्तीचें ज्ञान सौकर्यानें व्हावें आणि कार्याचें कारण, त्याचें कारण, अशा क्रमानें गेलें असतां कार्यवस्तूचा कारणांत लय करणें सोपें होतें, म्हणून येथें क्रम सांगितला आहे. आणि हा क्रम नीट समजण्यासाठीं या मंत्राची योजना केली आहे. ध्यानांत ठेवा कीं, आपली ही सर्व सृष्टि चैतन्यानें उत्पन्न केली आहे व यासाठींच सर्वव्यापी व निरवयव आत्मा षोडश कलांचा आहे असें श्रुतीनें म्हटलें आहे. या आत्म्यानें पाहिलें व विचार केला तो असा—कोणता विशेष कर्ता देहांतून बाहेर

गेला असतां मला बाहेर जावें लागेल व कोणता कर्ता शरीरांत प्रतिष्ठित झाला असतां मी ही शरीरांमध्ये प्रतिष्ठित होईन। येथें प्राणादि कला ही सृष्टि आहे आणि प्राणादिकांची उत्क्रांति व प्रतिष्ठा हें फळ आहे. सारांश प्राणादि कोण उत्क्रांत झाले व प्रतिष्ठित झाले असतां आत्म्याची उत्क्रांति व प्रतिष्ठा सिद्ध होतात, हा क्रम येथें पहावयाचा आहे.

"नन्वात्माऽकर्ता प्रधानं कर्तृ, अतः पुरुषार्थं प्रयोजनमुररीकृत्य प्रधानं प्रवर्तते महदाद्याकारेण तत्रेदमनुपपन्नं पुरुषस्य स्वातन्त्र्येणेक्षापूर्वकं कर्तृत्ववचनं सत्त्वादिगुणसाम्ये प्रधाने प्रमाणोपपन्ने सृष्टिकर्तरि सतीश्वरेच्छानुवर्तिषु वा परमाणुषु सत्स्वात्मनोऽप्येकत्वेन कर्तृत्वे साधनाभावादात्मन आत्मन्यनर्थकर्तृत्वानुपपत्तेश्च। न हि चेतनावान्बुद्धिपूर्वकार्यात्मनोऽनर्थं कुर्यात्।"

पूर्वपक्षी—सांख्य शास्त्राचें असें म्हणणें आहे कीं, आत्मा हा कर्ता नाहीं. प्रधान (प्रकृति) कर्ता आहे. पुरुषार्थें (आत्म्यार्थें) प्रयोजन सिद्ध व्हावें म्हणून प्रकृति पुरुषाच्या प्रयोजनाचा स्वीकार करते आणि महत्, बुद्धि, मन इत्यादि स्वरूपें घेऊन कार्य करीत असते. अर्थातच पुरुषानें स्वतंत्रतेनें ईक्षण करणें, पाहणें, पुरुषाला कर्तृत्व येणें, या येथें सांगितलेल्या गोष्टी शास्त्रसिद्ध नाहींत. सर्वकर्तृत्व प्रधानाकडे (प्रकृतीकडे) आहे—

शिष्य—आत्मा कर्ता नाहीं हें कशावरून?

पूर्वपक्षी—वेदान्तशास्त्र व सांख्यशास्त्र या उभयतांचाही सिद्धांत आम्ही म्हणतों असाच आहे. शिवाय आत्मा कर्ता आहे असें क्षणभर गृहीत धरलें तरी तो एकाकी आहे, असें वेदान्त शास्त्र म्हणतें. म्हणून त्याला कांहीं करितांही यावयाचें नाहीं. कुलालानें घट करण्याचा संकल्प केला, तरी त्याला मृत्तिका अवश्य हवी. तसेंच सृष्टि उत्पन्न करणें, संसार उत्पन्न करणें, म्हणजे दुःखादि अनर्थ उत्पन्न करणें आहे. आपल्या स्वतःला दुःख होईल, असें कोणतेंही कृत्य शहाणा पुरुष करीत नाहीं. आत्मा तर सर्वज्ञ आहे. असें तुम्ही म्हणतां. म्हणून पुरुषानें विचार केला, उपादानादि कारणांच्या अभावीं सृष्टि उत्पन्न केली, किंवा दुःखात्मक सृष्टि उत्पन्न केली हें म्हणणें तुम्हांस योग्य नाहीं. अर्थातच प्रकृतीनें सृष्टि उत्पन्न केली व ती जीवांच्या पुरुषार्थसिद्धीसाठीं केली हें म्हणणें ओघप्राप्त होतें.

शिष्य—प्रकृति तर अचेतन आहे. संकल्प करण्याचें किंवा निश्चय करण्याचें सामर्थ्य तिला नाहीं. म्हणून प्रकृतीनें संकल्पपूर्वक सृष्टि केली हें म्हणणें योग्य नाहीं.

पूर्वपक्षी—योग्य नाहीं कसें? वासराच्या पोषणासाठीं धेनूचा अचेतन देह दुग्ध उत्पन्न करितो व पिकें चांगलीं यावीं म्हणून अचेतन पर्जन्यही वर्षाऋतूंत पडत असतो.

शिष्य—पण पुरुषाप्रमाणेंच प्रधानही एकाकी आहे म्हणून त्याला सहकारी कारण मिळणें असंभवनीय आहे.

पूर्वपक्षी—सत्त्व, रज आणि तम यांची साम्यावस्था झाली म्हणजे या अवस्थेला प्रधान असें नांव सांख्यमतांत दिलें आहे. आतां सत्वादि गुणांच्या वैषम्यामुळें प्रधानाला अनेकात्मकत्व प्राप्त होतें आणि म्हणून प्रधानाचें कर्तृत्व न्याय्य होतें. आत्म्याचें तसें नाहीं. एवंच आत्मा ( पुरुष ) कर्ता नाहीं असें स्पष्ट ठरतें.

शिष्य—हें सर्व ठीक आहे. पण जोंपर्यंत अचेतनाला चैतन्यस्वामित्व नसतें, तोंपर्यंत अचेतनाला कर्म करण्याचें सामर्थ्य नसतें, असा नेहमींचा अनुभव आहे. योजकाशिवाय जड वस्तूला कर्म करण्याची प्रवृत्ति होत नाहीं.

पूर्वपक्षी—आम्ही परमाणुवादाचा अंगीकार करून असें म्हणतों कीं, हे सर्व परमाणु ईश्वराच्या इच्छेनें कर्म-प्रवृत्त होत असतात. यावरूनही एकाकी आत्मा कर्ता होऊं शकत नाहीं, हें ठरतें. सारांश, एकाकी आत्मा साधनाच्या अभावीं कांहीं करूं शकत नाहीं आणि कोणताही बुद्धिमान् आत्मा साधनें विद्यमान असतील तर आपल्या घाताची गोष्ट करीत नाहीं. तात्पर्य पुरुषानें पाहिलें किंवा विचार केला हें म्हणणें युक्तीला व सांख्य शास्त्राला संमत होणें शक्य नाहीं.

तस्मात्पुरुषार्थेन प्रयोजनेनेक्षापूर्वकमिव नियतक्रमेण प्रवर्तमानेऽचेतने प्रधाने चेतनवदुपचारोऽयं स ईक्षांचक्र इत्यादिः । यथा राज्ञः सर्वार्थकारिणि भृत्ये राजेति तद्वत् । न, आत्मनो भोक्तृत्ववत्कर्तृत्वोपपत्तेः यथा सांख्यस्य चिन्मात्रस्यापरिणामिनोऽप्यात्मनो भोक्तृत्वं तद्वद्वेदवादिनामीक्षादिपूर्वकं जगत्कर्तृत्वमुपपन्नं श्रुतिप्रामाण्यात् ।

पूर्वपक्षी—*म्हणून जीवाचा पुरुषार्थ सिद्ध व्हावा, यासाठीं नियतक्रमानें प्रवृत्त होणाऱ्या प्रकृतीवर चैतन्याचा आरोप मात्र करून ' त्यानें पाहिलें ' असें* श्रुति म्हणत आहे. राजाचें सर्व कार्य करणाऱ्या प्रधानाला किंवा सेवकाला आपण केव्हां केव्हां राजा या शब्दानें संबोधितों त्याप्रमाणें प्रधानाला श्रुतीनें येथें पुरुष शब्दानें संबोधिलें आहे.

सिद्धान्ती—नाहीं. प्रथम दर्शनीं आम्ही तुम्हांस असें विचारतों कीं, सांख्य मतांत पुरुषाकडे भोक्तृत्व उपयोजिलें आहे कीं नाहीं? बुद्धि ही कर्ता आणि पुरुष हा भोक्ता, असें सांख्यांनी प्रतिपादिलें आहे कीं नाहीं? भोक्तृत्व तसेंच कर्तृत्व जर सांख्यशास्त्री हे ज्ञानरूप व अविकारी आत्म्याला देऊं शकतात, आत्मा भोक्ता आहे असें जर सांख्य म्हणतात तर वैदिक लोकांनीं ' ईश्वराकडे संकल्पपूर्वक जगत्कर्तृत्व आहे, ' असें म्हटलें तर काय बिघडलें काय? शिवाय वैदिक परिभाषेत ईश्वर कर्ता आहे असें म्हणण्यास श्रुतीचा

आधारही आहे. आणि अविकारी आत्मा कर्ता होऊं शकतो . आम्हांला मायावादाचें साहाय्य घेऊन सिद्धही करितां येईल.

तत्त्वान्तरपरिणाम आत्मनोऽनित्यत्वाशुद्धत्वानेकत्वनिमित्तो न चिन्मात्रस्वरूपविक्रियाऽतः पुरुषस्य स्वात्मन्येव भोक्तृत्वे चिन्मात्रस्वरूपविक्रिया न दोषाय । भवतां पुनर्वेदवादिनां सृष्टिकर्तृत्वे तत्त्वान्तरपरिणाम एवेत्यात्मनोऽनित्यत्वादिसर्वदोषप्रसङ्ग इति चेन्न एकस्याप्यात्मनोऽविद्यायां विषयनामरूपोपाध्यनुपाधिकृतविशेषाभ्युपगमाद्विद्याकृतनामरूपोपाधिकृतो हि विशेषोऽभ्युपगम्यत आत्मनो बन्धमोक्षादिशास्त्रकृतसंव्यवहाराय परमार्थतोऽनुपाधिकृतं च तत्त्वमेकमेवाद्वितीयमुपादेयं सर्वतार्किकबुद्ध्यनवगाह्यमभयं शिवमिष्यते न तत्र कर्तृत्वं भोक्तृत्वं वा क्रियाकारकफलं च स्याद्द्वैतत्वात्सर्वभावानाम् । सांख्यास्त्वविद्याध्यारोपितमेव पुरुषे कर्तृत्वं क्रियाकारकं फलं चेति कल्पयित्वाऽऽगमबाह्यत्वात्पुनस्ततस्त्रस्यन्तः परमार्थत एव भोक्तृत्वं पुरुषस्येच्छन्ति तत्त्वान्तरं च प्रधानं पुरुषात्परमार्थवस्तुभूतमेव कल्पयन्तोऽन्यतार्किककृतबुद्धिविषयाः सन्तो विहन्यन्ते ।

पूर्वपक्षी—तुमचें म्हणणें योग्य दिसत नाहीं. सांख्य मताचें पूर्ण ज्ञान तुम्हांस झालें नाहीं असें दिसतें. भोग म्हणजे सुख-दुःखाचा अनुभव होय. आत्मा भोक्ता आहे, असें म्हणणें म्हणजे तो सुख-दुःखाचा अनुभवी असतो असा अर्थ आहे. हा अनुभव सांख्यशास्त्रांतील पुरुषाचा स्वरूपभूत आहे. पुरुषाचें स्वरूपच सुखदुःख भोगण्याचें आहे. या भोगानें त्याच्या स्वरूपांत यत्किंचितही अंतर पडत नाहीं. स्वरूपांतर होणें म्हणजे पूर्व स्वरूपाचा त्याग करणें होय. हें रूपांतर आत्मा जर अनित्य असेल, अशुद्ध असेल किंवा एक स्वरूपाचा नसेल तर उत्पन्न होईल. पण सांख्यांचा पुरुष ज्ञान स्वरूप असतो आणि त्याला सुख-दुःखाचा अनुभव झाला व त्याच्या ज्ञान स्वरूपांत संकोच विकास उत्पन्न झाले तथापि मूळ स्वरूपांत कोणताही दोष उत्पन्न होत नाहीं. पण तुम्ही वैदिक पंडित म्हणतां कीं आत्मा सृष्टिकर्ता आहे आणि या कर्तृत्वानें त्याच्या स्वरूपांत विकार होतो. म्हणून तुमच्या आत्म्याला अनित्यत्व, अशुद्धत्व इत्यादि अनेक दोष प्राप्त होतात.

सिद्धान्ती—नाहीं, आम्ही काय म्हणतों तें नीट ऐका—वस्तुतः पाहातां आत्मा एकच आहे. परंतु अविद्येच्या स्थितीमध्यें विषय, नाम आणि रूप या उपाधीमुळें कांहीं एक विशेष स्वरूप भासूं लागतें. उपाधि नसेल त्यावेळीं आत्मा स्वरूपांत असतो. याप्रमाणें उभयस्वरूपांत विरोध आहे व स्वरूपांत जी भिन्नता दिसते ती अविद्येनें उत्पन्न केलेल्या नामरूपांच्या उपाधींचें फल आहे हें स्पष्ट

गृहीत घ्यावें लागतें. कशासाठीं म्हणाल तर आत्म्याला उत्पन्न होतोसा दिसणारा बंध व प्राप्त होतोसा वाटणारा मोक्ष यांसंबंधीं जीं शास्त्रें आहेत, त्यांचा व्यवहार ठीक चालला पाहिजे.

शिष्य—कृपा करून हाच विषय अन्य शब्दांनीं सांगावा.

सिद्धान्ती—आपण बद्ध आहों, असें प्रत्येकास वाटतें व आपल्यास मुक्ति मिळविली पाहिजे असा प्रत्येक जीवाचा संकल्प असतो. हें तुलाही ठाऊक आहे. या संकल्पाच्या सिद्धयर्थ श्रुतीनें साधनेंही सांगितलीं आहेत; पण शेवटीं आत्मा एक आहे, जीव आणि आत्मा भिन्न नाहींत, जें सर्व दिसतें व भासतें तें ब्रह्मरूप आहे असेंही सांगण्यास प्रवृत्त झाली आहे. सर्वच श्रुतींचा समन्वय केला असतां एक सिद्धांत असा स्पष्ट निघतो कीं, आत्मा हा एक आणि अव्यय असून त्याच्याशिवाय दुसरी खरी वस्तु नाहीं; पण दुसऱ्या वस्तु तर दिसतात व जीवाला बंधाची भीति व मोक्षाची आशा असते. तेव्हां सहजच आपल्यास असें अनुमानावयास पाहिजे कीं जें आपल्यास भिन्नत्व आणि विनाशित्व दिसतें, तें केवल अविद्याकृत नामरूपांच्या उपाधींनीं उत्पन्न झालेलें आहे. सारांश, अविद्येचें ग्रहण करावें लागतें आणि अविद्या गृहीत धेतली म्हणजे बंधमोक्ष, सुखदुःख, शीतउष्ण इत्यादि पदार्थ आणि त्याचीं शास्त्रेंही अविद्याकल्पित आहेत असें मानावें लागतें. समजलास ? परमार्थतः पाहिलें तर निरुपाधि असें एकच तत्त्व आहे. तें अद्वितीय आहे. तें तर्काला किंवा बुद्धीला गोचर होण्यासारखें नाहीं. तें भीतिशून्य असून अभय देणारें आहे. तें परम मंगल आहे. तेथें कर्तृत्व, भोक्तृत्व, क्रियाफल, इत्यादि कोणताही भिन्नभाव नाहीं. कारण तेथें सर्व भावांची एकरूपता असते. तात्पर्य वेदान्त-पद्धतींत आत्मा केव्हांही स्वरूपांतर करीत नाहीं म्हणून त्याला केव्हांही अनित्य-त्वादि दोषांचा संपर्क घडत नाहीं. तो कर्ता भोक्ता आहेसा दिसतो, हें अवि-द्येचें कार्य आहे. अविद्या संपली म्हणजे आत्म्याचें कर्तृत्व-भोक्तृत्व संपतें.

पूर्वपक्षी—या तुमच्या विवरणावरून तुम्ही अविद्येचें ग्रहण करितां आणि सांख्य शास्त्रामध्यें प्रकृतीचें ग्रहण केलें जातें, असें स्पष्ट होतें. मग तुमच्यांत आणि त्यांच्यांत फरक तो काय ?

सिद्धान्ती—आम्ही अविद्येचें ग्रहण करितों तें केवल व्यवहाराच्या सिद्धीस्तव होय. व्यवहार सिद्ध झाला म्हणजे आम्हीं तिचा त्याग करितों. व्यवहारांत जीव व ईश्वर कर्ते भोक्ते आहेत असें आम्ही म्हणतों. तथापि व्यवहार ( अविद्येचें राज्य ) संपल्याबरोबर आम्ही आत्म्याचें कर्तृत्व-भोक्तृत्व काढून घेतों. आत्मस्वरूप ' कर्तृ-भोक्तृ ' आहे, असा अनुभव नाहीं, असें अनुमान करितां येत नाहीं आणि श्रुतीचेंही सांगणें तसें नाहीं. ही आमची प्रक्रिया झाली; पण सांख्यांची प्रक्रिया निराळी आहे. ते पंडित प्रथमतः ज्ञान-

रूप पुरुषाचे ठिकाणीं असत्य कर्तृत्व–भोक्तृत्वाची स्थापना करितात; पण सर्व विरोधांचा निरास करणाऱ्या प्रामाणिक श्रुतीचा आधार त्यांस घेतां येत नसल्यामुळें व त्यांच्या प्रक्रियेंत प्रत्यक्षादि प्रमाणांनीं विरोध उत्पन्न होत असल्यामुळें ते फसून जातात आणि पुरुष हा खरोखर भोक्ता आहे, असें ठरवितात. अर्थातच त्यांस भोक्ता असणाऱ्या पुरुषासाठीं प्रधान नामक दुसऱ्या एका भोग उत्पन्न करणाऱ्या तत्त्वाची स्थापना करावी लागून तें तत्त्व खरें आहे असें मानणें भाग पडतें. यासाठीं त्यांस चेतनात्मा भोक्ता मात्र आहे; पण जड प्रकृति कर्त्री आहे असेंही गृहीत धरावें लागतें.

पूर्वपक्षी—मग यांत बिघडलें काय! भोग म्हणजे सुख दुःखाचा अनुभव होय. हा अनुभव चेतन पुरुषास मात्र घेतां येणार. परंतु ज्ञानरूप आत्म्याकडे जडाच्या सहाय्याशिवाय कर्तृत्व असणें शक्य नाहीं. म्हणून प्रकृतीकडे ते कर्तृत्व सोंपवितात. यांत मला तर कांहीं विपरीत दिसत नाहीं.

सिद्धान्ती—येथपर्यंत ठीक झालें, असें कदाचित म्हणतां येईल. पण जेथें भोक्तृत्व असतें तेथेंच कर्तृत्वही असलें पाहिजे. हें तत्त्व ते तर्कवादी पंडिताकडून उघडें घेतात आणि आपल्या मतांपासून भ्रष्ट होतात! आत्मा कर्ता नाहीं असें प्रथमतः म्हणून शेवटीं तो कर्ता आहे, असें हे पंडित मागत सुटतात!

तथेतरे तार्किकाः सांख्यैरित्येवं परस्परविरुद्धार्थकल्पनात आमिषार्थिन इव प्राणिनोऽन्योन्यविरुद्धमानार्थदर्शित्वात्परमार्थतत्त्वाद्दूरमेवापकृष्यन्तेऽतस्तन्मतमनादृत्य वेदान्तार्थतत्त्वमेकत्वदर्शनं प्रत्यादरवन्तो मुमुक्षवः स्युरिति तार्किकमतदोषप्रदर्शनं किंचिदुच्यतेऽस्माभिर्न तु तार्किकवत्तात्पर्येण।

तथैतदत्रोक्तम्—

"विवदत्स्वेव निक्षिप्य विरोधोद्भवकारणम्।<br>तैः संरक्षितसद्बुद्धिः सुखं निर्वाति वेदवित्"॥

किंच भोक्तृत्वकर्तृत्वयोर्विक्रिययाविशेषानुपपत्तिः। का नामाऽसौ कर्तृत्वाज्जात्यन्तरभूता भोक्तृत्वविशिष्टा विक्रिया, यतो भोक्तैव पुरुषः कल्प्यते न कर्ता प्रधानं तु कर्त्रेव न भोक्त्रिति।

सिद्धान्ती—याच प्रमाणें तर्क–पंडितही सांख्याचे सिद्धांत घेऊन आपल्या प्रक्रियेला भ्रष्ट करितात. अशाप्रकारें परस्परांस विरुद्ध असणाऱ्या कल्पनांचा संग्रह करून आपली प्रक्रिया स्वविरोधी आणि स्वविघातक करणारे हे पंडित आमिषासाठीं धडपड करणाऱ्या माण्याप्रमाणें स्वोच्छेदक कल्पनांचा स्वीकार करितात आणि फसतात. आतां हें सांगावयास नकोच कीं,

यांचीं मतें यांच्या प्रतिवादींनीं निंदित केलीं असल्यामुळें व यांचीं मतें स्वविरोधी असल्यामुळें तीं परमार्थ तत्त्वापासून अत्यंत दूर असतात. सारांश, तीं पारमार्थिक नसतात. म्हणून सांख्य मताचा अनादर करून वेदांतदर्शनाचें ब्रह्मात्मैक्यविषयक सिद्धांत मुमुक्षु जीव अत्यादरानें स्वीकृत करितात. सांख्य मताप्रमाणेंच नैयायिकाचें मत दुष्ट आहे. या मतांतील एकच गोष्टीचा उद्धार करून ती किती दुष्ट आहे हें आम्ही आतां दाखवितों. आम्ही नैयायिकाचें सर्व मत तात्पर्यानें सांगत बसत नाहीं. येथें केवळ एकच गोष्टीचा उल्लेख करीत आहोंत, हें विसरू नका, म्हटलें आहे. विरोध उत्पन्न होण्याचें जें कारण आहे, भेद-दर्शनाचें जें मूळ आहे, तें विवाद करणाऱ्या पंडितामध्यें ठेवून वेदवेत्ता पुरुष सर्वथा विकल्पशून्य होतो व एकत्व निश्चयानें सुखी होतो. विवाद करणाऱ्या पंडितांचें लक्ष दुसऱ्याचें छिद्र शोधून काढण्यामध्यें गुंतलें असल्यामुळें सर्व मतें दुष्ट आहेत असें ठरतें. एकत्वाचा सिद्धांत मात्र वेदप्रणीत म्हणून निश्चायक असतो. त्याचें आयतेंच सुसरक्षण होतें.

*शिष्य*—आपण तार्किकमताचें दोषप्रदर्शन करणार होतात ना!

सिद्धान्ती—ऐक. आम्ही पूर्वपक्षास विचारतों.—भोक्तृत्व आणि कर्तृत्व हे दोन्ही धर्म विकृतिकार्य आहेत. यात भिन्नभाव कसा उत्पन्न होतो? कर्तृत्वाहून भिन्न जातीची असणारी कोणती भोक्तृत्व-विशिष्ट क्रिया कीं जिच्या योगानें पुरुष हा भोक्ता मात्र कल्पिला पाहिजे. तो कर्ता असता उपयोगी नाहीं व प्रधानाकडे कर्तृत्वच असलें पाहिजे! भोक्तृत्व असतां उपयोगी नाहीं, असा सिद्धांत निघतो.

ननूक्तं पुरुषश्चिन्मात्र एव स च स्वात्मस्थो विक्रियते भुञ्जानो न तत्त्वान्तरपरिणामेन। प्रधानं तु तत्त्वान्तरपरिणामेन विक्रियतेऽतोऽनेकमशुद्धमचेतनं चेत्यादिधर्मवत्तद्विपरीतः पुरुषः। नासौ विशेषो वाङ्मात्रत्वात्, प्राग्भोगोत्पत्तेः केवलचिन्मात्रस्य पुरुषस्य भोक्तृत्वं नाम विशेषो भोगोत्पत्तिकाले चेज्जायते निवृत्ते च भोगे पुनस्तद्विशेषादपेतश्चिन्मात्र एव भवतीति चेन्महदाद्याकारेण च परिणम्य प्रधानं ततोऽपेत्य पुनः प्रधानं स्वरूपेणावतिष्ठत इत्यस्यां कल्पनायां न कश्चिद्विशेष इति वाङ्मात्रेण प्रधानपुरुषयोर्विशिष्टविक्रिया कल्प्यते।

पूर्वपक्षी—आम्ही मागेंच सांगितलें आहे कीं, पुरुष हा चिन्मात्र (ज्ञानरूप) असतो. तो भोग घेत असतां स्वरूपीं राहून मात्र विकार पावतो. त्याचें स्वरूपावर केव्हाही होत नाहीं. तो ज्ञानस्वरूपात राहून सुख दुःख मात्र भोगितो. पण प्रधानाची गोष्ट निराळी आहे. विकार झाला असतां त्याचें स्वरूपावर होतें,

म्हणून प्रधान हें अनेक, अशुद्ध, अचेतन इत्यादि स्वरूपाचें आहे असें ठरतें. पुरुष हा तद्विलक्षण आहे म्हणजे तो एक, शुद्ध, चेतन इत्यादि धर्मवान् आहे. हा उभयतांमध्यें विशेष आहे.

सिद्धान्ती—हा भेद केवळ शाब्दिक आहे, खरा नव्हे. कारण पक्ष—भोगाच्या उत्पत्तीपूर्वी केवळ ज्ञानरूप असणाऱ्या पुरुषाला भोगोत्पत्तिकाळीं भोक्तृत्वाचा धर्म प्राप्त होतो व तो भोग संपला म्हणजे पुरुषाचा भोक्तृत्व धर्म नाहींसा होऊन तो चिन्मात्र होतो, असें तुम्ही म्हणता; तसेंच तुमचें जें प्रधान आहे तें महदादिकांचें स्वरूप घेऊन कांहीं वेळ महदादि स्वरूपांत राहातें आणि या स्वरूपाचा त्याग करून पुनः आपल्या स्वस्वरूपास येतें. असें आहे ना ! मग पुरुषाच्या विकारांमध्यें व प्रधानाच्या विकारांमध्यें विशेष तो काय राहिला ? म्हणजे कांहीं नाहीं. सारांश, तुम्हीं काढलेला प्रधान पुरुषांच्या विकारामधील भेद केवळ शब्दमात्र आहे ॥ ६ ॥

**अथ भोगकालेऽपि चिन्मात्र एव प्राग्वत्पुरुष इति चेन्न तर्हि परमार्थतो भोगः पुरुषस्य, भोगकाले चिन्मात्रस्य विक्रिया परमार्थैव तेन भोगः पुरुषस्येति चेन्न । प्रधानस्यापि भोगकाले विक्रियावत्त्वाद्भोक्तृत्वप्रसङ्गः । चिन्मात्रस्यैव विक्रियाभोक्तृत्वमिति चेदौष्ण्याद्यसाधारणधर्मवतामग्न्यादीनामभोक्तृत्वे हेत्वनुपपत्तिः ।**

पूर्वपक्षी—तुम्ही आमच्या म्हणण्याचा विपर्यास करितां. भोगकाळीं सुद्धां पुरुषाचें ज्ञानरूप पूर्ववत् कायम असतें असें आम्हीं म्हणतों.

सिद्धान्ती—असें असेल तर खरोखर पुरुषाला भोगच प्राप्त होत नाहीं, असें म्हटलें पाहिजे.

पूर्वपक्षी—भोगकाळीं ज्ञानरूपी पुरुषाला खरोखर विकार उत्पन्न होतो आणि म्हणून तो भोक्तृत्वाचा अधिकारी होतो.

सिद्धान्ती—तसें असेल तर प्रधानालाही भोगकाळीं विकार उत्पन्न होऊन तो भोक्तृत्वधर्मवान् होईल.

पूर्वपक्षी—चैतन्याला मात्र जो विकार होतो त्याला भोक्तृत्व असें म्हणावयाचें.

सिद्धान्ती—मग अग्निआदि पदार्थांचे उष्णत्वादि असाधारणधर्म आहेत. त्या असाधारणधर्मी अग्नीला भोक्तृत्व कां असूं नये बरें ? असाधारणत्व हें जर भोक्तृत्व ठरविण्याचा हेतु आहे तर अग्नीही भोक्ता असावा !

पूर्वपक्षी—नाहीं. अग्नि हा प्रत्येकवेळीं नियमानें विकृत होत नाहीं. म्हणून साधारणविकाराला भोग म्हणावें.

सिद्धान्ती—पण हें भोक्तृत्व उभयतांस साधारण नसतें.

प्रधानपुरुषयोर्द्वयोर्युगपद्भोक्तृत्वमिति चेन्न । प्रधानस्य पारार्थ्यानुपपत्तेः । न हि भोक्त्रोर्द्वयोरितरेतरगुणप्रधानभाव उपपद्यते प्रकाशयोरिवेतरेतरप्रकाशने ॥ भोगधर्मवति सत्त्वाङ्गिनि चेतसि पुरुषस्य चैतन्यप्रतिबिम्बोदयोऽविक्रियस्य पुरुषस्य भोक्तृत्वमिति चेन्न । पुरुषस्य विशेषाभावे भोक्तृत्वकल्पनानर्थक्यात् ।

पूर्वपक्षी—प्रधान आणि पुरुष ह्या उभयतांसही एककालीं भोक्तृत्व असतें असें म्हणूया.

सिद्धान्ती—तसें म्हणूनही चालत नाहीं. कारण प्रधानाला पुरुषार्थप्राप्तीची इच्छा आहे, असें कोणतेंही प्रामाणिक शास्त्र म्हणत नाहीं.

पूर्वपक्षी—पुरुष हा अवयवी आणि प्रधान हा त्याचा अवयव असतो. प्रधानाला सुखदुःखादि भोग असत नाहींत. हें खरें, पण प्रधानाच्या साहाय्याशिवाय पुरुषाला भोगही प्राप्त होत नाहींत.

सिद्धान्ती—असेंही म्हणता येत नाहीं. उभयतांसही एककालीं भोगप्राप्ति होत असेल तर एकाचा मुख्यभोग आणि दुसऱ्याचा गौणभोग असतो असें म्हणतां येत नाहीं. दोन दिवे प्रकाशक असतील तर ते परस्पर परस्परांस प्रकाशित करतात, त्यांत गौण-मुख्य-भाव असत नाहीं. तसाच हाही प्रकार आहे.

पूर्वपक्षी—सत्त्वगुणात्मक अंतःकरण हा प्रकृतीचा एक प्रकार आहे. त्याचा भोग हा धर्म आहे. विकार तेथें म्हणजे अंतःकरणांत होतो. पुरुष स्वतः विकाररहित असतो, तथापि त्याचें प्रतिबिंब अंतःकरणात उदित होतें. हें उदित होणें हाच त्या पुरुषाचा भोग होय.

सिद्धान्ती—असेंही म्हणता येत नाहीं. कारण, पुरुष हा तावत् प्रक्रियेप्रमाणें निर्विशेष आहे, भेदशून्य आहे, म्हणून त्याच्या अंतःकरणाच्या ठिकाणीं भोग उत्पन्न होतो ही कल्पना अनर्थवाचक आहे.

भोगरूपश्चेदनर्थः पुरुषस्य नास्ति सदा निर्विशेषत्वात्पुरुषस्य कस्यापनयनार्थं मोक्षसाधनं शास्त्रं प्रणीयतेऽविद्याध्यारोपितानर्थापनयनाय शास्त्रप्रणयनमिति चेत्परमार्थतः पुरुषो भोक्तैव न कर्ता प्रधानं कर्त्रेव न भोक्तृ परमार्थसद्वस्त्वन्तरं पुरुषाच्चेतीयं कल्पनाऽऽगमबाह्या व्यर्था निर्हेतुका चेति नाऽऽदर्तव्या मुमुक्षुभिः ।

पूर्वपक्षी—पुरुष हा भोगरहितच आहे.

सिद्धान्ती—असें म्हणणें योग्य नाहीं. कारण, भोग हा तुमच्या म्हणण्याप्रमाणें अनर्थ करणारा आहे आणि पुरुष हा सदैव निर्विशेष असल्यामुळें ( शुद्ध व ज्ञानरूप असल्यामुळें ) त्याला भोगप्राप्ति होणें शक्य नाहीं. असें जर आहे तर तुम्ही अथवा तुमचें सांख्यशास्त्र मोक्षसाधनाचें जें प्रतिपादन करितें तें साधनें कोणत्या दोषांचा नाश करणार हें सांगा बरें ! पुरुष जर स्वतः ज्ञानरूप आहे, त्याच्या ठिकाणीं अनर्थकारी असें काहीं नाहीं तर तुमचें हें मोक्षशास्त्र कोणत्या अनर्थांचा नाश करण्याविषयीं प्रवृत्त होतें ?

पूर्वपक्षी—अविवेकानें ज्या अनर्थांचा आपण पुरुषाचे ठिकाणीं आरोप करितों त्याच्या निरसनासाठीं आमचें शास्त्र प्रवृत्त होतें.

सिद्धान्ती—असेंही म्हणणें तुम्हास शोभत नाहीं. कारण तुम्ही असें म्हणता कीं पुरुष हा भोक्ता आहे, कर्ता नाहीं व प्रधान कर्ता आहे पण भोक्ता नाहीं. शिवाय पुरुषाहून भिन्न अशा एक वेदबाह्य वस्तूचा (प्रकृतीचा—प्रधानाचा) स्वीकार करितां. ज्ञानरूप पुरुषाला भोग नसले पाहिजेत, असें असताही पुरुषापाठीमागें तुम्ही भोक्तृत्व लावितां आणि पुरुषाकडे कर्तृत्व नसताही भोगापासून उत्पन्न होणाऱ्या अनर्थांचें निराकरण करण्यासाठीं मोक्ष शास्त्र सिद्ध करितां ! आणि अकर्त्या पुरुषाला कर्म करावयास सांगता. तसेंच ज्ञानरूप पुरुषाशिवाय जड प्रकृति परमार्थतः सत्य आहे असें म्हणता. ही सर्व कल्पना श्रुतिबाह्य, निरुपयोगी आणि निष्प्रयोजन आहे. म्हणून ही सांख्य शास्त्राची कल्पना खऱ्या मुमुक्षूंनीं केव्हांही स्वीकृत करू नये. अशा योग्यतेची आहे.

> एकत्वेऽपि शास्त्रप्रणयनाद्यानर्थक्यमिति चेन्नाभावात् । सत्सु हि शास्त्रप्रणेत्रादिषु तत्फलार्थिषु च शास्त्रस्य प्रणयनमनर्थकं सार्थकं वेति विकल्पना स्यात् । न ह्यात्मैकत्वे शास्त्रप्रणेत्राद्यस्ततो भिन्नाः सन्ति तदभाव एव विकल्पनैवानुपपन्ना । अभ्युपगत आत्मैकत्वे प्रमाणार्थश्चाभ्युपगतो भवता यदात्मैकत्वमभ्युपगच्छता । तदभ्युपगमे च विकल्पानुपपत्तिमाह शास्त्रं "यत्र त्वस्य सर्वमात्मैवाभूत्तत्केन कं पश्येत्" इत्यादि । शास्त्रप्रणयनाद्युपपत्तिं चाऽऽहान्यत्र परमार्थवस्तुस्वरूपादविद्याविषये, "यत्र हि द्वैतमिव भवति" इत्यादि विस्तरतो वाजसनेयके ।

*पूर्वपक्षी—तुमच्या वेदान्तसिद्धान्तालाही हा तुमचा आक्षेप लागू पडतो. तुमच्या शास्त्रांत सत्य असें एकच तत्त्व आहे सर्व एकच आहे, तर तुमचें वेदांत शास्त्रही निरुपयोगीच आहे.*

सिद्धान्ती—नाहीं. कारण परमार्थतः (ब्रह्मस्थितींत) अनर्थ नाहीं. बंधमोक्ष नाहीं, मुमुक्षु नाहीं, आणि शास्त्रही नाहीं अशी खरी स्थिति आहे. शास्त्रें, शास्त्र करणारे

किंवा शास्त्रापासून उत्पन्न होणाऱ्या फळाची अपेक्षा करणारे ( मुमुक्षु ) जर वस्तुतः असतील तर शास्त्रांचें प्रणयन सकारण आहे किंवा निष्कारण आहे असा प्रश्न निष्पन्न होईल. आत्मवस्तु एकच आहे असा निश्चय झाल्यानंतर शास्त्र, शास्त्र-प्रणेते इत्यादि आत्मस्वरूपापासून भिन्न आहेत अशा शंका असणें शक्य नाहीं. तसा निश्चय नसेल तर तुम्हीं काढलेली शंका उपपन्न म्हणजे योग्य होईल. पण तेव्हां शास्त्र आणि शास्त्रकार अविद्याकाळीं सकारण आहेत असें ठरून तुमच्या शंकेचें निराकरण होईल. आत्मतत्त्व जर एकच आहे तर एकत्व सांगणारें शास्त्र प्रामा-णिक आहे असें तुम्हांस अवश्य गृहीत करावें लागेल. आतां आत्मैकत्व निश्चित झालें असतां संशय उत्पन्न होणें शक्य नाहीं असें श्रुति कंठरवानें सांगत आहे. 'जेव्हां ब्रह्मज्ञ पुरुषाचा ब्रह्मात्मैक्याविषयीं निश्चय होतो तेव्हां पाहणाराही तरी कोण असणार व तो पाहील तरी काय !' असें सांगणाऱ्या आणखीही अनेक श्रुति आहेत. पण अविद्येच्या राज्यामध्यें आपण असलों म्हणजे वेदांत शास्त्राचें प्रणयन योग्य आहे, असें दुसऱ्या श्रुति सांगतात. 'जेव्हां जेव्हां द्वैत असल्यासारखें भान होतें.' असा आरंभ करून बृहदारण्यकामध्यें वेदांत शास्त्राची आवश्यकता विस्तारतः सिद्ध केली आहे.

अत एव विभक्ते विद्याविद्ये परापरे इत्यादावेव शास्त्रस्यातो न तार्किकवाद्भटप्रवेशो वेदान्तराजप्रमाणबाहुगुप्त इहात्मैकत्वविषय इति । एतेनाविद्याकृतनामरूपाद्युपाधिकृतानेकशक्तिसाधनकृत-भेदवत्त्वाद्ब्रह्मणः सृष्ट्यादिकर्तृत्वे साधनाद्यभावो दोषः प्रत्युक्तो वेदितव्यः परैरुक्त आत्मानर्थकर्तृत्वादिदोषश्च ।

सिद्धान्ती—येथें म्हणजे वेदांतशास्त्रामध्यें विद्या व अविद्या परब्रह्म व अपरब्रह्म, परमार्थ आणि व्यवहार, इत्यादि भेद शास्त्राच्या आरंभींच निर्दिष्ट केले आहेत. म्हणून तर्कवादामध्यें कितीही कुशल पंडितवीर असला तरी त्याला वेदांत–राजाच्या प्रमाणरूपी बाहूंनीं संरक्षित केलेल्या 'आत्मैकत्व विषयाच्या' यांत प्रवेश करितां येणार नाहीं. आत्मविषयांत तर्काची मात्रा चालत नाहीं. याप्रमाणें अविद्येनें उत्पन्न केलेल्या नामरूपादि उपाधींच्या योगानें अनेक शक्ति, साधनें, यांनीं मात्र उत्पादित भेद–भाव ब्रह्मामध्यें उत्पन्न होतातसे दिसतात. सारांश, अविद्याकाळीं ब्रह्म हें कर्तृत्व, भोक्तृत्व इत्यादि उपाधींनीं अनेक होतें. त्याला सृष्टि करण्याचें सामर्थ्य येतें व सृष्टीचीं मूळ कारणेंही उत्पन्न होतात, हें ठरतें. अर्थातच एकच निर्विकारी परमेश्वर साधनादिकांच्या अभावीं सृष्टि उत्पन्न कशी करील अशी जी तुम्ही शंका घेतली होती तिचें निराकरण मायेचा आश्रय घेऊन आम्हीं केलें. त्याचप्रमाणें ज्ञानी ब्रह्म आपणच अनर्थ उत्पन्न करून सुखरूपांतून दुःखरूपांत जाऊन कसें पडेल असा जो आक्षेप घेतला होता त्याचेंही निराकरण झालें.

यस्तु दृष्टान्तो राज्ञः सर्वार्थकारिणि कर्तर्युपचाराद्राजा कर्तेति सोऽत्रानुपपन्नः। स ईक्षांचक्र इति श्रुतेर्मुख्यार्थबाधनात्प्रमाणभूतायाः। तत्र हि गौणी कल्पना शब्दस्य यत्र मुख्यार्थो न संभवति। इह त्वचेतनस्य मुक्तबद्धपुरुषविशेषापेक्षया कर्तृकर्मदेशकालनिमित्तापेक्षया च बन्धमोक्षादिफलार्था नियता पुरुषं प्रति प्रवृत्तिर्नोपपद्यते। यथोक्तसर्वज्ञेश्वरकर्तृत्वपक्षे तूपपन्ना ॥ ३ ॥

सिद्धान्ती—याचप्रमाणें सर्व कार्यें करणारा राजाचा सेवक असेल तर त्याला आपण औपचारिक रीतीनें 'राजा' असें नांव देतों, इत्यादि जो दृष्टांत तम्ही दिला होता, तोही प्रस्तुत प्रकरणीं उपयोगी पडत नाहीं.

पूर्वपक्षी—का बरें ?

सिद्धान्ती—कारण, हा दृष्टांत घेतला म्हणजे प्रमाणभूत असणारी 'तो पाहता झाला' अशी जी श्रुति आहे तिच्या मुख्य अर्थाचा बाध होतो. नेहेमींचा असा नियम आहे कीं, जेथें मुख्यार्थ किंवा वाच्यार्थ संभवत नाहीं तेथें लक्षणा करून गौण अर्थाचा स्वीकार करावा. येथें गौण अर्थ घेण्याचें कारण नाहीं. पण कीं अविद्याकालीं मुक्त होऊं इच्छिणाऱ्या बद्ध पुरुषांच्या अपेक्षेनें, ( कर्ता, कर्म, देश, काल, निमित्त यांच्या अपेक्षेनें ) बंधमोक्षादि फलासाठीं निश्चित केलेली प्रवृत्ति अचेतनाच्या संबंधानें ( प्रकृति संबंधानें ) केव्हांही योग्य होणार नाहीं.

शिष्य—भगवन्, हाच अर्थ आणखी जास्त स्पष्ट करून सांगाल काय ?

सिद्धान्ती—हें पहा: वेदांतशास्त्रांमध्यें जीं साधनें सांगितलीं आहेत तीं अनेक पुरुष अविद्येमध्यें असून सुखदुःखाचा उपभोग घेत पडले आहेत, मुक्त होण्याविषयीं त्यांना तळमळ लागली आहे, अशा पुरुषांकरितां सांगितलीं आहेत. अर्थातच हे अविद्येंत असणारे पुरुष कर्तृत्व, कर्म, देश, काल इत्यादि उपाधींनीं अविद्याकालीं परिच्छिन्न झालेले असतात. या उपाधींचा व अविद्येचा नाश व निरास करण्यासाठीं वेदशास्त्रांतील साधनांची प्रवृत्ति होते व ती योग्य असते. म्हणजे अविद्याकालचीं हीं साधनें अविद्येनें उत्पन्न केलेल्या उपाधींचा नाश करितात; पण अचेतन किंवा जड असणारी जी प्रकृति तिला या साधनांचा कांहीं एक उपयोग होत नाहीं. म्हणून गौणी लक्षणा करणें अथवा मुख्यार्थाचा बाध करून 'तो पाहता झाला' या पदाचा प्रकृतीकडे विनियोग करणें हें केव्हांही योग्य नाहीं. तुम्हीं असा विनियोग करितां म्हणून तुमचें मत दूषित होतें. आमच्या मतांत दोष येत नाहीं, कारण अविद्याकालीं आम्हीं ईश्वर सर्वज्ञ असून तो कर्ता आहे असें श्रुतिबलानें निश्चित करितों. अर्थातच आम्हांला 'तो पाहता झाला' याचा मुख्य अर्थ घेतां येतो. ॥ ३ ॥

मंत्र चवथा.

**स प्राणमसृजत प्राणाच्छ्रद्धां खं वायुर्ज्योति-
रापः पृथिवीन्द्रियं मनः । अन्नमन्नाद्वीर्यं तपो मन्त्राः
कर्म लोका लोकेषु च नाम च ॥ ४ ॥**

अन्वय व अर्थ—सः प्राणं असृजत (त्यानें प्राण उत्पन्न केला) प्राणात् श्रद्धां, खं, वायुः, ज्योतिः, आपः, पृथिवी, इंद्रियं, मनः, अन्नं, अन्नात् वीर्यं, तपः, मन्त्राः, कर्म, लोकाः, लोकेषु च, नाम च ( प्राणापासून श्रद्धा, आकाश, वायु, तेज, जल, पृथिवी, इंद्रियें, मन, अन्न अन्नापासून वीर्य, तप, मंत्र, कर्मे निरनिराळीं भुवनें आणि त्यांतील नामें तो उत्पन्न करिता झाला. )

सारांश, पुरुषानें ( आत्म्यानें ) प्राण उत्पन्न केला. प्राणापासून सर्व सृष्टि उत्पन्न झाली. आणि सृष्टींतील अन्नापासून वीर्यतपादि उत्पन्न झालीं. ॥ ४ ॥

ईश्वरेणैव सर्वाधिकारी प्राणः पुरुषेण सृज्यते । कथं, स पुरुष उक्तप्रकारेणेक्षित्वा प्राणं हिरण्यगर्भाख्यं सर्वप्राणिकरणाधारमन्तरात्मानमसृजत सृष्टवान् । अतः प्राणाच्छ्रद्धां सर्वप्राणिनां शुभकर्मप्रवृत्तिहेतुभूताम् । ततः कर्मफलोपभोगसाधनाधिष्ठानानि कारणभूतानि महाभूतान्यसृजत । खं शब्दगुणम् वायुं स्वेन स्पर्शेन कारणगुणेन च विशिष्टं द्विगुणम् । तथा ज्योतिः स्वेन रूपेण पूर्वाभ्यां च विशिष्टं त्रिगुणं शब्दस्पर्शाभ्याम् । तथाऽपो रसेन गुणेनासाधारणेन पूर्वगुणानुप्रवेशेन च चतुर्गुणाः । तथा गन्धगुणेन पूर्वगुणानुप्रवेशेन च पञ्चगुणा पृथिवी । तथा तैरेव भूतैरारब्धमिन्द्रियं द्विप्रकारं बुद्ध्यर्थं कर्मार्थं च दशसंख्यम् । तस्य चेश्वरमन्तःस्थं संशयसंकल्पलक्षणं मनः । एवं प्राणिनां कार्यं कारणं च सृष्ट्वा तत्स्थित्यर्थं व्रीहियवादिलक्षणमन्नम् । ततश्चाद्यमानाद्वीर्यं सामर्थ्यं बलं सर्वकर्मप्रवृत्तिसाधनम् । तद्वीर्यवतां च प्राणिनां तपो विशुद्धिसाधनं संकीर्यमाणानां, मन्त्रास्तपोविशुद्धान्तर्बहिःकरणेभ्यः कर्मसाधनभूता ऋग्यजुःसामाथर्वाङ्गिरसः । ततः कर्माग्निहोत्रादिलक्षणम् । ततो लोकाः कर्मणां फलम् । तेषु च सृष्टानां प्राणिनां नाम च देवदत्तो यज्ञदत्त इत्यादि । एवमेताः कलाः प्राणिनामविद्यादिदोषबीजापेक्षया सृष्टास्तैमिरिकदृष्टिसृष्टा इव द्विचन्द्रमशकमक्षिकाद्याः स्वप्नदृक्सृ-

**एवं इव च सर्वपदार्थाः पुनस्तस्मिन्नेव पुरुषे प्रलीयन्ते हित्वा नामरूपादिविभागम् ॥ ४ ॥**

सिद्धान्ती—जणुकाय ईश्वरानें ( ईश्वरीपुरुषानें ) सर्वांवर सत्ता चालविणारा जो प्राण त्याला उत्पन्न केलें. अर्थातच हें अविद्येचें कार्य आहे.

शिष्य—तें कसें? उत्पत्तिक्रम कसा?

सिद्धान्ती—मागील मन्त्रांत सांगितल्याप्रमाणें 'तो पाहता झाला' आणि पाहून ईश्वरानें हिरण्यगर्भ नामक प्राणाला उत्पन्न केलें. हा प्राण म्हणजे समष्टि प्राण असून तोच सर्व प्राण्यांच्या अंतर्बाह्य इंद्रियांचा बुद्धिस्वरूप आधार आहे. या सोपाधिक हिरण्यगर्भापासून सर्व प्राण्यांच्या मध्यें विद्यमान असणारी श्रद्धा उत्पन्न झाली.

शिष्य—श्रद्धा म्हणजे शुभकर्म करण्याची प्रवृत्ति उत्पन्न करणारें साधन होय?

सिद्धान्ती—होय. नंतर कर्मफळाचा उपभोग घेण्यासाठीं जीं साधनें असावीं लागतात, त्याचें अधिष्ठान असणारीं पंचमहाभूतें उत्पन्न झालीं.

शिष्य—पंचभूतें म्हणजे, आकाश, वायु, तेज, जल आणि पृथ्वी हीं होत.

सिद्धान्ती—होय. पण शब्द हा आकाशाचा गुण आहे. वायूच्या ठिकाणीं शब्द आणि स्पर्श हे दोन गुण दिसतात. त्यापैकीं स्पर्श हा वायूचा गुण आहे आणि शब्द हा गुण वायूनें आपल्या कारणापासून म्हणजे आकाशापासून घेतला. तेजाचा गुण रूप आहे पण त्याच्या ठिकाणीं शब्द आणि स्पर्श हे दोन गुण आकाश आणि वायु या त्याच्या कारणापासून मिळाले. याचप्रमाणें जलाला रसासह पूर्वींचे तीन गुण मिळाले आणि पृथ्वीला गंधासह आपल्या कारणाचे चार गुण मिळाले. याप्रमाणें आकाशापासून वायु, वायूपासून तेज, तेजापासून जल व जलापासून पृथ्वी उत्पन्न झाली. पृथ्वीला पांच गुण आहेत. जलाला चार आहेत. इत्यादि विस्तार करण्याचें आतां कारण नाहीं. याचप्रमाणें निरनिराळ्या या पंच-महाभूतापासून ज्ञानेंद्रियें पांच आणि कर्मेंद्रियें पांच उत्पन्न झालीं. या इंद्रियांचा स्वामी जें अंतःकरणांत राहणारें मन तें उत्पन्न झालें. मन हें संकल्पविकल्पात्मक असतें. याप्रमाणें प्राण्यांचें कार्य आणि कारण उत्पन्न करून त्यांच्या योगक्षेमासाठीं व्रीहि, यव ( तांदूळ ) इत्यादि प्रकारचें अन्न उत्पन्न झालें. नंतर भक्षण केलेल्या अन्ना-पासून बल उत्पन्न झालें. हें बल यच्चयावत् कर्मांच्या प्रवृत्तीचें साधन आहे. बलाच्या साहाय्यानें प्राणी पुण्यपापकर्मं करितात. या पुण्यपापाच्या शुद्धीकरणार्थ तप उत्पन्न केलें. तपानें शुद्ध झालेल्या अंतर्बाह्य इंद्रियांनीं सत्कर्मे करावीं एतदर्थ ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्वाङ्गिरसवेद ( अथर्ववेद ) व त्याचे मंत्र उत्पन्न झाले. नंतर अग्निहोत्रादि वैदिककर्मं उत्पन्न झालें. यानंतर कर्मफळाचा उपभोग घेण्यासाठीं भूर्भुवादि भुवनें उत्पन्न झालीं व येथें उत्पन्न झालेल्या प्राण्यांस यज्ञदत्त

देवदत्त इत्यादि ज्या नांवांनीं हाका मारतों तीं नांवें उत्पन्न झालीं. याप्रमाणें सृष्टीच्या उत्पत्तीचा क्रम आहे. असो; ह्या सोळा कला प्राण्यांच्या अविद्यादि दोष-हेतूंच्या दृष्टीनें उत्पन्न झाल्या आहेत. या सर्व कला अविद्येंतील आहेत. दृष्टीमध्यें दोष असला किंवा डोळ्यांत बोट घातलें म्हणजे एका चंद्राचे दोन चंद्र किंवा दोन मात्रा दिसतात किंवा स्वप्नांत आपल्याला अनेक पदार्थ दिसतात, त्याप्रमाणेंच ही सर्व सृष्टि मिथ्या आहे. आणि डोळ्यांत बोट घातल्यावर दिसणारे दोन चंद्र जसे बोट काढल्याबरोबर नष्ट होतात, त्याप्रमाणें पुरुषानें अविद्याकालीं उत्पन्न केलेली ही सर्व सृष्टि अविद्या संपल्याबरोबर या पुरुषामध्येंच लीन होते. नामरूपादि विभागही या सृष्टीबरोबरच ब्रह्मामध्यें नाहींसे होतात. ॥ ४ ॥

---

कथं—

सिद्धान्ती—हें कसें तें ऐक.

## मंत्र पांचवा.

**स यथेमा नद्यः स्यन्दमानाः समुद्रायणाः समुद्रं प्राप्यास्तं गच्छन्ति भिद्येते तासां नामरूपे समुद्र इत्येवं प्रोच्यते । एवमेवास्य परिद्रष्टुरिमाः षोडश कलाः पुरुषायणाः पुरुषं प्राप्यास्तं गच्छन्ति भिद्येते चाऽऽसां नामरूपे पुरुष इत्येवं प्रोच्यते स एषोऽकलोऽमृतो भवति तदेषः श्लोकः ॥ ५ ॥**

अन्वय व अर्थ—सः ( हा दृष्टान्त ऐक ) यथा इमाः स्यंदमानाः नद्यः समुद्रायणाः समुद्रं प्राप्य अस्तं गच्छन्ति तासां नामरूपे समुद्रे भिद्येते इति ( ज्याप्रमाणें या वाहणाऱ्या नद्या समुद्रापर्यंत जातात आणि त्याच्याशीं संगत झाल्यावर अस्ताला जातात, तद्रूप होतात व त्यांचीं नामरूपें भिन्न होऊन त्यांस समुद्र असें नांव प्राप्त होतें. ) एवं एव अस्य परिद्रष्टुः इमाः षोडश कलाः पुरुषायणाः पुरुषं प्राप्य अस्तं गच्छन्ति च आसां नामरूपे पुरुषे भिद्येते इति एवं प्रोच्यते ( त्याचप्रमाणें सर्व-द्रष्टया पुरुषाच्या ह्या सोळा कला पुरुषाकडे जातात, तेथें अस्त पावतात आणि त्यांचीं नामरूपें पुरुषामध्यें नाहींशीं होतात असें म्हणतां येतें. ) सः

एषः अकलः अमृतः भवति ( नंतर तो हा पुरुष निष्कल आणि अमर होतो. ) तत् एषः श्लोकः ( यासंबंधानें हा पुढील श्लोक पहा. ) ॥ ५ ॥

स दृष्टान्तः। यथा लोक इमा नद्यः स्यन्दमानाः स्रवन्त्यः समुद्रायणाः समुद्रोऽयनं गतिरात्मभावो यासां ताः समुद्रायणाः समुद्रं प्राप्योपगम्यास्तं नामरूपतिरस्कारं गच्छन्ति। तासां चास्तं गतानां भिद्येते विनश्येते ( इयतो ? ) नामरूपे गङ्गायमुनेत्यादिलक्षणे। तदभेदे समुद्र इत्येवं प्रोच्यते तद्वस्तूदकलक्षणमेवं यथाऽयं दृष्टान्तः। उक्तलक्षणस्य प्रकृतस्यास्य पुरुषस्य परिद्रष्टुः परिसमन्ताद्द्रष्टुर्दर्शनस्य कर्तुः स्वरूपभूतस्य यथाऽर्कः स्वात्मप्रकाशस्य कर्ता सर्वतस्तद्वदिमाः षोडश कलाः प्राणाद्या उक्ताः कलाः पुरुषायणा नदीनामिव समुद्रः पुरुषोऽयनमात्मभावगमनं यासां कलानां ताः पुरुषायणाः पुरुषं प्राप्य पुरुषात्मभावमुपगम्य तथैवास्तं गच्छन्ति। भिद्येते चाऽऽसां नामरूपे कलानां प्राणाद्याख्या रूपं च यथास्वम्। भेदे च नामरूपयोर्यदनष्टं तत्त्वं पुरुष इत्येवं प्रोच्यते ब्रह्मविद्भिः। य एवं विद्वान्गुरुणा प्रदर्शितकलाप्रलयमार्गः स एष विद्यया प्रविलापितास्वविद्याकामकर्मजनितासु प्राणादिकलास्वकलोऽविद्याकृतकलानिमित्तो हि मृत्युस्तदपगमेऽकलत्वादेवामृतो भवति, तदेतस्मिन्नर्थ एष श्लोकः ॥ ५ ॥

सिद्धान्ती—हा दृष्टांत पहा. ज्याप्रमाणें पृथ्वीलोकावरील या सर्व प्रवाही नद्या समुद्राकडे वाहात जातात—

शिष्य—कारण समुद्र हेंच त्यांचें शेवटचें स्थान आहे. समुद्र हेंच त्यांचें आत्मरूप आहे. त्यांचें माहात्म्य तेंच आहे.

सिद्धान्ती—होय. समुद्राजवळ गेल्यानंतर त्या अस्ताला जातात म्हणजे तद्रूप होतात आणि त्यांचें स्वतःचें नामरूप नाहींसें होतें. म्हणजे या समुद्ररूपी झालेल्या नद्यांचीं गंगा यमुनादि नावें नाहींशीं होऊन त्यांना समुद्र हें नाव प्राप्त होतें. समुद्राचें उदक हें लक्षण आहे, तसेंच यांचेंही तेंच लक्षण होतें. सारांश उपाधीनें प्राप्त झालेलें नामरूप जाऊन त्यांचें मुख्य स्वरूप त्यांस प्राप्त होतें. असो; या दृष्टांताप्रमाणें प्रस्तुत पुरुषाच्या कलांची व्यवस्था होते. पहा— आपल्या वादाचा विषय जो पुरुष आहे, त्याचें लक्षण तुम्हांस मघाशीं सांगितलें आहे. तो परिद्रष्टा म्हणजे सर्वद्रष्टा आहे. स्वरूपभूत असणारें जें दर्शन त्याचा तो कर्ता आहे.

शिष्य--म्हणजे कसें ?

सिद्धान्ती--ज्याप्रमाणें सूर्य आपल्या प्रकाशाचा कर्ता असतो त्याप्रमाणें आत्मा हा स्वरूपाचा द्रष्टा आहे. प्रकाश व सूर्य एक, याप्रमाणें आत्मा व तत्त्वरूप हीं एकच आहेत. असो, प्राणादि षोडश कलांचें वर्णन मागच्या मंत्रांत झालें आहे. नद्यांचा आत्मा जसा समुद्र तसा या कलांचा आत्मा पुरुष आहे. यांची प्रवृत्ति पुरुषाकडे जाऊन तेथें लीन होण्याची असते. या सर्व कला पुरुषापर्यंत जाऊन पोंचल्या म्हणजे त्याच्याशीं संगत होऊन त्या सर्व अस्ताला जातात, तद्रूप होतात. अथवा आपल्या नामरूपाच्या उपाधि सोडून देऊन पुरुषमय होतात. अर्थातच ह्या कलांचीं प्राणादि स्वनामें व स्वरूपें नाहींशीं होऊन ज्या तत्त्वाचा कधींही नाश व्हावयाचा नाहीं, त्या पुरुषाचें स्वरूप या कलांस प्राप्त होतें, असें ब्रह्मवेत्ते म्हणतात. याप्रमाणें ज्या धन्य पुरुषाला आचार्यांकडून ज्ञान झालें व या सोळा कलांचा प्रलय पुरुषामध्यें कसा करावा याचा मार्ग ज्याला गुरूकडून कळला, तो ह्या विद्येच्या सामर्थ्यानें आपली सर्व अविद्या व तिच्यापासून उत्पन्न होणारा काम, तज्जन्य कर्म आणि तज्जन्य प्राणादि कला या या सर्वांचा प्रविलाप करितो, या सर्व उपाधींचा नाश करितो आणि आपण स्वतः निष्कल होतो. ज्यानें आपल्या ज्ञानानें अविद्यानिर्मित कलांचा नाश केला तो पुरुष प्राणादि कलांपासून उत्पन्न होणाऱ्या मृत्यूला मारून टाकतो. सारांश जो निष्कल झाला तो अमर होतो. हाच अर्थ सिद्ध करण्यासाठीं पुढील मंत्राची योजना आहे. ॥ ५ ॥

---

## मंत्र सहावा.

**अरा इव रथनाभौ कला यस्मिन्प्रतिष्ठिताः । तं वेद्यं पुरुषं वेद यथा मा वो मृत्युः परिव्यथा इति ॥६॥**

अन्वय व अर्थ--रथनाभौ अराः इव यस्मिन् कलाः प्रतिष्ठिताः ( रथाच्या तुंबामध्यें जशा चक्राच्या सर्व अरा स्थापिलेल्या असतात, त्याप्रमाणें ज्याच्या ठिकाणीं सर्व कला स्थापित झाल्या आहेत. ) तं वेद्यं पुरुषं वेद ( त्या सर्वांनीं जाणण्यास योग्य अशा पुरुषाचें--आत्म्याचें--ज्ञान करून घ्यावें. ) यथा मृत्युः वः मा परिव्यथाः इति ( असें कीं ज्यायोगें मृत्यु तुम्हांला पुढें केव्हांही दुःख देणार नाहीं. )

सारांश आत्म्याचें पूर्ण ज्ञान करून घेतलें म्हणजे मृत्यु आपल्या यातनांस नाहींसा होतो ॥ ६ ॥

अरा रथचक्रपरिवारा इव रथनाभौ रथचक्रस्य नाभौ यथा प्रवेशितास्तदाश्रया भवन्ति यथा तथेत्यर्थः। कलाः प्राणाद्या यस्मिन्पुरुषे प्रतिष्ठिता उत्पत्तिस्थितिलयकालेषु तं पुरुषं कलानामात्मभूतं वेद्यं वेदनीयं पूर्णत्वात्पुरुषं पुरि शयनाद्वा वेद जानीयात् यथा हे शिष्या मा वो युष्मान्मृत्युः परिव्यथा मा परिव्यथयतु। न चेद्विज्ञायेत पुरुषो मृत्युनिमित्तां व्यथामापन्ना दुःखिन एव यूयं स्थ। अतस्तन्मा भूद्युष्माकमित्यभिप्रायः॥ ६॥

सिद्धान्ती—रथाच्या चकाला असणाऱ्या अरा रथचक्राच्या नाभीमध्यें (तुंबामध्यें, गडुपामध्यें) प्रवेश करून त्या तुंबाच्या आश्रयानें राहतात, त्याप्रमाणें प्राणादि कला उत्पत्ति-स्थिति-लयकालीं ज्या पुरुषाच्या आश्रयानें राहतात, तो कलांचें अधिष्ठान असणारा पुरुष समजून घेण्यास सर्वथा योग्य आहे. या पुरुषाचें ज्ञान करून घेणें अत्यंत इष्ट आहे.

शिष्य—पूर्ण आहे म्हणून यास पुरुष म्हणतात काय?

सिद्धान्ती—होय. किंवा पुरि म्हणजे शरीरांत राहून त्याचें नियमन करितो म्हणूनही त्याला पुरुष म्हणतात. आचार्य पिप्पलाद म्हणतात, हे शिष्यहो, मृत्यूची भीति नाहींशी व्हावी, मृत्यूच्या यातना आपल्यास भोगाव्या लागू नयेत, अशी जर तुमची इच्छा असेल तर आत्मस्वरूपाचें पूर्ण ज्ञान करून घ्या. तुम्हांला आतां आत्म-ज्ञान होणार आहे म्हणून मी तुम्हांस असा आशीर्वाद देतों कीं, तुम्हांला मृत्यूची बाधा व्हावयाची नाहीं. जर हें ज्ञान तुम्हांला झालें नसतें, तर मृत्युनिमित्त होणारी व्यथा तुम्हांस प्राप्त झाली असती. जो कोणी आत्मस्वरूप जाणणार नाहीं. त्याला मृत्यूचें भय असल्यामुळें तो स्वतः दुःखी असतो. असा प्रसंग आतां तुमच्यावर येणार नाहीं. ॥ ६ ॥

---

### मंत्र सातवा.

**तान्होवाचैतावदेवाहमेतत्परं ब्रह्म वेद।**
**नातः परमस्तीति ॥ ७॥**

अन्वय व अर्थ—तान् ह उवाच (आचार्य पिप्पलाद शिष्यांस म्हणाले) एतावत् एव एतत् परं ब्रह्म अहं वेद (परब्रह्माचें मला इतकेंच कायतें ज्ञान आहे.) अतः परं न अस्ति इति (आतां याच्या पलीकडे जाणण्याचें असें कांहीं उरलें नाहीं.) ॥ ७ ॥

तानेवमनुशिष्य शिष्यांस्तान्होवाच पिप्पलादः किलैतावदेव वेद्यं परं ब्रह्म वेद विजानाम्यहमेतत्। नातोऽस्मात्परमस्ति प्रकृष्-

स्मानित्यतः पितृत्वं तवास्मान्प्रत्युपपन्नमितरस्मात्। इतरोऽपि हि पिता शरीरमात्रं जनयति तथाऽपि स प्रपूज्यतमो लोके किमु वक्तव्यमात्यन्तिकाभयदातुरित्यभिप्रायः॥ नमः परमऋषिभ्यो ब्रह्मविद्यासंप्रदायकर्तृभ्यो नमः परमऋषिभ्य इति द्विर्वचनमादरार्थम्॥८॥

इति प्रश्नोपनिषदि षष्ठः प्रश्नः ॥ ६ ॥

इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यश्रीमद्गोविन्दभगवत्पूज्यपादशिष्यश्रीमच्छंकरभगवत्कृतं प्रश्नोपनिषद्भाष्यं समाप्तिमगमत् ॥

सिद्धान्ती—याप्रमाणें उपदेश समाप्त झाल्यावर त्या शिष्यांनीं काय केलें असें विचारशील तर सांगतों ऐकः ते तर कृतार्थ झाले होते. परंतु गुरुदक्षिणा देण्यास त्यांच्याजवळ कांहीं नव्हतें, असें म्हणा; किंवा गुरूंनीं जो ब्रह्मोपदेश केला त्याची किंमत कोणत्याही दक्षिणेनें पूर्ण व्हावयाची नाहीं, असें समजून म्हणा; त्यांनीं गुरुजींची पुष्पादिकांनीं व शिरसाष्टांग नमस्कार करून पादपूजा केली आणि ते म्हणालेः भगवन्, आपण आम्हांस पितृस्थानीं आहां, आपण आम्हांस ब्रह्मोपदेश करून ब्रह्मरूप केलें, विद्या देऊन ब्रह्मस्वरूपांत जन्म दिला, म्हणून आपण पितृस्थानीं आहां. आम्हांस आतां असा जन्म प्राप्त झाला आहे कीं जेथें आम्हांस नित्यत्व, अजरामरत्व व अभयत्व नित्य भोगावयास सांपडेल. आम्ही आतां ब्रह्मरूप झालों आहों. आमच्या ठिकाणीं जी अविद्या होती, जें विपरीत ज्ञान होतें आणि जिच्या योगानें जन्म, जरा, मरण, रोग, दुःखादि अविद्यासागरांतील अनेक सुसरी आम्हांस अत्यंत त्रास देत होत्या, त्या अविद्येच्या समुद्रांतून तरून जाण्याला आपण आम्हांस विद्यानौका दिली आणि अविद्यासमुद्राच्या पलीकडील तीरास नेऊन आपण आम्हांला मोक्षनगरींत प्रवेश करून दिला आहे. या सुखरूप नगरींतून बाहेर पडण्याचें, जन्ममृत्यूच्या चक्रांत सांपडण्याचें, कारणच राहिलें नाहीं. भगवन्, जन्म देणाऱ्या पितरापेक्षां अनंतपट जास्त उपकार करून जन्ममरण नाहींसें करणाऱ्या पित्याचें काय वर्णन करावें ? सामान्य पिता शरीर उत्पन्न करून देऊन जन्म देतो, तरी व्यवहारांत तो अत्यंत पूज्य मानिला जातो. आणि आपण तर आम्हांस सुखरूप दाखविलें, निर्भय केलें, तर आपली सेवा आम्ही कितीही जरी केली तरी आपले उतराई कसे होणार ! होणार नाहीं. असो. आपल्यास आम्ही पुनः एकवार नमस्कार करितों. तसेंच ब्रह्मविद्येचा संप्रदाय ज्या महर्षींनीं प्रकट केला त्यांनाही नमस्कार करितों. आणि आपणांस सर्वजण पुनः पुनः नमस्कार करितों. मंत्रांत दोन वेळ नमस्कारादि पदांचा उल्लेख आहे तो आदरासाठीं व उपनिषदाच्या समाप्तिसूचनार्थ आहे, हें तुम्हांस सांगावयास नकोच. ॥ ८ ॥

सहावा प्रश्न समाप्त.

भाष्य व भाषान्तर यांसह प्रश्नोपनिषत् समाप्त झालें.

---

## सहाव्या प्रश्नोत्तराचा सारांश.

या प्रश्नाचा विचार करताना आचार्यांनी चैतन्याच्या स्वतंत्र अस्तित्वाचा प्रश्न उत्पन्न करून बौद्ध व नैयायिक यांचें मत खोडून टाकलें आहे. त्याचा येथें थोडक्यात संग्रह करावयाचा आहे. या प्रश्नाच्या दुसऱ्या मंत्रांत आत्म्यानें (पुरुषानें) सोळा कला उत्पन्न केल्या आहेत असें सांगितलें आहे. तेव्हां एक प्रश्न सहजच असा उत्पन्न होतो कीं, निष्कल आणि निर्विकारी आत्म्याला हें कसें करता येईल? उत्पत्ति करणें म्हणजे एक प्रकारें स्थितीमध्यें काहींतरी स्थित्यंतर करणें होय. हें स्थित्यंतर परिणत होतें तें दुसऱ्या एका स्थित्यंतरानें होतें. प्रत्येक स्थित्यंतराचें कारण दुसरें स्थित्यंतर असतें. तेव्हां सहजच शंका उत्पन्न होते कीं, जेथें कधींही स्थित्यंतर होत नाहीं, तो नित्यस्वरूपी आत्मा प्राणादिप्रमुख कला उत्पन्न करितो, म्हणजे स्थित्यंतर उत्पन्न करितो, हें म्हणणें कसें संभवनीय आहे? स्वतः स्थित्यंतर शक्य नसणारा पुरुष स्थित्यंतर कसें उत्पन्न करील? या शंकेचा उलगडा करिता येत नाहीं, म्हणून कित्येक बौद्ध असें म्हणतात कीं, चैतन्य, ज्ञानरूप आत्मा, ज्ञान, प्रतिक्षणीं उत्पन्न होतें व नाहींसें होतें. कित्येक असें म्हणतात कीं, सर्वच शून्याकार आहे. तिसरे असें म्हणतात कीं, आत्मा नित्य आहे, पण त्याचें चैतन्य अनित्य आहे, आणि चौथे प्रतिपक्षी असा सिद्धांत लावतात कीं, चैतन्य हें स्थूलशरीराचा एक धर्म आहे. अस हे निरनिराळे पक्ष आहेत यावर उत्तर देताना आचार्य श्रुतीचा आधार घेऊन असा अनुवाद करितात कीं, चैतन्य हें सत्य, ज्ञान आणि आनंदरूप आहे. तें केव्हांही उत्पन्न होत नाहीं किंवा अस्ताला जात नाहीं. आपल्याला ज्या ज्या वेळीं चैतन्यव्यतिरिक्त पदार्थांचें ज्ञान होतें त्या त्या वेळीं तें चैतन्य तेथेंही हजर असतें. विषयाच्या स्वरूपाचा व्यभिचार होईल, पण ज्ञानाच्या स्वरूपांत केव्हांही व्यभिचार होणें शक्य नाहीं. ज्ञानस्वरूपाचें अस्तित्व नाहीं, असें केव्हांही होत नाहीं. एक पदार्थ जाऊन त्याच्याजागीं दुसरा पदार्थ येईल, घट नाहींसा होऊन त्याच्या जागीं पेरू येईल व यावेळीं घटाचें ज्ञान नष्ट होऊन पेरूचें ज्ञान उद्भव होईल म्हणजे विषयानुसार विषयज्ञान (विशेष ज्ञान) बदलेल, पण ज्ञानच नाहीं, अशी वेळ केव्हांही येणार नाहीं. निद्रेच्या अवस्थेंत ज्ञान नसतें, याचें कारण त्या वेळीं विषयप्रकाश करणाऱ्या ज्ञानाला प्रकाशित होऊं देणारा विषय नसतो, म्हणून ज्ञानाचें भान होत नाहीं. पदार्थांचें प्रतिबिंब घेणाऱ्या आरशामध्यें पदार्थांच्या अभावीं प्रतिबिंब पडत नाहीं, म्हणून तेथें आरसा नाहीं असें होत नाहीं. याचप्रमाणें ज्ञानाचा अभाव केव्हांही असत नाहीं. विषय नसतील तर विषयाच्या अभावाचें ज्ञान तरी आपल्यास असतेंच. यावरून चैतन्य प्रतिक्षणीं उत्पन्न होतें, किंवा तें मुळींच असत नाहीं, असें म्हणणारे बौद्ध, तसेंच चैतन्य हा स्थूलाचा

धर्म आहे असें म्हणणारे नास्तिक असत्य सिद्धांताचें मंडन करितात, हें सिद्ध होतें. निद्रादशेमध्येंसुद्धा चैतन्य जागृत असतें आणि तें सुखाचा अनुभव घेतें, असा सार्वत्रिक अनुभव आहे. तसेंच, सर्व देशीं व सर्व कालीं जीवाचें ज्ञान एकरूप असतें. विषयभेदामुळें विशेषज्ञान भिन्नभिन्न होतें हें खरें, पण सामान्य ज्ञान एकस्वरूपाचें असतें व तें स्वयंभू व अपरिच्छिन्न असतें. विशेष ज्ञान उत्पन्न होणें, ज्ञानस्वरूपात स्थित्यंतर होणें, ही केवळ अज्ञानी जिवाच्या अज्ञानविलासाची लीला आहे. या अज्ञानामुळें 'ज्ञान उत्पन्न होतें. ज्ञानाला अस्तित्वच नाहीं. ज्ञान हा जीवाचा एक धर्म आहे. व ज्ञान हा स्थूलाचा धर्म आहे.' अशा प्रकारच्या भ्रांति उत्पन्न होतात; पण त्या भ्रांतिस्वरूपच आहेत असें श्रुति सांगते, युक्ति ठरविते आणि अनुभवानें सिद्ध होतें. म्हणून ज्ञान हीच कायती सत्यवस्तु आहे. असें श्रीमद् आचार्यांचें म्हणणें आहे.

तिसऱ्या मतात सृष्टीची उत्पत्ति ज्ञानपूर्वक झाली आहे असें श्रुतीनें सांगितलें आहे. सांख्य सिद्धांताला हें म्हणणें पसत नाहीं. त्यांच्या मतें आत्मा (ज्ञान) हा भोक्ता मात्र आहे आणि सर्वकर्तृत्व प्रधानाकडे (प्रकृतीकडे) आहे. वेदांत सिद्धांतात असें म्हटलेलें असतें कीं, परमार्थतः आत्मा कर्ताही नाहीं व भोक्ताही नाहीं; पण व्यवहारात मात्र आत्म्यावर कर्तृत्वभोक्तृत्वाचा आरोप करून सृष्टीची व्यवस्था उलगडून घ्यावी लागते. सांख्य लोक असें म्हणतात कीं, 'ज्ञानी आत्मा आपल्या स्वतःस दु:खामध्यें कसा लोटील? जीवात्म्याला सुखाप्रमाणेंच दुःख होतें, हा अनुभव प्रत्यक्ष आहे. कोणीही शहाणा पुरुष आपल्यावर दुःखाचे प्रसंग केव्हांही आणणार नाहीं. सुखाचेच प्रसंग तो सदैव उत्पन्न करीत राहील, पण सुख न चालू राहतां दुःख उत्पन्न होतें. यावरून आत्मा हा कर्ता नसून निव्वळ भोक्ता आहे. कर्तृत्व दुसरीकडे म्हणजे प्रधानाकडे आहे.' असें सांख्य मतानें ठरतें. शिवाय त्यांचें दुसरें असें म्हणणें आहे कीं, आत्मा जर परमार्थतः एकच वस्तु आहे, तर त्याला दुसरी वस्तु कधी उत्पन्न करितां येईल? येणार नाहीं. म्हणून आत्मा कर्ता नाहीं. या सांख्यांच्या सिद्धांताविरुद्ध आचार्य असा प्रति प्रश्न करितात कीं, जर 'पुरुष' हा केवळ ज्ञानरूप आहे म्हणजे अविकारी आहे तर त्याला सुखदु:खादिकांचे भोग तरी कसे उत्पन्न होतात? अविकारी आत्म्याला भोक्तृत्व असतें, हें म्हणणें जर सांख्यास सयुक्तिक वाटतें तर वेदांनिष्ठ लोकांनीं श्रुतीच्या आधारानें आत्मा हा व्यवहारकालीं कर्ता व भोक्ता असतो असें म्हटलें तर काय दोष उत्पन्न होतो? बोलून चालून व्यवहार हा मायेचा विलास आहे. शिवाय आत्म्याच्या पारमार्थिक स्वरूपात या मायेच्या क्रीडेनें यत्किंचितही स्थित्यंतर होत नाहीं. हे सिद्धांत श्रुतीच्या आधारानें प्रतिपादन करणारा वेदांती हा अविकारी आत्म्यास परमार्थतः विकार उत्पन्न होतो, असें म्हणणाऱ्या सांख्यापेक्षा अनंतपट श्रेष्ठ होय. पुनः आचार्य असें विचारतात कीं, भोक्तृत्व आणि कर्तृत्व या दोन विकारांत असा कोणता विशेष आहे कीं, आत्म्यानें

भोक्तृत्व मात्र स्वीकारावें आणि त्याच्या ठिकाणीं कर्तृत्वाचा गधही असू नये ! विकारच कबूल करावयाचा तर मग तो भोक्तृत्वाचा मात्र करावा, कर्तृत्वाचा करू नये असें म्हणण्यास कांहींएक कारण नाहीं. वरें पुरुष स्वभावतःच भोक्तृत्वानें विकारी व्हावयाचा असेल तर मग (सुखदुःख सोडा, सर्व भोगविषयीं उदासीन रहा, असें सांगणाऱ्या) सांख्य शास्त्राचा उपयोगच नाहींसा होतो. वेदांतशास्त्रांत ' कर्तृत्व भोक्तृत्व हें अज्ञानानें उत्पन्न होतें. स्वभावतः आत्मा अकर्ता आणि अभोक्ता आहे यासाठीं अज्ञान टाकून देऊन ज्ञानाचा स्वीकार करा ' असें सांगितलें आहे. येथें अज्ञानकालीं वेदांत–शास्त्राचा उपयोग आहे तसा सांख्य शास्त्राचा उपयोग होणें शक्य नाहीं. कारण, तें शास्त्र सर्व गंभीरतेने असें सांगतें कीं, आत्मा [illegible] स्वभावतः भोक्ता आहे. भोक्तृत्व सुटावयाचेंच नाहीं तर सांख्य शास्त्राचा कांहीं उपयोग नाहीं हें अगदीं उघड आहे. असो, ईश्वरानें ज्ञानपूर्वक सृष्टि उत्पन्न केली, असें व्यवहारकालीं गृहीत घ्यावें लागतें. हेंच श्रुतीचेंही म्हणणें आहे. बाकीचे मत्र आचार्यांनीं स्पष्ट केले आहेत, तेव्हां त्यांच्यावर जास्त विस्तारानें लिहिण्याचें कांहींएक प्रयोजन नाहीं.

---

# प्रश्नोपनिषत्.

## संपादकाचें विवरण.

ॐ तत्सद्ब्रह्मणे नमः

ॐ भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवाः ।
भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः ।
स्थिरैरङ्गैस्तुष्टुवा*ँ*सस्तनूभिः ।
व्यशेम देवहितं यदायुः ॥

ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ।

अन्वय व अर्थ—देवाः कर्णेभिः भद्रं शृणुयाम ( हे देवहो, आम्हाला आमच्या कानानी मंगळशब्द ऐकू द्या ) यजत्राः अक्षभिः भद्रं पश्येम ( हे याज्ञिकहो, आम्हाला डोळ्यांनी मंगळ बघू द्या ) स्थिरैः अङ्गैः तनूभिः तुष्टुवांसः ( आमच्या स्थिर अवयवांच्या शरीरानीं आम्हीं स्तुति करणारे आहों. ) यत् आयुः देवहितं व्यशेम ( जोंपर्यंत आम्हास आयुष्य आहे तोंपर्यंत आम्हीं देवहितच करीत राहू. )

तात्पर्य आपल्या हातून सर्वदा मंगळ गोष्टी होऊं देण्याविषयीं परमेश्वराची प्रार्थना या शान्तिपाठांत केली आहे.

शान्तिः शान्तिः शान्तिः

### मंत्र पहिला.

ॐ सुकेशा च भारद्वाजः शैब्यश्च सत्यकामः सौर्यायणी च गार्ग्यः कौसल्यश्चाऽऽश्वलायनो भार्गवो वैदर्भिः कबन्धी कात्यायनस्ते हैते ब्रह्मपरा ब्रह्मनिष्ठाः परं ब्रह्मान्वेषमाणा एष ह वै तत्सर्वं

वक्ष्यतीति ते ह समित्पाणयो भगवन्तं पिप्पलाद्-
मुपसन्नाः ॥ १ ॥

अन्वय व अर्थ—भारद्वाजः सुकेशा च शैब्यः सत्यकामः च सौर्यायणी गार्ग्यः च आश्वलायनः कौसल्यः च वैदर्भिः भार्गवः च कात्यायनः कबन्धी ह एते ब्रह्मपराः ब्रह्मनिष्ठाः परं ब्रह्म अन्वेषमाणाः समित्पाणयः भगवन्तं पिप्पलाद्–उपसन्नाः ( भरद्वाज कुळातील सुकेशा, शिबीचा पुत्र सत्यकाम, सूर्याचा नातू गार्ग्यनामक सौर्यायणी, अश्वलाच्या कुळातील कौसल्य, विदर्भ देशातील भार्गव, आणि कात्यायन कुळातील कबधी हे सर्व सहाजण वेदपरायण आणि वेदनिष्ठ ब्राह्मण होते. आपल्यास परब्रह्माचें स्वरूप समजावें अशी इच्छा धरून ते त्या परब्रह्माचा शोध करीत हिंडत होते. नंतर ते हातात समिधा घेऊन सुप्रसिद्ध पिप्पलाद नावाच्या आचार्याकडे आले ). एषः ह वै तत्सर्वं वक्ष्यति इति ( कारण परब्रह्माचें सत्स्वरूप पिप्पलाचार्य मुनि सांगण्यास समर्थ आणि उत्सुक आहेत असें त्यांस समजलें होतें. ) ॥ १ ॥

सुकेशादि सहा विद्यार्थ्यांनी वेदाचें यथाशास्त्र आणि यथाविधि अध्ययन केलें होतें. अध्ययन संपूर्ण झाल्यावर त्यांस अशी इच्छा झाली कीं, आपण परब्रह्माचें स्वरूप समजून घ्यावें. नंतर ते सर्वजण सुप्रसिद्ध व ब्रह्मनिष्ठ पिप्पलादाचार्यांस शरण गेले आणि त्यांनी ब्रह्मज्ञानाविषयींची आपली इच्छा प्रकट केली. जातांना ते हातात समिधा घेऊन गेले होते. समिधा घेऊन जाणें हें एक उपलक्षण आहे. देवाचें, गुरूचें अथवा राजाचें दर्शन रिक्त हस्तानें घेऊं नये, कांहींतरी घेऊन जावें, असा पूर्वकालीन संप्रदाय असे. ऋषीत सांगितलेली मंडळी दरिद्री होती म्हणून त्यांनी भेट म्हणून समिधा आणिल्या होत्या. समिधांचा उपयोग यज्ञकर्मात होत असे, तसेंच दंतधावन करण्यामधेंही त्याचा उपयोग करीत असत. समिधा घेऊन जाणें हें वैराग्यचिन्हही आहे. .असो, ज्या कुळात किंवा ज्या गोत्रांत पुरुष उत्पन्न झाला असेल त्या कुळाच्या नावावरून पुरुषाच्या नावाचा पूर्वीही उल्लेख होत असे. हल्लीं गोत्रनाम मागें पडून आडनांव उत्पन्न झालें आहे. हें आडनाव गावावरून, धंद्यावरून किंवा एखाद्या विशेष गुणावरून ठरत असतें, हें सुप्रसिद्ध आहे.

वेदाध्ययन सांगोपांग झाल्यावर उपनिषदांचा ( ब्रह्मविद्येचा ) अभ्यास करण्याची ही पूर्वं पद्धति होती. ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**तान्ह स ऋषिरुवाच भूय एव तपसा ब्रह्मचर्येण श्रद्धया संवत्सरं संवत्स्यथ यथाकामं प्रश्नान्पृच्छत यदि विज्ञास्यामः सर्वं ह वो वक्ष्याम इति॥२॥**

अन्वय व अर्थ—सः ऋषिः तान् उवाच ह ( पिप्पलाद ऋषि या विद्यार्थ्यांस म्हणाले, ) भूयः एव तपसा, ब्रह्मचर्येण, श्रद्धया, संवत्सरं संवत्स्यथ, यथाकामं प्रश्नान् पृच्छत; यदि विज्ञास्यामः सर्वं वः वक्ष्यामः इति ह ( पुनः तुम्ही श्रद्धापूर्वक एक वर्षपर्यंत ब्रह्मचारी व्रतांत राहून तपश्चर्या करित रहा. नंतर तुमच्या इच्छेप्रमाणें तुम्ही मला प्रश्न विचारा आणि मला जें काय ठाऊक आहे तें सर्व त्यावेळीं मी तुम्हास सांगेन.) ॥ २ ॥

वेदाचें सांगोपांग अध्ययन करण्यावर मनास गुरूला शरण जावें, त्याची सेवा करावी, त्याच्या आज्ञेप्रमाणें काही काल एक-निष्ठ ब्रह्मचर्यामध्यें घालवावा, तपश्चर्या करावी, आणि सदैव आस्तिक्य बुद्धि असावी, हे नियम पूर्व काळीं शिष्यास पाळावे लागत असत. विद्यार्थ्यांला वेदाविषयीं पूर्ण श्रद्धा, कडकडित ब्रह्मचर्य, एकनिष्ठेनें विचार करण्याचें सामर्थ्य व शीतोष्णादि सहन करण्याचें बल, इत्यादि गुण पूर्व काळीं जसे अवश्य होते तसे आज भितीळादी आहेत. ज्या शास्त्राचा आपण अभ्यास करणार व जें शास्त्र समजून घेणार त्याविषयीं आपला आदर बुद्धि प्रखर असली पाहिजे. अभ्यास करताना विचार करण्याचें सामर्थ्य वृद्धिंगत होत आण्याइतकें देहाचें संरक्षण करावयाचें, अशा प्रकारचे नियम विद्यार्थ्यांनीं अवश्य पाळले पाहिजेत. हेंच ब्रह्मचर्य व्रत होय. पूर्वी ब्रह्मचर्यांचे नियम किती कडक असत, याचा प्रत्यय भारत भागवतादिकांच्या परिशीलनानें सहज येणार आहे. असो. पिप्पलाद मुनींनीं विद्यार्थ्यांची जिज्ञासा किती उत्कट आहे हें पाहण्यासाठीं त्यांस तपश्चर्या करावयास सांगितलें आणि शेवटीं विनयानें असें म्हटलें कीं, मला जें काय येत असेल त्याप्रमाणें मी तुमच्या सर्व प्रश्नाचीं उत्तरें देईन. हा शुद्ध विनय आहे. असो; विद्येनें मनुष्य विनीत अथवा मर्यादशील होतो, असा पूर्वींचा व हल्लींचा अनुभव आहे. ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**अथ कबन्धी कात्यायन उपेत्य पप्रच्छ।**
**भगवन्कुतो ह वा इमाः प्रजाः प्रजायन्त इति ॥३॥**

अन्वय व अर्थ—अथ कात्यायनः कबन्धी उपेत्य पप्रच्छ ( नंतर—एकवर्ष झाल्यानंतर—कबन्धी कात्यायन आचार्यांच्या जवळ जाऊन नम्रपणानें विचारता झाला ) भगवन् कुतः ह वै इमाः प्रजाः प्रजायन्ते इति ( भगवन्, या सर्व प्रजा कोठून व कशा उत्पन्न होतात, हें मला समजत नाहीं. कृपा करून आपण या प्रश्नाचें उत्तर सांगावें. ) ॥ ३ ॥

कबंधीचा प्रश्न परब्रह्माविषयी नाहीं, हें वाचकांस सहज समजण्यासारखें आहे. वेदविहित कर्मांनें व सामान्यतः दृश्य सृष्टीच्या ज्ञानानें काय फल प्राप्त होतें हें कबंधीला प्रमुखत्वानें विचारावयाचें आहे. सारांश अपरविद्या ( कर्मी भेद असणारी विद्या ) व तद्विहित कर्म यांचें फल काय होतें, हें कबंधीस विचारून घ्यावयाचें आहे. हें विचारण्याचा इत्यर्थ इतकाच आहे कीं पराविद्येला ( ब्रह्मविद्येला ) अवश्य असणारें जें वैराग्य तें अपरविद्येच्या ज्ञानानें अथवा तद्विहित कर्मांनें किंवा या उभयतांच्या समुच्चयानें प्राप्त व्हावें. अपर विद्या व तद्विहित कर्म हीं उभयताही सांग संपादन केलीं तरच दृश्य सृष्टीची विफलता पूर्णत्वानें समजून येते आणि व्यवहारांतील ज्ञानाविषयीं, त्याच्या स्थैर्याविषयीं व व्यवहाराच्या सुखदुःखाविषयीं विराग उत्पन्न होऊन सच्चिदानंदप्राप्तीविषयीं उत्कट अनुराग प्राप्त होतो.

याप्रमाणें वेदाचें अध्ययन, व्यावहारिक शास्त्राचें अध्ययन, कर्मफलाचें ज्ञान, उपासना, इत्यादि गोष्टी संपादित झाल्या तरच जीवाला ब्रह्मविद्येचा अधिकार प्राप्त होतो. हा पूर्वीचा नियम ध्यानांत ठेवण्यासारखा आहे. दृश्यसृष्टीचा ज्ञानपूर्वक अनुभव घेऊन तिच्याविषयीं उत्कट वैराग्य प्राप्त झाल्याशिवाय ब्रह्मविद्येमध्यें प्रवेश करणें हें अनर्थमूलक आहे, असा पूर्वकालीन समज होता. असो; कबंधीचा प्रश्न वैराग्य उत्पन्न करण्याविषयींचा आहे, इतकें ध्यानांत राहिलें म्हणजे काम झालें. ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

तस्मै स होवाच प्रजाकामो वै प्रजापतिः स तपोऽतप्यत । स तपस्तप्त्वा स मिथुनमुत्पादयते । रयिं च प्राणं चेत्येतौ मे बहुधा प्रजाः करिष्यत इति ॥ ४ ॥

अन्वय व अर्थ—तस्मै सः उवाच ह ( पिप्पलाद मुनींनी कबंधीला उत्तर दिलें तें असें— ) प्रजापतिः वै प्रजाकामः; सः तपः अतप्यत; सः

तपः तप्त्वा; सः मिथुनं उत्पादयते; रयिं च प्राणं च इति; एतौ मे बहुधा प्रजाः करिष्यतः इति ( प्रजा उत्पन्न करावी अशी एकदां हिरण्यगर्भ नामक प्रजापतीला इच्छा उत्पन्न झाली. त्यानें पुष्कळ तप केलें; म्हणजे कार्यकारणांचा समग्र विचार केला. हा विचार केल्यानंतर त्यानें एक मिथुन उत्पन्न केलें. तें मिथुन म्हणजे रयि—अन्न—आणि प्राण हें होय. हें मिथुन उत्पन्न करण्यांत त्याचा हेतु असा होता, कीं यांच्या द्वारानें अनेक प्रकारची प्रजा उत्पन्न होईल. )

कबंधीच्या प्रश्नास पिप्पलादांनीं हें उत्तर दिलें आहे: प्रजापति म्हणजे सर्व जीवाचा आत्मा होय. त्याचें संरक्षण करणाराही हाच आहे. म्हणून याला चराचराचा पति असें म्हणतात. या प्रजापतीनें, हिरण्यगर्भानें, पूर्व कल्पांतील कार्य—कारणांचा विचार केला आणि अन्न व प्राण असें एक मिथुन उत्पन्न केलें. अन्न म्हणजे उपभोग्य पदार्थ होत. आपल्यास जी जड सृष्टि दिसते तिचा अंतर्भाव अन्नांत होतो. ही सृष्टि उपभोग्य आहे. इच्यामध्यें स्वतःचें कर्तृत्व अथवा कर्तृत्वाचा आभासही नाहीं. पण प्राण हा चरात्मक ( जीवात्मक ) असून तो जड सृष्टीचा उपभोक्ता असतो. हा कर्तृत्ववान् आहे. निदान आपण कर्ते आहोंत असा आभास तरी त्याला आहे. याप्रमाणें उपभोग्य वस्तु आणि उपभोक्ता, कार्य करण्याचें उपादान कारण आणि कर्म—कर्ता अथवा कार्याचें निमित्त कारण, अशी हीं द्वयी उत्पन्न झाली. अलीकडच्या भाषेत बोलावयाचें म्हणजे प्रजापतीनें प्रथमतः Matter आणि Force हीं दोन मूलद्रव्यें उत्पन्न केलीं. या दोहोंच्या साहाय्यानें ही अनेकविध सृष्टि उत्पन्न झाली आहे. ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा.

**आदित्यो ह वै प्राणो रयिरेव चन्द्रमा रयिर्वा एतत्सर्वं यन्मूर्तं चामूर्तं च तस्मान्मूर्तिरेव रयिः ॥५॥**

अन्वय व अर्थ—आदित्यः ह वै प्राणः, चन्द्रमाः रयिः एव, ( आदित्य हा प्राण आहे आणि चन्द्र हा रयि म्हणजे अन्न आहे. ) एतत् सर्व—यत् मूर्तं च अमूर्तं च—रयिः वै ( जें काहीं मूर्त आणि अमूर्त आहे तें सर्व रयि आहे. ) तस्मात् मूर्तिः रयिः एव ( म्हणून जी जी म्हणून मूर्त वस्तू आहे ती सर्व रयीमध्यें अंतर्भूत होते. )

मागच्या मंत्रांत सांगितल्याप्रमाणें प्राण आणि रयि यांची उत्पत्ति झाली म्हणजे प्रथमतः सूर्य आणि चंद्र यांची उत्पत्ति प्रजापतीनें केली. सूर्य हा प्राणाचा

निधि आहे. सूर्यापासून सर्व सामर्थ्यांची उत्पत्ति होते. चंद्र हा रयीचा म्हणजे अन्नाचा प्रतिनिधि आहे. चंद्र म्हणजे सोम आणि सोम हें द्रव्य अन्नाचें संपादक आहे, असा वेदकालीन समज होता. सूर्यचंद्राची उत्पत्तिकथा सांगितल्यावर पिप्पलाद मुनींनीं सर्व सिद्धांतांचा संग्रह करणारें एक विधान केलें आहे. तें असें: या विश्वांत जी जी म्हणून मूर्त किंवा अमूर्त वस्तु दिसते किंवा भासते, इंद्रियगोचर होते, किंवा कल्पनागोचर होते, ती ती प्रत्येक वस्तु अन्नरूपीच आहे. उत्पन्न झालेली अशी कोणतीही मूर्त किंवा अमूर्त वस्तू नाहीं कीं, जिचा भोक्ता या विश्वांत विद्यमान असत नाहीं. वायूसारख्या अमूर्त वस्तूचे हे भोक्ते हिरण्यगर्भानें निर्माण केले आहेत. सारांश सर्व उत्पन्न झालेल्या वस्तु उपभोग्य आहेत. अर्थात् ज्या मूर्त वस्तु आहेत त्या सर्व उपभोग्य आहेत हें सांगावयास नकोच आहे.

या मंत्रावरून असें स्पष्ट होतें कीं जड आणि साकार वस्तु ह्या तर उपभोग्य आहेतच; पण आकार नसणाऱ्या वस्तु सुद्धां उपभोग्य आहेत. सारांश सर्व उत्पन्न झालेल्या अथवा प्रजापतीनें उत्पन्न केलेल्या वस्तु उपभोग्य आहेत. म्हणजे परतंत्र आहेत अथवा नश्वर आहेत. हें समजलें असतां जीवाची प्रवृत्ति या उपभोग्य वस्तूकडे न होतां केवळ चिद्घन जो स्वतंत्र आत्माराम त्याकडे मात्र व्हावी.

सूर्य हा सर्व सामर्थ्यांचे आदिस्थान आहे, ही गोष्ट आधुनिक–शास्त्र–सिद्धांतांनीं ही सिद्ध झाली आहे. गवताच्या काडींतील चलनवलनापासून तों मोठमोठ्या भूकंपासारख्या प्रसंगापर्यंतच्या अथवा ग्रहादिकांच्या परिभ्रमणापर्यंतच्या सर्व गति सूर्यापासून उत्पन्न होतात. उष्णता, शब्द, प्रकाश, चुंबकत्व ( Heat, Sound, Light, Magnetism ) इत्यादि सर्व गतींचा उत्पादक एक सूर्य मात्र आहे ही कल्पना वेदकालीन शास्त्र्यांप्रमाणें अलीकडील आधुनिक शास्त्र्यांसही मान्य झाली आहे. याचप्रमाणें चंद्र हा परतंत्र व परप्रकाश असून जड आहे; या वेदकालीन सिद्धांताला अलीकडील शास्त्रांनीही दुजोरा दिला आहे. म्हणून मंत्रामध्यें सूर्याला प्राणाचें प्रतिनिधित्व आणि चंद्राला अन्नाचें प्रतिनिधित्व दिलें आहे. प्राण आणि अन्न मिळून जें मिथुन होतें तें सर्वदां एकत्र अथवा सहचारी असतें. प्राणाशिवाय अन्न विद्यमान असणें शक्य नाहीं. व अन्नाशिवाय प्राणालाही दुसरी कोणती गति नाहीं. म्हणून अन्न व प्राण यांस मिथुन ( मेहूण ) ही संज्ञा प्राप्त झाली आहे. तसेंच सापेक्ष दृष्टीनें पाहतां प्रत्येक वस्तु अन्नांत अन्तर्भूत होते. व निरपेक्ष दृष्टीनें पाहिलें असतां मूर्त वस्तुही अन्नमयच असते. ॥ ५ ॥

## मंत्र सहावा.

**अथाऽऽदित्य उदयन्यत्प्राचीं दिशं प्रविशति तेन प्राच्यान्प्राणान्रश्मिषु संनिधत्ते। यद्दक्षिणां यत्प्रतीचीं यदुदीचीं यदधो यदूर्ध्वं यदन्तरा दिशो यत्सर्वं प्रकाशयति तेन सर्वान्प्राणान्रश्मिषु संनिधत्ते॥ ६॥**

अन्वय व अर्थ—अथ आदित्यः उदयन् प्राचीं दिशं प्रविशति ( आदित्य म्हणजे सूर्य उगवल्यानंतर पूर्व दिशेमध्यें प्रवेश करितो. ) तेन रश्मिषु प्राच्यान् प्राणान् संनिधत्ते ( आणि आपल्या उगवण्यानें आपल्या तेजोयुक्त किरणांत पूर्वेकडील प्राणांस अंतर्भूत करितो. ) यत् दक्षिणाम्, यत् प्रतीचीं, यत् उदीचीं, यत् अधः, यत् ऊर्ध्वं, यत् अंतरा दिशः यत् सर्वं प्रकाशयति, तेन रश्मिषु सर्वान् प्राणान् संनिधत्ते ( आणि दक्षिण, पश्चिम, उत्तर, अधोदिशा, ऊर्ध्वदिशा, अवांतरदिशा आणि बाकीच्या सर्व वस्तु ज्या पद्धतीनें तो प्रकाशित करितो त्याच पद्धतीनें आपल्या सर्व-व्यापी व सर्व-प्रकाशक किरणांमध्यें सर्व प्राणांस अंतर्भूत करून स्वस्वरूपी करितो. )

मागच्या मंत्रांत वर्णनयावत् सर्व मूर्त आणि अमूर्त वस्तु अन्नरूप असून सर्वात्मक आहेत आणि त्यांचा स्वामी प्रजापति आहे असें सांगितलें आहे. ह्या मंत्रांत प्रजापतीच्या अपेक्षेनें सर्व प्राण ही सर्वात्मक आहेत, सर्वत्र प्राणद्रव्य ओतप्रोत भरलें आहे, सर्व चैतन्यमय आहे, असें सांगावयाचें आहे. सर्व प्राणांस प्रकाशित करणारा सूर्य उगवला म्हणजे दाही दिशा व तत्रस्थ प्राण प्रकाशित होतात. सर्व वस्तूंस त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें चैतन्य प्राप्त होतें. कांहीं दगडासारख्या वस्तु बाहेरून वाढणाऱ्या, वृक्षासारख्या आंतून वाढणाऱ्या वस्तु पशुपक्ष्यादि चलन वलन करणारे प्राणी, मन, बुद्धि, आणि इच्छा असणारे ह्या लोकांचे मनुष्यप्राणी ह्या सर्वांमध्यें जी चेतना आणि जें चैतन्य प्रकट होतें तें सर्व सूर्याच्या प्रसादामुळें होय. असा कोणताही मूर्त अथवा अमूर्त पदार्थ नाहीं कीं, जो सूर्याच्या प्रकाशानें व सूर्यगत चैतन्यानें प्रकाशित होत नाहीं, स्वस्थितींत राहत नाहीं आणि चैतन्ययुक्त असत नाहीं. यावरून हें स्पष्ट होईल कीं या दृश्य विश्वामध्यें सर्वत्र रयि म्हणजे अन्न म्हणजे भोग्य वस्तु ( Matter ) असून तेथेंच प्राण, म्हणजे चेतना, म्हणजे उपभोक्ता, ( Force ) विद्यमान असतो. सर्व वस्तु अन्नमय आहेत व त्याच वस्तु प्राणमयही आहेत. प्रो. हक्सले यांनी आपल्या जगन्मान्य ग्रंथांत प्राणाचें अस्तित्व अनुमानिलें आहे व आर्यऋषींनां-

चीज प्रो. बोस यांनीं जडवस्तुही विश्रांतीची इच्छा करितात, असें सप्रमाण सिद्ध केलें आहे. ह्या गोष्टी तज्ज्ञांस विदित आहेत. या सिद्धांताचा मूळ आदर्श प्रश्नोपनिषदांत सांपडतो, असें आपल्यास माहित झालें तर आपल्यास केवढा सकौतुक आनंद व अभिमान होईल बरें ! ॥ ६ ॥

---

### मंत्र सातवा.

**स एष वैश्वानरो विश्वरूपः प्राणोऽग्निरुदयते । तदेतदृचाऽभ्युक्तम् ॥ ७ ॥**

अन्वय व अर्थ— सः एषः वैश्वानरः विश्वरूपः प्राणः अग्निः उदयते ( तो हा वैश्वानर—सर्वांचा आत्मा,—विश्वरूपाचा आत्मा, जो प्राण तो अग्नि उदय पावतो. ) तत् एतत् ऋचा अभ्युक्तम् ( आम्हीं सांगितलेलें हें तत्त्व ऋग्वेदांतील एका मंत्रानें उत्तमोत्तम वर्णिलें आहे. ) ॥ ७ ॥

तो हा सूर्यरूपी प्राण म्हणजे सर्व जीवांचा आत्मा आहे. त्याप्रमाणेंच तो प्राण सर्व प्रपंचात्मक आहे. जीवमात्राचें चैतन्य आणि जड वस्तूंमध्यें उदय होणारी चेतना ही सर्व अग्निरूप अथवा सूर्यरूप आहेत. मागच्या मंत्रात प्राणाचें जें सर्वात्मकत्व सांगितलें त्याचाच अनुवाद या मंत्रांत करून जीवांचें चैतन्य व जडांत उदय होणारी चेतना ही प्राणात्मक अथवा सूर्यात्मक आहे असें स्पष्ट करून सांगितलें आहे. हें या सहा आणि सात मंत्रांत प्रकट झालेलें प्राणतत्त्व सर्वनियामक व सर्वसंघ जो सूर्य तदात्मक आहे असें पुढील ऋग्वेदोक्त मंत्रानें समर्थित केलें आहे. ॥ ७ ॥

---

### मंत्र आठवा.

**विश्वरूपं हरिणं जातवेदसं परायणं ज्योतिरेकं तपन्तम् । सहस्ररश्मिः शतधा वर्तमानः प्राणः प्रजानामुदयत्येष सूर्यः ॥ ८ ॥**

अन्वय व अर्थ— विश्वरूपं, हरिणं, जातवेदसं, परायणं, ज्योतिः एकं तपन्तम् ( हें सर्वरूपी, प्रकाशवंत, सर्वज्ञ, सर्वाधार, तेजोरूप अद्वितीय असून सर्वांस उष्णता देणारें आहे. ) सहस्ररश्मिः शतधा वर्तमानः प्रजानाम् प्राणः, एषः सूर्यः उद्यति ( हजारों किरण असणारा व

हजारों स्वरूपानें असणारा, तसेंच सर्व प्रजाचा प्राण असणारा जो हा सूर्य आतां उगवत आहे. ) ॥ ८ ॥

या ऋग्वेदोक्त मंत्रात सूर्यस्वरूपाचें उत्कृष्ट वर्णन आहे. सूर्य एकच एक असून तो सर्वप्रकाशक, सर्वज्ञ, सर्वाधार, स्वयप्रकाश आणि सर्वांस उष्णता देणारा असा आहे. त्याला अनंत किरण आहेत. वस्तुस्वरूपानुरूप तो अनेक स्वरूपें धारण करितो व करवितो. आणि हा सूर्य सर्व प्रजाचे प्राणांचा समाहक आहे. या मंत्रावरून असें स्पष्ट होतें कीं, प्राणरूपी तत्त्व एकच असून तें पदार्थांची गति व स्थिति नियमित करितें. तें स्वयप्रकाश आणि सर्वप्रकाशक आहे. पदार्थांच्या गतिस्थितीचें तें कारण असून प्राण्यांचें बुद्धिवैभव वृद्धिंगत करणारें हेंच तत्त्व आहे. जीवाचा प्राण म्हणजे सूर्यच होय. उपाधीनीं त्याचें स्वरूप भिन्न होतें, म्हणून विश्वात अनंत प्राणी व अनंत वस्तु आहेत असें आपल्यास दिसतें, इतकेंच! सारांश, सर्व वस्तु प्राणद्रव्यानें ओतप्रोत भरलेल्या आहेत. ॥ ८ ॥

---

## मंत्र नववा.

**संवत्सरो वै प्रजापतिस्तस्यायने दक्षिणं चोत्तरं च । तद्ये ह वै तदिष्टापूर्ते कृतमित्युपासते । ते चान्द्रमसमेव लोकमभिजयन्ते । त एव पुनरावर्तन्ते तस्मादेत ऋषयः प्रजाकामा दक्षिणं प्रतिपद्यन्ते । एष ह वै रयिर्यः पितृयाणः ॥ ९ ॥**

अन्वय व अर्थ—संवत्सरः वै प्रजापतिः ( संवत्सर—वर्ष—हा प्रजापतीचें स्वरूप आहे. ) तस्य दक्षिणं च उत्तरं च अयने ( त्याचीं दक्षिण आणि उत्तर अशीं दोन अयनें आहेत.) तत् ये ह वै तत् इष्टापूर्तं 'कृतं' इति उपासते, ते चांद्रमसं एव लोकं अभिजयन्ते (जे कोणी इष्टापूर्त करून व तीं कृत्यें आपली आहेत अशी भावना करून त्यांची उपासना करितात ते कर्माभिमानी लोक चंद्रलोकाला जातात.) ते एव पुनः आवर्तन्ते ( त्या ह्या चंद्रलोकांत गेलेल्या पुरुषानाच पुनः परत यावें लागतें. ) तस्मात् एते ऋषयः प्रजाकामाः दक्षिणं प्रतिपद्यन्ते ( म्हणून हे ऋषि प्रजा उत्पन्न करण्याची इच्छा करितात, आणि दक्षिण दिशेचा जो स्वामी चंद्र त्याच्या लोकास जातात. ) एष ह वै रयिः यः पितृयाणः ( हा जो पितृयाण मार्ग आहे तो अन्नरूप आहे. ) ॥ ९ ॥

चौथ्यापासून आठव्या मंत्रासुद्धां सर्व मंत्रांत प्रजापतीचें स्वरूप वर्णन करून त्यानें प्राण आणि अन्न यांचें एक मिथुन उत्पन्न केलें, सर्व पदार्थ अन्नमय व प्राणमय करून आपण त्यांचा स्वामी झाला. सर्व पदार्थ अन्नरूप व तेच प्राणरूप होतील, असें करून आपण त्यांचा नियामक झाला असें सांगितलें. या मंत्रांत संवत्सर (एक वर्षाच्या कालाला संवत्सर म्हणतात) हें प्रजापतीचें स्वरूप आहे, असें ठरवून संवत्सराचें स्वरूप, त्याचे विभाग आणि या विभागांतील एकाचें म्हणजे दक्षिणायनाचें वर्णन केलें आहे. प्रजापति हाच कालाचा उत्पादक आहे म्हणून संवत्सरालाही प्रजापतित्व प्राप्त झालें आहे. संवत्सर हा प्रजापतीप्रमाणेंच एक मिथुन उत्पन्न करितो. आणि तें मिथुन प्राणान्नात्मक आहे म्हणून संवत्सराला प्रजापति हें नांव उत्तम शोभतें. दक्षिणायन आणि उत्तरायण हें संवत्सरानें उत्पन्न केलेलें प्राणान्नात्मक मिथुन होय. सूर्य दक्षिणदिशेनें प्रवास करूं लागला म्हणजे दक्षिणायनास सुरवात होते. सूर्याचा प्रवास सहा महिनेपर्यंत दक्षिणदिशेनें चालतो म्हणून या कालाला दक्षिणायन म्हणतात. या महिन्यांत जे कोणी लोक इष्टापूर्तादि कर्में करून दक्षिणायनाची उपासना–फलप्राप्तीची इच्छा करून–करितात, ते लोक चन्द्रलोकास जातात. चंद्राला क्षयवृद्धि आहे, ही गोष्ट सर्वप्रसिद्ध आहे. शिवाय चन्द्र म्हणजे अन्न अथवा उपभोग्य वस्तु असते, असें आपण आतांच समजून घेतलें आहे. अर्थात् जे लोक फलभोगाच्या आशेनें इष्टापूर्तादि कर्में करितात, त्या लोकांस भोगप्राप्ति करून देणारा लोक अधिगत होतो. आणि भोग देणारें पुण्यकर्म संपल्याबरोबर या लोकांस मृत्युलोकीं परत यावें लागतें. तात्पर्य, जे लोक भोगप्राप्तीची–धनपुत्र–दारादिकांची–इच्छा करून इष्टापूर्तादि भोगदायी कर्में करितात, ते लोक अन्नद्रव्याचा प्रतिनिधि जो चंद्र त्याच्या लोकांत जाऊन कृतकर्मांच्या फलाचा उपभोग घेतात. आणि कर्मफल संपलें म्हणजे पुनः मृत्युलोकीं परत येतात. चंद्रलोकीं नेणारा जो मार्ग त्याला पितृयाण असें म्हणतात. फलाच्या इच्छेनें अग्निहोत्र चालविणें, तप करणें सत्य बोलणें वेदविहित दान धर्म करणें, आतिथ्य वैश्वदेवादि वेदोक्त कर्में करणें, याला इष्ट असें म्हणतात. वापी कूप तडाग देवालयें धर्मशाळा बांधणें व अन्नछत्रें घालणें या कृत्यास पूर्त असें म्हणतात. हीं इष्टपूर्तादि कर्में फलाच्या आशेनें व कर्तृत्वाच्या अभिमानानें केलीं म्हणजे पितृलोकाची प्राप्ति होते. हाच चंद्र लोक होय. अन्नरूपानें येथें आलेल्या पुण्याचा व्यय होतो म्हणून पितृयाणाला (चंद्रलोकाला) अन्न लोक असें म्हणतात. ॥ ९ ॥

## मंत्र दहावा.

**अथोत्तरेण तपसा ब्रह्मचर्येण श्रद्धया विद्ययाऽऽत्मानमन्विष्याऽऽदित्यमभिजयन्ते । एतद्वै प्राणानामायतनमेतदमृतमभयमेतत्परायणमेतस्मान्न पुनरावर्तन्त इत्येष निरोधस्तदेष श्लोकः ॥ १० ॥**

अन्वय व अर्थ—**अथ उत्तरेण तपसा, ब्रह्मचर्येण, श्रद्धया, विद्यया, आत्मानं अन्विष्य आदित्यं अभिजयन्ते** ( आतां कांहीं श्रेष्ठ लोक वासनाशून्य तप, ब्रह्मचर्य, आस्तिक्य बुद्धि, गुरुविद्या यांच्या साहाय्यानें स्वस्वरूपाचें ज्ञान करून घेऊन उत्तरमार्गानें—उत्तरायणांत सूर्याची उपासना करून त्याची प्राप्ति करून घेतात. ) **एतत् वै प्राणानाम् आयतनं, एतत् अमृतं, अभयम्, एतत् परायणं** ( आदित्य हा प्राणाचें आदिपीठ आहे. हा अमरत्व व अभयत्व देणारा आहे. सूर्य हा सर्वांचा आधार व सर्वांची शेवटची गति आहे. **एतस्मात् पुनः न आवर्तन्ते** ( येथें गेलेल्या प्राण्यास पुनः परत यावें लागत नाहीं. ) **इति एषः निरोधः** ( याप्रमाणें असा हा नियमित करणारा नियम आहे. ) **तत् एषः श्लोकः** ( हें सांगण्यासाठीं पुढील मंत्राची योजना आहे.) ॥ १० ॥

या मंत्रांत संवत्सररूपी प्रजापतीचा प्राणांश जो उत्तरायण मार्ग त्याचें उपासनफल सांगितलें आहे. येथील उपास्य देवता सूर्य म्हणजे प्राण आहे. जे कोणी ज्ञानी लोक इंद्रियजय करून तपश्चर्या करितात, ब्रह्मचर्याचे नियम पाळितात श्रद्धावंत असतात, प्रजापति स्वरूपाचें ज्ञान करून घेतात आणि आपणच प्रजापतिस्वरूप आहोंत असें जाणतात, ते लोक ज्ञानाच्या आणि कर्माच्या समुच्चयानें प्राणरूपी व उत्तरमार्गगामी आदित्याची उपासना करून सूर्यलोकाची प्राप्ति करून घेतात. मागें सांगितलेंच आहे कीं, सूर्य हा प्राण्यांच्या प्राणांचा मूळ आधार आहे. त्याची उपासना केली असतां जीवांच्या प्राणाला अमरत्व येतें आणि तो भीतिशून्य होतो. येथें चंद्रलोकांतील क्षय–वृद्धीची भीति असण्याचें कारण नाहीं. पूर्वोक्त ज्ञानी व कर्मी लोकांस सूर्यप्राप्ति होणें हाच त्यांचा पुरुषार्थ आहे. सूर्य लोकांत गेलें म्हणजे जीवाला कल्पपर्यंत पुनः परत यावें लागत नाहीं. हा नियम निराबाध आहे. कर्म–फलाच्या इच्छेनें वेदोक्त कर्में करणारे गृहस्थ चंद्र लोकाला जातात; पण त्यांस पुनः परत येण्याची भीति असते. पण प्राणोपासना ज्ञानपूर्वक करणारे ऋषि सूर्य लोकांत जातात आणि कल्पाच्या अंतापर्यंत तेथील सुखाचा उपभोग घेत राहतात. हा पूर्वोक्त नियम होय. संवत्सराचें स्वरूप पुढील मंत्रांत स्पष्ट केलें आहे ॥ १० ॥

---

## मंत्र अकरावा.

**पञ्चपादं पितरं द्वादशाकृतिं दिव आहुः परे अर्धे पुरीषिणम् । अथेमे अन्य उ परे विचक्षणं सप्तचक्रे षडर आहुरर्पितमिति ॥ ११ ॥**

अन्वय व अर्थ—पञ्चपादं, पितरं, द्वादशाकृतिं, दिवः परे अर्धे पुरीषिणम्, आहुः ( या संवत्सराला पांच चरण अथवा पांच ऋतु असतात. हा सर्वसंरक्षक असून याला बारा अवयव आहेत. हा अंतरिक्ष लोकाच्या पलीकडे असून याला ' पर्जन्य—वर्षक ' असें नांव आहे. ) अथ अन्ये इमे परे उ विचक्षणं सप्तचक्रे, षडरे अर्पितं इति आहुः ( पण दुसरे कोणी ज्योतिषी असें म्हणतात कीं हा महासाक्षी असून याच्या रथाला सात चक्रें आणि सहा अरा असतात. ) ॥ ११ ॥

या मंत्रांत संवत्सराचें स्वरूप दोन प्रकारांनीं सांगितलें आहे. पहिल्या स्वरूपांत असें म्हटलें आहे. संवत्सराला अथवा संवत्सरात्मक सूर्याला पांच पाय असतात. पूर्वकालीं एका संवत्सरांत पांच मात्र ऋतु असतात अशी कल्पना होती. हा सूर्य किंवा संवत्सर सर्वांचें जनन व संरक्षण करितो म्हणून त्याला 'पिता' असें म्हटलें. याला बारा अवयव आहेत हे अवयव म्हणजे वर्षाचे बारा महिने होत. सूर्य हा भुवर्लोकाच्या पलिकडे असणाऱ्या स्वर्ग लोकांत राहातो आणि स्वतः जलमय असून सर्वांचें जीवन जें उदक त्याचा वर्षाव करून सर्वांचें प्राणरक्षण करितो. हें एक स्वरूपवर्णन झालें. आतां दुसऱ्या प्रकारच्या स्वरूपवर्णनांत सूर्य किंवा संवत्सर हा सर्वसाक्षी व महाज्ञानी असून तो सात चाकांच्या व सहा अरा असणाऱ्या रथांत बसलेला आहे, असें वर्णन केलेलें आहे. पहिल्या स्वरूपप्रकारांत तो स्थिर आहे आणि दुसऱ्या प्रकारांत तो परिवर्तन करणारा म्हणजे हिंडणारा आहे असें दिसतें. मला वाटतें कीं पहिलें वर्णन प्राणात्मक सूर्याचें आहे आणि दुसरें वर्णन अन्नात्मक चंद्राचें आहे. दुसऱ्या वर्णनांत सूर्याच्या रथाला सात चाकें आहेत असें म्हटलें आहे, तें सूर्याच्या किरणांत सात प्रकारचे भिन्न रंग प्रकट होतात, किंवा आठवड्याचे सात वार असतात, किंवा सूर्याच्या रथाला सात तोंडाचा घोडा असतो अशी कल्पना आहे, त्याचें दर्शक असावें. चाकाला अरा सहा आहेत असें म्हटलें आहे. त्याचा अर्थ वर्षाचे सहा ऋतु होत, असा असावा. चक्र आणि अरा यांच्या निर्देशानें चक्र फिरत आहे असा भास होतो. तसा भास पंचपाद ( पांच चरण ) या पदानें होत नाहीं. पुरीषिणम् ( उदक असणारा ) हें पद असें सुचवितें कीं, सूर्यकिरण समुद्रजलाचें आकर्षण करून त्याची वृष्टि पुनः पृथ्वीवर करितात. ही

अलीकडील कल्पना वेदकालींही मान्य झालेली होती. असो, या दृष्टीनें पाहिलें असता प्रजापतिरूपी संवत्सर हा जगताचें सूर्यरूपानें निमित्त कारण आणि चंद्ररूपानें उपादान कारण आहे असें ठरलेलें दिसतें. ॥ ११ ॥

---

## मंत्र बारावा.

**मासो वै प्रजापतिस्तस्य कृष्णपक्ष एव रयिः शुक्लः प्राणस्तस्मादेत ऋषयः शुक्ल इष्टं कुर्वन्तीतर इतरस्मिन् ॥ १२ ॥**

अन्वय व अर्थ—मासः वै प्रजापतिः ( महिना हाही प्रजापतीचें स्वरूप आहे ) तस्य कृष्णपक्षः एव रयिः शुक्लः प्राणः ( त्यांतील कृष्णपक्ष हा अन्नरूप आहे व शुक्लपक्ष हा प्राणरूप आहे. ) तस्मात् एते ऋषयः शुक्ले इष्टं कुर्वंति ( म्हणून हे ऋषि शुद्ध पक्षातच यज्ञयाग करितात. ) इतरे इतरस्मिन् ( आणि दुसरे लोक कृष्णपक्षांत यागादि कर्में करितात. ) ॥ १२ ॥

या मंत्राचा भावार्थ असा आहे. संवत्सराप्रमाणेंच महिना हा प्रजापतिरूप आहे. प्रत्येक महिन्यात शुद्ध व वद्य असे दोन पक्ष असतात. शुद्धपक्ष हा प्राणाचा निर्देश करितो आणि कृष्णपक्ष अन्नाचा करितो. म्हणून महिन्याला 'प्रजापति' असें श्रुतीनें म्हटलें आता मंत्राचा असा अभिप्राय आहे कीं, प्राणस्वरूप जाणणाऱ्या ऋषींनीं केव्हांही यज्ञयाग केले तथापि त्याचे ते याग शुक्ल पक्षात केल्यासारखे होतात. विद्वान् ऋषींनीं केलेलीं प्राणोपासक कर्में केव्हांही केलीं तरी त्यांना शुक्ल पक्षात केलेल्या कर्मांचें फल प्राप्त होतें. म्हणजे त्यास अमरत्व व अभयत्व मिळून सूर्य लोकीं रहण्यास सांपडतें, हे फल होय. या लोकास प्राणाचें स्वरूप उत्तम समजलेलें असून ते सर्वत्र प्राणरूप पहात असतात; पण ज्यांना प्राणस्वरूप समजलें नाहीं म्हणून प्राणोपासना साध्य नाहीं, त्या लोकांनीं कसलींही वेदोक्त कर्में कोणत्याही कालीं केलीं तथापि त्यांना कृष्णपक्षात केलेल्या कर्मांचें फल प्राप्त होतें. म्हणजे ते अन्नरूपी लोक चंद्रलोकास जातात आणि पुनः पुनः जन्म–मरणाच्या चक्रात सांपडतात ॥ १२ ॥

---

## मंत्र तेरावा.

अहोरात्रो वै प्रजापतिस्तस्याहरेव प्राणो रात्रिरेव रयिः प्राणं वा एते प्रस्कन्दन्ति ये दिवा रत्या संयुज्यन्ते ब्रह्मचर्यमेव तद्यद्रात्रौ रत्या संयुज्यन्ते ॥ १३ ॥

अन्वय व अर्थ—अहोरात्रः वै प्रजापतिः ( अहोरात्र हा प्रजापतिरूप आहे. ) तस्य अहः एव प्राणः, रात्रिः एव रयिः ( त्यांतील अहर् म्हणजे प्र ण—क्षितिजावर सूर्य असण्याचा काल—हा प्राण आणि रात्र हें अन्न होय ) ये दिवा रत्या संयुज्यन्ते एते प्राणं वै प्रस्कंदंति ( जे लोक दिवसा स्त्रीसंगम करितात ते आपल्या प्राणाला शुष्क करितात. म्हणजे आपला स्वघात करितात. ) ये रात्रौ रत्या संयुज्यन्ते तत् ब्रह्मचर्य एव ( रात्रीचा स्त्रीसंगम हें एक प्रकारचें ब्रह्मचर्यच आहे. ) ॥ १३ ॥

या मंत्रात काळाचा शेवटचा विभाग जो अहोरात्र त्याला ही प्रजापति असें म्हटलें आहे. अहोरात्राला दोन पाखीं आहेत. त्यांतील दिवसाचें पाखें प्राणरूप आहे आणि रात्रीचें पाखें अन्नरूप आहे. श्रुतिमातेला जीवाच्या संरक्षणाविषयींची कळकळ अत्यंत म्हणून तिनें सर्व जीवांस असा कल्याणकारक उपदेश केला आहे कीं, प्रजोत्पादनासाठीं स्त्रीगमन करावयाचा असेल तर तो रात्रीं करावा म्हणजे ब्रह्मचारित्वाचें फळ प्राप्त होतें. अथवा जीवाच्या प्राणरूपी सामर्थ्याचा अपव्यय होत नाहीं. पण ह्या उपदेशाचें अतिक्रमण करून जर दिवसा स्त्रीगमन केला तर आपला प्राणच बाहेर टाकण्याचें पातक आपल्या माथीं येतें. प्रस्तुत विषयाशीं या उपदेशाचा फारसा साक्षात् संबंध नाहीं. हें खरें, तथापि पुरुषाचें वीर्य हें प्राणरूप आहे आणि प्राणरूप वीर्याचें स्खलन प्राणरूप असणाऱ्या दिवसाच्या भागात करूं नये, प्राणहानि करूं नये, हा उपदेश जीवकल्याणकारी म्हणून परंपरेनें प्रस्तुत विषयास अनुलक्षूनच आहे. ॥ १३ ॥

---

## मंत्र चवदावा.

अन्नं वै प्रजापतिस्ततो ह वै तद्रेतस्तस्मादिमाः प्रजाः प्रजायन्त इति ॥ १४ ॥

अन्वय व अर्थ—अन्नं वै प्रजापतिः ततः ह वै तत् रेतः ( खरोखर अन्न हा प्रजापति आहे. तेथून तें प्राणात्मक रेत उत्पन्न होतें. )

तस्मात् इमाः प्रजाः प्रजायन्ते (या रेतापासून ह्या प्रजा उत्पन्न होतात.) ॥ १४ ॥

या मंत्रांत कबंधी कात्यायनाच्या प्रश्नाला साक्षात् उत्तर दिलें आहे. मागील मंत्रांत सांगितल्याप्रमाणें संवत्सर, मास, अहोरात्र, हीं प्रजापतीचीं स्वरूपें आहेत. कारण यांत प्राण आणि अन्न यांचें मिथुन सदैव दृष्टीस पडतें असें सांगितलें आहे. ह्याच क्रमानें पुढें गेलें असतां प्रजापति हा अन्नरूप होतो असें श्रुतीचें सांगणें आहे. या अन्नापासून प्राणात्मक रेत उत्पन्न होतें. पुरुषाचें रेत आणि स्त्रीचें (रयिरूपी मातेचें) शोणित या मिथुनापासून ह्या सर्व प्रजा उत्पन्न होतात. सर्व सामर्थ्यें उत्पन्न करणारा सूर्य आणि अन्नरूपी चंद्र, प्राणात्मक उत्तरायण, आणि अन्नात्मक दक्षिणायन, प्राणात्मक शुक्ल पक्ष आणि अन्नात्मक कृष्ण पक्ष, प्राणरूपी दिवस आणि अन्नरूपी रात्र, प्राणरूपी रेत आणि अन्नरूपी शोणित या मिथुनापासून विश्वाची, सांसारिक गतिस्थित्यात्मक व्यवहाराची, प्रजोत्पादनाची कार्यें होतात. प्रजा कशा उत्पन्न होतात? याला हें उत्तर आहे कीं, प्राण व अन्न, हें मिथुन प्रजाकामी हिरण्यगर्भानें तप करून आपण स्वतः आपल्या स्वरूपापासून यथापूर्व उत्पन्न केलें. त्यापासून पुढें काळ, स्थल, सृष्टिव्यवहार, पर्जन्य, उष्णता, अन्न, रेत आणि शोणित ह्या सात वस्तु उत्पन्न होऊन त्यांच्यापासून प्रजोत्पादनाचें कार्य होतें. या प्रमाणें हिरण्यगर्भ हा विश्वाचें निमित्त कारण आणि उपादान कारण आहे, असा श्रुतीचा अभिप्राय आहे. ह्या मंत्राचा सूक्ष्म विचार केला असेंही सिद्ध होतें कीं व्यवहारकालीं सृष्टिही अनादि आहे. केव्हां हिरण्यगर्भाच्या शास्त्रोक्त इच्छेनें ती प्रकट होते आणि केव्हां ती तिरोभूत (अदृश्य) होते. सृष्टि अदृश्य होणें, हिरण्यगर्भांत लीन होणें, हा सृष्टीचा प्रलय होय. योग्य वेळ आली म्हणजे ती प्रकट होते. आविर्भूत होते किंवा दृश्य होते. हें आविर्भवन म्हणजे सृष्टीचा जन्म होय. ही व्यवहारोपयोगी गोष्ट झाली. व्यवहार कालीं आपण केव्हांही विचार करावयास लागलों तरी अन्न आणि प्राण (Matter) व (Force) काल, स्थल इत्यादि गोष्टी आपल्यास गृहीत घ्याव्या लागतात. यांच्या शिवाय विचार करणें अशक्य आहे. ह्या गृहीत कराव्या लागणाऱ्या गोष्टी श्रुतीवरून आपल्यास समजतात. विचारास अगोचर असणाऱ्या गोष्टी श्रुति मात्र आपल्यास सांगते, म्हणून श्रुतीला अपौरुषेयत्व प्राप्त होतें. असो; येथें इतकाच विचार पुरे. ॥ १४ ॥

---

## मंत्र पंधरावा.

**तद्ये ह वै तत्प्रजापतिव्रतं चरन्ति ते मिथुनमुत्पादयन्ते । तेषामेवैष ब्रह्मलोको येषां तपो ब्रह्मचर्यं येषु सत्यं प्रतिष्ठितम् ॥ १५ ॥**

अन्वय व अर्थ—तत् ये ह वै तत् प्रजापतिव्रतं चरन्ति ते मिथुनं उत्पादयन्ते ( असें आहे म्हणून जे गृहस्थ प्रजापतीचें व्रत नैष्ठिक पद्धतीनें पाळितात, ते मिथुन म्हणजे कन्यापुत्र उत्पन्न करितात. ) येषां तपः ब्रह्मचर्यं येषु सत्यं प्रतिष्ठितम् तेषां एव एषः ब्रह्मलोकः ( जे लोक तपश्चर्या करितात, ब्रह्मचर्य व्रत पाळितात आणि जे सत्याची कास केव्हाही सोडीत नाहींत त्यांना हा ब्रह्मलोक प्राप्त होतो. ) ॥ १५ ॥

तात्पर्य, प्रजापतीचें व्रत जे लोक एकनिष्ठेनें चालवितात ते प्रजा उत्पन्न करण्याच्या कामीं प्रजापतीला साहाय्यकारी होतात; पण जे लोक यज्ञ याग, ऋतुकालीं भार्यागमन आणि सत्यशील व्रताचा स्वीकार करितात, हीं व्रतें चालवितात, त्यांना ह्या जवळ असणाऱ्या ब्रह्मलोकाची म्हणजे पितृलोकाची अथवा चंद्रलोकाची प्राप्ति होते. तथेंच हे लोक सकाम कर्म करणारे असल्यामुळें जन्ममरणाच्या चक्रात सापडतात आणि व्यवहार अबाधित रीतीनें चालू राहातो. ॥ १५ ॥

---

## मंत्र सोळावा.

**तेषामसौ विरजो ब्रह्मलोको न येषु जिह्ममनृतं न माया चेति ॥ १६ ॥**

अन्वय व अर्थ—येषु न जिह्मम्, न अनृतं, च न माया तेषां असौ विरजः ब्रह्मलोकः ( पण ज्या लोकामध्यें कपटवृत्ति नसते, अनृत भाषण नसतें. आणि दांभिकपणा नसतो त्या लोकांस मात्र तो नीरज—निर्मळ—ब्रह्मलोक प्राप्त होतो. ) ॥ १६ ॥

संसारामध्यें आपल्यास अनेक प्रकारचे व केव्हां केव्हां तर परस्पर विरोधी व्यवहार करावे लागत असल्यामुळें आपल्यास रागद्वेषादिकांचा, व कुटिल वर्तनाचा आश्रय घ्यावा लागतो, हें सर्वप्रसिद्ध आहे. हा प्रसंग ज्या अवधूती लोकास केव्हांही येत नाहीं, जे विरक्त असतात व म्हणून ज्यास केव्हांही असत्य भाषणाचा प्रसंग प्राप्त होत नाहीं. आणि ज्यांना केव्हांही कपटाचरण करावें

लागत नाहीं, अशा सन्यासी लोकांनीं प्रजापतीचें (तपश्चर्या करण्याचें) मात्र व्रत चालविलें तर त्यास निर्मळ अशा ब्रह्मलोकाची, हिरण्यगर्भरूपाची, स्थिति प्राप्त होते. हे लोक ज्ञानी असतात आणि वेदोक्त कर्मही करितात. यांचें कर्म स्वोपकारक व परोपकारक असतें व यांचें ज्ञानही वरिष्ठ प्रकारचें असतें. प्रजापतिव्रताचें यथोक्त पालन केलें असता पधराव्या व सोळाव्या मंत्रात सांगितलेलीं फलें प्राप्त होतात. ॥ १६ ॥

पहिला प्रश्न समाप्त.

---

## प्रश्न दुसरा.

### मंत्र पहिला.

**अथ हैनं भार्गवो वैदर्भिः पप्रच्छ। भगवन्कत्येव देवाः प्रजां विधारयन्ते कतर एतत्प्रकाशयन्ते कः पुनरेषां वरिष्ठ इति ॥ १ ॥**

अन्वय व अर्थ—अथ ह एनं भार्गवः वैदर्भिः पप्रच्छ (नंतर विदर्भदेशस्थ भार्गवानें मुनीस विचारिलें.) भगवन्, कति एव देवाः प्रजां विधारयन्ते (हे भगवन्, कोणते देव येथील प्रजाचें धारण करितात?) कतरे एतत् प्रकाशयन्ते (कोणते देव यांचें प्रकाशन करितात?) कः पुनः एषां वरिष्ठः (या सर्वांमध्यें श्रेष्ठ देव कोणता?) इति (याप्रमाणें भार्गवानें प्रश्न विचारिला) ॥ १ ॥

प्रश्नाचा भावार्थ स्पष्ट आहे. प्रजाचें आश्रयस्थान कोणतें आहे, त्यास प्रकाश कोणीकडून मिळतो आणि धारक व प्रकाशक देवतांपैकीं श्रेष्ठ देवता कोणती? हें या प्रश्नात विचारिलें आहे. या पुढील प्रश्नाचा विषय प्राणाची उपासना हा आहे. दुसऱ्या प्रश्नातील रहस्य हें आहे कीं त्यात प्राणाचें श्रेष्ठत्व उपभोगत्व व प्रजापतित्व इत्यादि गुणांचा निर्धार व्हावा. तिसऱ्या प्रश्नात प्राणोपासनेचा विधि सांगितला आहे. ॥ १ ॥

---

### मंत्र दुसरा.

**तस्मै स होवाचाऽऽकाशो ह वा एष देवो वायुरग्निरापः पृथिवी वाङ्मनश्चक्षुः श्रोत्रं च। ते प्रकाश्याभिवदन्ति वयमेतद्बाणमवष्टभ्य विधारयामः २**

अन्वय व अर्थ—तस्मै सः उवाच ह ( भार्गवाला पिप्पलादाचार्यांनी उत्तर दिलें.) आकाशः वै एषः देवः, वायुः अग्निः, आपः, पृथिवी, वाक्, मनः, चक्षुः, श्रोत्रं, च ह (आकाश, वायु, अग्नि, जल, पृथिवी, वाणी, मन, नेत्र आणि कर्ण हे मुख्य देव आहेत. ) प्रकाश्य ते अभिवदन्ति ( हे देव आपले गुणधर्म प्रकाशित करून म्हणतात ) वयं एतत् बाणं अवष्टभ्य विधारयामः ( आम्ही या बाणाला—शरीराला—स्थिर करून त्याला आश्रय देतों. ) ॥ २ ॥

या मंत्रांत पूर्वीच्या प्रश्नाला एक प्रकारचें उत्तर आहे. आकाशादि पंचमहाभूतें हीं शरीराचा आरंभ करणारीं पंचमहाभूतें आहेत. वाणी, मन, नेत्र आणि कर्ण इत्यादि कर्मेंद्रियें व ज्ञानेंद्रियें [redacted] शरीराचीं उपकरणें आहेत. या सर्वांस देव ही संज्ञा मंत्रांत दिली आहे. याचें कारण तीं पंचमहाभूतें आणि उपकरणें संकल्पपूर्वक बोलण्यास समर्थ झालीं आहेत, असें श्रुतीनें कल्पिलें आहे किंवा तिनें त्यांवरील अधिष्ठात्या देवतांचा उल्लेख केला आहे, हें होय. यांपैकीं प्रत्येकानें आपापले गुणधर्म प्रकट केल्यानंतर प्रत्येकास असें वाटूं लागलें कीं या शरीराचें उपादान कारण, निमित्त कारण व स्थिति कारण आपणच आहों. याप्रमाणें परस्परांत स्पर्धा लागून प्रत्येक जण म्हणूं लागला कीं, 'सर्वांत मी श्रेष्ठ आहें.' असो; पंचमहाभूतांपैकीं व इंद्रियां-पैकीं प्रत्येकाची एकेक अधिष्ठात्री देवता आहे असा पूर्वकालीन समज होता. व तो अद्यापिही नष्ट झाला नाहीं व होणें शक्य नाहीं. ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

### तान्वरिष्ठः प्राण उवाच । मा मोहमापद्यथाऽहमेवैतत्पञ्चधाऽऽत्मानं प्रविभज्यैतद्बाणमवष्टभ्य विधारयामीति । तेऽश्रद्दधाना बभूवुः ॥ ३ ॥

अन्वय व अर्थ—तान् वरिष्ठः प्राणः उवाच (त्या सर्वांत सर्वश्रेष्ठ जो प्राण तो त्यांस म्हणूं लागला.) मा मोहम् आपद्यथ ( तुम्ही सर्वजण असे मोहांत पडूं नका. ) अहं एव एतत् पंचधा आत्मानं प्रविभज्य, एतत् बाणं अवष्टभ्य विधारयामि इति ( मीच आपणा स्वतःला पंचस्वरूपी करून—मी स्वतः पंचस्वरूपांचा होऊन-या शरीराला आधार होतों, त्याचे सर्व अवयव एकत्र टेवितों आणि या शरीररूपी बाणाचें संरक्षण करितों. )

ते अश्रद्दधाना बभूवुः ( त्या सर्व पंचमहाभूतांस, व इंद्रियांस हें प्राणाचें भाषण खरें वाटलें नाहीं. ॥ ३ ॥

या मंत्रांत प्राणाचें म्हणणें सांगितलें आहे. मुख्य प्राण एकच असून तो स्थानानुसार पंचस्वरूपाचा होतो. आपल्या जीवाच्या शरीराचे अनेक भाग विस्कळू न देतां एकत्र ठेवून सर्व शरीराचें संरक्षण करणारा व त्याचा मुख्य आधार असणारा प्राणवायु आहे. पण ही गोष्ट कर्मेंद्रियांस, ज्ञानेंद्रियांस व पंचमहाभूतांस केव्हां केव्हां समजत असत नाहीं. प्राणाचें सामर्थ्य काय आहे, हें ठाऊक नसल्यामुळें पूर्वी व आधुनिक काळींही सारास, नेहमी प्राणाच्या संबधानें पुष्कळ वादविवाद होतात. या वादाचें दिग्दर्शन या मंत्रांत झालें आहे ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

सोऽभिमानादूर्ध्वमुत्क्रमत इव तस्मिन्नुत्क्राम-त्यथेतरे सर्व एवोत्क्रामन्ते तस्मिँश्च प्रतिष्ठमाने सर्व एव प्रातिष्ठन्ते। तद्यथा मक्षिका मधुकरराजानमुत्क्रामन्तं सर्वा एवोत्क्रामन्ते तस्मिँश्च प्रतिष्ठमाने सर्वा एव प्रातिष्ठन्त एवं वाङ्मनश्चक्षुः श्रोत्रं च ते प्रीताः प्राणं स्तुन्वन्ति ॥ ४ ॥

अन्वय व अर्थ —सः अभिमानात् ऊर्ध्वं उत्क्रमते इव तस्मिन् उत्क्रामति अथ इतरे सर्वे एव उत्क्रामन्ते तस्मिन् च प्रतिष्ठमाने सर्वे एव प्रातिष्ठन्ते ( नंतर तो अभिमानी प्राणवायु देह सोडून क्रोधानें जणू कांहीं वरच्या दिशेकडे वधू लागला. तेव्हां त्या ऊर्ध्व दिशेस जाणाऱ्या प्राणाच्या मागून बाकीचीं सर्व महाभूतें व इंद्रियें त्याच दिशेकडे धावून जाऊं लागलीं व तो शरीरामध्यें प्रतिष्ठित झालेला असतां म्हणजे सर्वेही प्रतिष्ठित झालीं. ) तत् यथा मक्षिकाः मधुकरराजानं उत्क्रामन्तं सर्वाः एव उत्क्रामन्ते, तस्मिन् च प्रतिष्ठमाने सर्वाः एव प्रातिष्ठन्ते ( ज्याप्रमाणें मधुकराचा राजा ऊर्ध्व दिशेस जाऊं लागला म्हणजे सर्व मक्षिका राजामागून त्याच दिशेनें जातात व तो एकाद्या ठिकाणीं स्थिर झाला असला म्हणजे त्याच्या मागून सर्व स्थिर होतात. ) एवं वाक् मनः चक्षुः श्रोत्रं च। ते प्रीताः प्राणं स्तुन्वन्ति ( याप्रमाणें वाणी, मन,

नेत्र आणि कर्ण यांची स्थिति झाली. नंतर ते सर्व प्रसन्न होऊन प्राणाची स्तुति करूं लागले. ) ॥ ४ ॥

या मंत्रांत प्राण [illegible] सर्वश्रेष्ठ कसा याचें स्पष्टीकरण केलें आहे. कारणाचें लक्षण असें देतात कीं, एक वस्तु नाहींशी झाली असतां त्याच वेळीं दुसरी वस्तु नाहिंशी होते व पहिली वस्तु स्थिर झाली असतां दुसरी वस्तु स्थिर होते, तेव्हां पहिली वस्तु दुसऱ्या वस्तूचें कारण आहे. व ती दुसऱ्या वस्तूहून श्रेष्ठ आहे असें समजावें. या न्यायानें प्राण हा शरीरांतील पंचमहाभूतांचें व इंद्रियांचें कारण असून तो त्यांच्यापेक्षां श्रेष्ठ आहे, असें ठरतें. अर्थातच तोच शरीराचा आश्रय, प्रकाशक आणि संरक्षक आहे. मधुकर राजाच्या गमनागमनावर ज्याप्रमाणें मधमाशांचें गमनागमन अवलंबून असतें, त्याप्रमाणेंच गुणधर्मांनें प्रकाशित होणाऱ्या वाणी, मन, नेत्र, कर्ण, प्रमुख कर्मेंद्रियांचा व ज्ञानेंद्रियांचा प्राण [illegible] आश्रय आहे, असें ठरतें. अशा प्राणाच्या श्रेष्ठत्वाचा अनुभव आल्यानंतर प्रसन्न होऊन सर्वजणांनीं प्राणाची स्तुति करण्यास आरंभ केला. ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा.

**एषोऽग्निस्तपत्येष सूर्य एष पर्जन्यो मघवानेष**
**वायुरेष पृथिवी रयिर्देवः सदसच्चामृतं च यत् ॥ ५ ॥**

अन्वय व अर्थ—एषः अग्निः तपति, एषः सूर्यः, एषः पर्जन्यः मघवान्, एषः वायुः, एषः पृथिवी, रयिर्देवः,–सत् असत्, अमृतं च यत् ( हा उष्णता देणारा अग्नि, प्रकाश देणारा सूर्य, वर्षणारा पर्जन्य, अथवा इंद्र, वाहणारा वायु, सर्वांस आधार देणारी पृथ्वी, आल्हादित करणारा चन्द्रमा, तसेंच मूर्त किंवा अमूर्त जे सर्व कांहीं आहेत व जें अमृत आहे तें सर्व हा प्राणच होय. ॥ ५ ॥

प्राणाची सर्वांनीं स्तुति केली. ते म्हणाले—या विश्वांत जीं जीं कांहीं पालनपोषण करणारीं सामर्थ्यें आहेत तीं सर्व प्राणस्वरूपी आहेत. या विश्वांत जीवास व देवांस उपयोगी पडून त्यांची जीवनयात्रा ठीक चालविणाऱ्या ज्या शक्ति आहेत त्या सर्व प्राणरूप आहेत. ॥ ५ ॥

---

## मंत्र सहावा.

**अरा इव रथनाभौ प्राणे सर्वं प्रतिष्ठितम् । ऋचो यजूंषि सामानि यज्ञः क्षत्रं ब्रह्म च ॥ ६ ॥**

अन्वय व अर्थ—रथनाभौ अराः इव सर्वं प्राणे प्रतिष्ठितं; ऋचः, यजूंषि, सामानि, यज्ञः क्षत्रं ब्रह्म च ( रथाच्या तुंबामध्यें चक्राच्या अरा आश्रय घेऊन राहतात, त्याप्रमाणें सर्व सामर्थ्यें प्राणाचा आश्रय घेऊन राहिलीं आहेत. ऋग्वेदादि तिन्ही वेद, वेदांच्या मंत्रांनीं साध्य होणारा यज्ञ, मंत्राच्या साहाय्यानें यज्ञ साध्य करणारे ब्राह्मण आणि यज्ञ करणारे क्षत्रिय यजमान हे सर्व प्राणाच्या आश्रयानें राहतात. ) ॥ ६ ॥

प्राणाच्या आश्रयानें विश्वाचीं सर्व सामर्थ्यें राहतात; इतकेंच नव्हे तर ऋग्वेदादि तिन्ही वेद, यज्ञयागादि वेदविहित कर्मे आणि ब्राह्मणक्षत्रियादि यज्ञकर्ते हे सर्वही प्राणाश्रयानें राहून प्राणानुगामी असतात. सारांश, या विश्वांतील प्रत्येक सामर्थ्य, प्रत्येक कर्म, प्रत्येक कर्मसाधन आणि प्रत्येक कर्मकर्ता प्राणावलंबी आहे. अर्थातच सर्व जड वस्तूंचा आधार, स्थितिकर्ता आणि विनाशक प्राण आहे, हा श्रुतीचा अभिप्राय आहे. ॥ ६ ॥

---

## मंत्र सातवा.

**प्रजापतिश्चरसि गर्भे त्वमेव प्रतिजायसे । तुभ्यं प्राण प्रजास्त्विमा बलिं हरन्ति यः प्राणैः प्रतितिष्ठसि ॥ ७ ॥**

अन्वय व अर्थ—प्रजापतिः–त्वं एव–गर्भे चरसि, त्वं एव प्रतिजायसे. प्राण ! तुभ्यं इमाः प्रजाः बलिं हरन्ति ( प्रजापतिही तूंच आहेस, गर्भामध्यें संचार तूंच करितोस, तूंच मातापितरांपासून त्यांच्या स्वरूपासारखा जन्म घेतोस, हे प्राणराजा ! या सर्व प्रजा तुलाच उपायनें आणतात. ) यः प्राणैः प्रतितिष्ठसि ( तूंच प्राणापानादि प्राणांसह शरीरामध्यें स्थिर होतोस. ) ॥ ७ ॥

प्राण हा सर्व प्रजांचें उत्पत्ति कारण आहे. तोच गर्भामध्यें वास्तव्य करतो, पुत्ररूपानें मातापितरांची प्रतिकृति तोच होतो. सर्व यच्चयावत् वस्तु त्याचीच सेवा करितात आणि तोच प्राण अनेकरूपानें शरीरांमध्यें संचार करून राहतो. एवंच प्राण हा सर्वाधार, सर्वरूप व सर्वसेव्य, असा आहे. ॥ ७ ॥

---

### मंत्र आठवा.

**देवानामसि वह्नितमः पितॄणां प्रथमा स्वधा।**
**ऋषीणां चरितं सत्यमथर्वाङ्गिरसामसि ॥ ८ ॥**

अन्वय व अर्थ—देवानां वह्नितमः असि (हे प्राण, देवांस हविर्भाग पोहोंचविणारा तूं सर्वश्रेष्ठ अग्नि आहेस.) पितॄणां प्रथमा स्वधा (पितरांस जे पिंड अर्पित होतात, त्यांतील सर्वश्रेष्ठ पिंड तूं आहेस) अथर्वाङ्गिरसां ऋषीणां सत्यं चरितं असि (अथर्व-अंगिरसादि ऋषींचें सत्यशील वर्तन तूंच आहेस) ॥ ८ ॥

देवांस व पितरांस त्यांचे त्यांचे हविर्भाग पोंचविणारा अग्निरूप प्राण सर्वश्रेष्ठ आहे. याचप्रमाणें ऋषींचें तर्पण करून जीव त्याना जें आपलें सद्वर्तन अर्पण करितात, तें ही प्राणाच्याच द्वारानें त्यांस पोहोंचतें जातें. देवांस अर्पण करितांना 'स्वाहा' या पदाचा उच्चार करितात. स्वधा या पदानें पितरांचें तर्पण होतें. हें सर्व वैदिक वाचकांस विदितच आहे. सारांश, प्राण हा पृथ्वींतील प्राण्यांचें संरक्षण करितो असें नाहीं तर तो देव, ऋषि आणि पितर यांचें ही जीवन पोहोंचविण्याचें कारण असतो. ॥ ८ ॥

---

### मंत्र नववा.

**इन्द्रस्त्वं प्राण तेजसा रुद्रोऽसि परिरक्षिता। त्वमन्तरिक्षे चरसि सूर्यस्त्वं ज्योतिषां पतिः ॥ ९ ॥**

अन्वय व अर्थ—प्राण, त्वं तेजसा इंद्रः, परिरक्षिता रुद्रः असि, ज्योतिषां पतिः सूर्यः त्वं अन्तरिक्षे चरसि (हे प्राण तूं स्वतेजानें देवादिकांचा इंद्र आहेस, संरक्षण करणारा रुद्र आहेस आणि अंतरिक्षामध्यें भ्रमण करणाऱ्या तेजोगोलांचा पति म्हणजे स्वामीही तूंच आहेस.) किंवा त्वं सूर्यः अन्तरिक्षे चरसि, त्वं ज्योतिषां पतिः (तूं सूर्यरूपानें अतरिक्षांत भ्रमण करितोस आणि तूंच तेजोगोलांचा स्वामी चंद्र आहेस.) असाही अन्वयार्थ करावा ॥ ९ ॥

प्राण हा वीर्यानें इंद्र, संहार-सामर्थ्यानें व संरक्षण-सामर्थ्यानें रुद्र आणि तेजोगोलकांचा अधिपति सूर्य इत्यादि निरनिराळ्या स्वरूपांनीं इंद्र, रुद्र, आणि सूर्य होतो. सारांश, तो वीर्यशाली, संहारकर्ता, संरक्षक आणि सर्वप्रकाशक आहे. म्हणून त्याच्या अनंत गुणांनीं त्याला अनंत देवांचीं स्वरूपें प्राप्त होतात. ॥ ९ ॥

---

## मंत्र दहावा.

**यदा त्वमभिवर्षस्यथेमाः प्राणते प्रजाः। आनन्द-रूपास्तिष्ठन्ति कामायान्नं भविष्यतीति ॥ १० ॥**

अन्वय व अर्थ—यदा त्वं अभिवर्षसि, अथ इमाः प्रजाः प्राणते, कामाय अन्नं भविष्यति इति आनन्दरूपाः तिष्ठन्ति (हे प्राण, जेव्हां तूं पर्जन्यरूपानें वृष्टि करितोस तेव्हां मात्र ह्या सर्व प्रजा जिवंत राहूं शकतात. आणि आपल्यास आतां हवें तितकें अन्न मिळेल असा त्यांचा निश्चय होऊन त्या आनंदरूप होतात.) ॥ १० ॥

येथें प्राण हाच पर्जन्य असून तो वर्षित झाला म्हणजे सर्व प्रजांचें प्राण-रक्षण होतें व त्यांस पोटभर अन्न मिळून त्या आनंदरूप होतात असें सांगितलें आहे. ॥ १० ॥

---

## मंत्र अकरावा.

**व्रात्यस्त्वं प्राणैकऋषिरत्ता विश्वस्य सत्पतिः ।**
**वयमाद्यस्य दातारः पिता त्वं मातरिश्व नः ॥ ११ ॥**

अन्वय व अर्थ—प्राण त्वं व्रात्यः, एकऋषिः, अत्ता, विश्वस्य सत्पतिः (हे प्राण तूं व्रात्यही आहेस, तूं एकऋषि नामक अग्नि असून सर्व हवींचा भोक्ता आहेस आणि विश्वांतील सर्व वस्तूंचा तूं स्वामी आहेस.) वयं आद्यस्य दातारः (आम्ही केवळ तुला हविर्भाग अर्पण करणारे आहों.) मातरिश्व त्वं नः पिता (हे वायो, तूं आमचा सर्वांचा पिता आहेस.) ॥ ११ ॥

ज्याला वैदिक संस्कार होत नाहींत त्याला व्रात्य असें म्हणतात. प्राणाची उत्पत्ति प्रथमच झाली असल्यामुळें व तो स्वतःसिद्ध असल्यामुळें त्याच्या संबंधानें जातकादि संस्कारविधि अशक्यच होतात. तसेंच प्राण हा सर्वद्रष्टा आहे म्हणून त्याला एकर्षि हें नांव दिलें. सर्व वस्तूंचें पालनपोषण तो करितो म्हणून त्याला सत्पति असें म्हटलें. वाणी मन इत्यादि त्यालाच खाद्य अर्पण करित असतात म्हणून तो सर्वसेव्य आहे; आणि प्राण हा सर्वव्यापी असून सर्वांचें पोषण करणारा आहे म्हणून त्याला पिता असें म्हटलें आहे. ॥ ११ ॥

---

## मंत्र बारावा.

**या ते तनूर्वाचि प्रतिष्ठिता या श्रोत्रे या च चक्षुषि। या च मनसि संतता शिवां तां कुरु मोत्क्रमीः ॥ १२ ॥**

अन्वय व अर्थ—या ते तनूः वाचि प्रतिष्ठिता, या श्रोत्रे, या च चक्षुषि, या च मनसि संतता, तां शिवां कुरु, मा उत्क्रमीः ( वाणीच्या ठिकाणीं जें तुझें स्वरूप प्रकट होतें, तसेंच कर्ण आणि नेत्र यांच्या ठिकाणीं जें तुझें रूप प्रकाशित होतें, मनाचे ठिकाणीं जी तुझी व्याप्ति असते ती प्रत्येकीं मंगलरूप होईल असें कर. आणि या देहापासून तूं दूर जाऊं नकोस ॥ १२ ॥

• वाणीची वर्णनशक्ति, कर्णांची श्रवणशक्ति, नेत्रांची दर्शनशक्ति आणि मनाची संकल्प–विकल्पात्मक शक्ति, ह्या सर्व शक्ति मुख्य प्राणाच्या निरनिराळ्या प्रतिकृति आहेत. वाणी आदि सर्व कर्मेंद्रियें आणि ज्ञानेंद्रियें प्राणाची प्रार्थना करितात. हेतु हा कीं आपापल्या इंद्रियांचें सामर्थ्य नित्य मंगलप्रद असावें म्हणून प्राणानें ह्या शरीरांत सोडून जाऊं नये.

मंत्र चारपासून मंत्र अकरापर्यंत प्राणाची स्वरूप–स्तुति आहे. बाराव्या व तेराव्या मंत्रांत इंद्रियांनीं प्राणाची प्रार्थना करून वर मागितला आहे. या स्तुतीवरून व वर–प्रार्थनेवरून प्राणाचें श्रेष्ठत्व व इंद्रियांचें गौणत्व, प्राणाचें स्वातंत्र्य व इंद्रियादिकांचें पारतंत्र्य इत्यादि स्पष्ट होतात. ॥ १२ ॥

---

## मंत्र तेरावा.

**प्राणस्येदं वशे सर्वं त्रिदिवे यत्प्रतिष्ठितम्। मातेव पुत्रान्रक्षस्व श्रीश्च प्रज्ञां च विधेहि न इति ॥ १३ ॥**

अन्वय व अर्थ—यत् त्रिदिवे प्रतिष्ठितं इदं सर्वं प्राणस्य वशे ( जें सर्व कांही त्रैलोक्यांत स्थापित झालें आहे, तें हें सर्व प्राणाच्या स्वाधीन आहे. ) माता इव पुत्रान् रक्षस्व, नः श्रीः च विधेहि ( हे प्राण, माता जशी पुत्रांचें संरक्षण करिते तसें तूं आमचें संरक्षण कर आणि आम्हांस संपत्ति आणि बुद्धि यांचें दान कर ) इति ( याप्रमाणें इंद्रियांनीं प्राणाची स्तुति केली ) ॥ १३ ॥

या मंत्रांत सारांशरूपानें प्राणाच्या श्रेष्ठत्वाचें वर्णन करून त्रैलोक्यांतील सर्व वस्तूंचा तो स्वामी आहे असें म्हटलें आणि 'आईप्रमाणें आम्हांस जतन कर आणि बापाप्रमाणें आम्हाला श्रीमंत आणि बुद्धिमान् कर' अशी प्राणाची प्रार्थना केली आहे. ॥ १३ ॥

---

या उपनिषदांतील दुसरा प्रश्न प्राणाचें स्वरूप व सामर्थ्य वर्णन करितो. श्रुति म्हणते कीं प्राण हाच शरीराचें विधारण करणारा, इंद्रियांस स्वकर्म करण्याचें व विषयप्रकाशन करण्याचें सामर्थ्य देणारा व सर्व भौतिक व स्वर्गस्थ देवतांस नियमित करणारा आहे. त्याची सत्ता असेल तर मात्र शरीर व इंद्रियें आपआपलीं कामें करूं शकतात व तो अदृश्य झाला म्हणजे शरीर कुजतें व इंद्रियें प्राणाबरोबर सहगमन करितात. तो अग्निमुख देवता आहे म्हणजे सर्व देवदेवता हीं त्याचीं स्वरूपें आहेत. तो ज्ञानाचें व कर्मांचें अधिष्ठान आहे. जीवाचा उत्पादक तो, जीवस्वरूप तो आणि आनुवंशिक व्रत चालविणाराही तोच आहे. प्राण हा सर्वपति असून त्याच्याशर्ती सर्व इंद्रियें कर्म करित असतात. देव, पितर व ऋषी यांचे हविर्भाग प्राणाच्या द्वारानें देवादिकांस मिळतात. तो ओजानें इंद्र, पालकत्वानें रुद्र, तेजानें सूर्य, पर्जन्यदानानें वरुण, अन्नोत्पत्तीनें चंद्र असून सर्वांचा आदि, सर्वांचा द्रष्टा, सर्वांचा पालक व सर्वांचा नियामक आहे. तो अचल म्हणजे सर्वांचें सौभाग्य अखंड असतें. तो सर्वस्वामी, बुद्धिदाता, समृद्धिपोषक आणि मातेप्रमाणें दयाघन आहे.

हें प्राणस्वरूप यथार्थ नाहीं, असें कोण म्हणेल? हें प्राणस्वरूप वेदकालीं जसें दिसलें तसेंच आधुनिककालींही दृश्य होतें. प्राण ही वस्तु विश्वव्यापी आहे, असें आधुनिक पंडित म्हणतात. प्राण म्हणजे चेतनाशक्ति Force असा अर्थ केला म्हणजे श्रुतिबोधित प्राणस्वरूप यथार्थ आहे, असें प्रत्येकास म्हणावें लागेल.

दुसरा प्रश्न समाप्त

## प्रश्न तिसरा.

### मंत्र पहिला.

**अथ हैनं कौसल्यश्चाऽऽश्वलायनः पप्रच्छ । भगवन्कुत एष प्राणो जायते कथमायात्यस्मिञ्शरीर आत्मानं वा प्रविभज्य कथं प्रातिष्ठते केनोत्क्रमते कथं बाह्यमभिधत्ते कथमध्यात्ममिति ॥ १ ॥**

अन्वय व अर्थ—अथ ह एनं आश्वलायनः कौसल्यः पप्रच्छ ( नंतर कौसल्यनामक अश्वलायनशिष्य पुढें झाला व त्यानें पिप्पलादमुनींस प्रश्न

केला. ) ( १ ) भगवन् कुतः एषः प्राणः जायते ? ( २ ) कथं अस्मिन् शरीरे आयाति ? ( ३ ) आत्मानं वा प्रविभज्य कथं प्रातिष्ठते ? ( ४ ) केन उत्क्रमते ? (५) कथं बाह्यं अभिधत्ते ? (६) कथं अध्यात्मं ? इति ( भगवन् ( १ ) हा प्राण कोठून उत्पन्न होतो ? ( २ ) ह्या शरीरांत तो कसा येतो ? ( ३ ) आपल्या स्वतःचे भाग व प्रतिभाग करून तो कसा स्थित होतो ? ( ४ ) तो कोणत्या मार्गानें बाहेर जातो ? ( ५ ) तो अधिभूत आणि अधिदैवत याचें धारण कसें करितो ? आणि ( ६ ) अध्यात्माचें धारण कसें करितो ? हें मला कृपा करून सांगावें.) ॥१॥

या प्रश्नांत प्राणाची उत्पत्ति त्याचा जीव–शरीराशीं संयोग, त्याचे निरनिराळे विभाग, बाहेर जाण्याचा त्याचा मार्ग, आणि त्याचें अधिभूत, अधिदैवत व अध्यात्मरूप यांचा विचार करावयाचा आहे. ॥ १ ॥

---

### मंत्र दुसरा.

**तस्मै स होवाचातिप्रश्नान्पृच्छसि ब्रह्मिष्ठोऽसीति तस्मात्तेऽहं ब्रवीमि ॥ २ ॥**

अन्वय व अर्थ—तस्मै सः उवाच ह ( कौसल्याला आचार्यांनीं प्रत्युत्तर दिलें. )–ते म्हणाले–अति–प्रश्नान् पृच्छसि ( तूं फार मोठे, गहन प्रश्न विचारिले आहेस. )–तथापि–ब्रह्मिष्ठः असि इति तस्मात् ते अहं ब्रवीमि ( तूं ब्रह्मनिष्ठ आहेस म्हणून तुला या प्रश्नांचीं उत्तरें मी देतों. ) ॥ २ ॥

या मंत्राचा भावार्थ इतकाच आहे कीं कौसल्यकृत प्रश्न अत्यंत गहन आहेत, म्हणून याची मीमांसा ब्रह्म जाणूं इच्छिणाऱ्या नैष्ठिक पुरुषानें मात्र करावी. ॥ २ ॥

---

### मंत्र तिसरा.

**आत्मन एष प्राणो जायते । यथैषा पुरुषे छायैतस्मिन्नेतदाततं मनोकृतेनाऽऽयात्यस्मिञ्छरीरे ॥ ३ ॥**

अन्वय व अर्थ—एषः प्राणः आत्मनः जायते ( हा प्राण–पूर्वी वर्णन केलेला तो मुख्य प्राण–आत्मस्वरूपापासून उत्पन्न होतो ) यथा

पुरुषे एषा छाया, एतस्मिन् एतत् आततं (ज्याप्रमाणें पुरुषाबरोबर छाया असते, त्याप्रमाणें या आत्म्यामध्यें हा प्राण समर्पित झालेला असतो) अस्मिन् शरीरे मनोकृतेन आयाति (—हा प्राण मनानें केलेल्या संकल्पादिकापासून उत्पन्न झालेल्या कर्मानें या शरीरांत प्रवेश करितो.—) ॥ ३ ॥

*या मंत्रात प्राण कसा उत्पन्न होतो व तो या शरीरांत कोणत्या मार्गानें येतो या पहिल्या दोन प्रश्नांची उत्तरें दिलीं आहेत. प्राणाची उत्पत्ति आत्मस्वरूपापासून होते. ती कशी म्हणशील, तर पुरुषाची छाया जशी पुरुषापासून उत्पन्न होते तसा प्राण आत्म्यापासून उत्पन्न होतो. दिवसा उन्हांत चाललों असतां आपली छाया पडते तशीच प्राणाची उत्पत्ति आत्म्यापासून आहे.' किंवा प्रत्येक पुरुषाच्या शरीराभोंवतीं एक अदृश्य छायापुरुष असतो, तो योगी लोकांस मात्र प्रत्यक्ष असतो. पहिली छाया घ्या किंवा दुसरा छायापुरुष घ्या; दोन्हीही अमूर्त आणि असद् वस्तु आहेत. तात्पर्य, प्राणही आत्मस्वरूपासारखी खरी वस्तु नव्हे. सूर्याच्या व शरीराच्या उपाधींनीं छाया उत्पन्न होते, व ती उपाधींच्या अभावीं नसते. म्हणून ती छाया वस्तुरूप नसते. हीच कथा प्राणाची आहे. म्हणजे प्राण हा सोपाधिक आत्म्यापासून उत्पन्न होतो व तो वस्तुतः सद्रूपी नसतो. शरीराची सावली पडली असतां शरीराच्या प्रमाणांत जसें न्यूनाधिक्य होत नाहीं, तें जसेंच्या तसेंच असतें, सावली मात्र येते जाते, त्याप्रमाणें प्राण उत्पन्न झाला म्हणून आत्मस्वरूपांत कोणताही विकार उत्पन्न होत नाहीं. प्राण येतो जातो, पण आत्मस्वरूपानें जसाच्या तसाच असतो. अर्थात् हें पहिल्या प्रश्नाचें उत्तर आहे. आतां दुसऱ्या प्रश्नासंबंधानें इतकेंच म्हणावयाचें कीं जड शरीरामध्यें या असद्वस्तूचा प्रवेश होतो, तो मनानें संकल्प केल्यामुळें जें कर्म उत्पन्न होतें त्या कर्माच्या द्वारानें जीव–शरीरांत प्राणाचा प्रवेश होतो. याप्रमाणें छायारूपी प्राणाची उत्पत्ति आणि संकल्पकृत कर्माच्या द्वारानें त्याचा शरीरांत प्रवेश. या दोन गोष्टी ठरल्या.*

*मनोतील मनोकृत हें पद आर्ष आहे 'मनस्कृतेन' हा शुद्ध प्रयोग होईल.* ३

---

## मंत्र चौथा.

**यथा सम्राडेवाधिकृतान्विनियुङ्क्ते । एतान्ग्रामानेतान्ग्रामानधितिष्ठस्वेत्येवमेवैष प्राण इतरान्प्राणान्पृथक्पृथगेव संनिधत्ते ॥ ४ ॥**

अन्वय व अर्थ—यथा सम्राट् एव अधिकृतान् विनियुङ्क्ते 'एतान् ग्रामान् एतान् ग्रामान् अधितिष्ठस्व' इति (ज्याप्रमाणें कोणी चक्रवर्ती

राजा अधिकाऱ्यांची नेमणूक करितो आणि ' ह्या ग्रामावर तुम्ही सत्ता चालवा, ह्यावर तुम्ही सत्ता चालवा ' अशी आज्ञा करितो ) **एवं एषः प्राणः इतरान् प्राणान् पृथक् पृथक् एव संनिधत्ते** ( त्याप्रमाणें हा मुख्य प्राण इतर नेत्रादि प्राणांस निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळे अधिकार मात्र देऊन नेमितो ) ॥ ४ ॥

मुख्य प्राण हा सर्व इतर प्राणांचा अधिपति आहे. हे इतर प्राण कोणते हें पुढील चार पांच मंत्रांत स्पष्ट होईल. चक्रवर्ती राजाच्या आज्ञेनें त्याचे कित्येक अधिकारी निरनिराळ्या ग्रामांचा कार्यभाग ( कारभार ) करितात, त्याप्रमाणें प्राणांचा अधिपति जो मुख्य प्राण तो निरनिराळ्या प्राणांस निरनिराळीं कामें सांगून त्या सर्वांवर देखरेख करीत असतो. सारांश, शरीराची सर्व गतिस्थिति व चलनवलन मुख्य प्राणाच्या तंत्रानें चाललेलीं असतात हें आतांच्या मंत्रावरून स्पष्ट होत आहे. ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा.

**पायूपस्थेऽपानं चक्षुःश्रोत्रे मुखनासिकाभ्यां प्राणः स्वयं प्रातिष्ठते मध्ये तु समानः । एष ह्येतद्धुतमन्नं समं नयति तस्मादेताः सप्तार्चिषो भवन्ति ॥ ५ ॥**

अन्वय व अर्थ—**पायूपस्थे अपानं, चक्षुःश्रोत्रे प्राणः मुखनासिकाभ्यां स्वयं प्रातिष्ठते** ( पायु आणि उपस्थ यांच्यामध्यें अपान वायूची स्थापना होते. मुखांतून आणि नासिकेंतून आंत बाहेर येणारा प्राण नेत्र आणि कर्ण यांचे ठिकाणीं आपण स्वतः राहतो. ) **मध्ये तु समानः** ( प्राण आणि अपान यांच्यामध्यें समान वायु राहतो. ) **एषः तु एतद् हुतं अन्नं समं नयति** ( हा समान वायु खाल्लेलें अन्न समस्थितीला नेतो म्हणून त्याला समानवायु म्हणतात. ) **तस्मात् एताः सप्तार्चिषः भवन्ति** ( तेथून ह्या सात ज्वाला उत्पन्न होतात. ) ॥ ५ ॥

या मंत्रांत प्राण, अपान आणि समान हा तीन प्राणविभागांचा विचार केला आहे. अपानवायु हा मलद्वाराचे ठिकाणीं राहून मल-विसर्जनादि कामें करितो. स्वतः प्राणवायु हा मुखनासिकांच्या द्वारानें आंत बाहेर येऊन जाऊन नेत्र आणि कर्ण यांचे ठिकाणीं राहातो. समान वायु हा प्राण आणि अपान यांच्या मध्यें राहून जीवानें स्वीकृत केलेल्या अन्नपानादिकांस एकरस करितो. याप्रमाणें दोन डोळे;

दोन कान, दोन नासिकाद्वारें प्राण आणि मुख ह्या सात ज्वाला उत्पन्न होतात. हृदयांत जो जठराग्नि आहे, त्याच्या जणूं कांहीं ह्या सात ज्वालाच होत. तात्पर्य, हृदयांत तयार झालेल्या अन्नरसरूपी जीवनानें आपलीं दर्शन श्रवणादि इंद्रियें स्वस्वकार्य करण्यास समर्थ होतात. याप्रमाणें मुख्य प्राणाच्या तीन विभागांचीं स्थानें व त्यांचीं कर्में सांगितलीं. ॥ ५ ॥

## मंत्र सहावा.

**हृदि ह्येष आत्मा। अत्रैतदेकशतं नाडीनां तासां शतं शतमेकैकस्यां द्वासप्ततिर्द्वासप्ततिः प्रतिशाखानाडीसहस्राणि भवन्त्यासु व्यानश्चरति ॥ ६ ॥**

अन्वय व अर्थ—हृदि हि एषः आत्मा ( आपला आत्मा हृदयाकाशाचे ठिकाणीं राहतो. ) अत्र नाडीनां एतत् एकशतं ( येथें मुख्य नाडींचें एक शतक व एक आहे. म्हणजे एकशेंएक नाड्या आहेत. ) तासां शतं शतं ( त्या प्रत्येक नाडीच्या शेंभर शेंभर शाखानाड्या आहेत. ) एकैकस्यां द्वासप्ततिः द्वासप्ततिः प्रतिशाखानाडीसहस्राणि भवन्ति ( एकेका शाखानाडीच्या बहात्तर हजार प्रतिशाखानाड्या असतात, ) आसु व्यानः चरति ( यांच्या मधून व्यानवायु संचार करीत असतो. ) ॥ ६ ॥

ह्या मंत्रांत जीवाच्या शरीरांत असणाऱ्या नाड्यांची संख्या दिली आहे. ती अशी—

| | |
|---|---|
| १०१ | प्रधान नाड्या |
| १०१०० | शाखा नाड्या |
| ७२७२०००० | प्रतिशाखा नाड्या |
| ७२७२१०२०१ | |

या प्रमाणें मनुष्याच्या शरीरांत बहात्तर कोटी बहात्तर लक्ष दहा हजार दोनशें एक नाड्या आहेत. या नाड्यांतून ज्या वायूचा संचार होतो, त्याला व्यानवायु म्हणतात. मुख्य प्राणाचा हा एक विभाग आहे. शरीराच्या सर्व भागांस रक्त पाहोंचविणें आणि मलीन झालेलें रक्त पुनः हृदयांत शुद्धीकरणार्थ आणणें हें या वायूचें काम आहे.

हा वायु सर्व-व्यापक आहे म्हणून याला व्यान म्हणतात. रक्तविभाजन करण्याच्या कामाप्रमाणेंच या वायूकडे सर्व वीर्यशाली कर्में घडवून आणण्याची व्यवस्था सोंपविली आहे. ॥ ६ ॥

## मंत्र सातवा.

**अथैकयोर्ध्व उदानः पुण्येन पुण्यं लोकं नयति पापेन पापमुभाभ्यामेव मनुष्यलोकम् ॥ ७ ॥**

**अन्वय व अर्थ**—अथ एकया ऊर्ध्वः उदानः ( आतां एका ऊर्ध्वगामी नाडीच्या द्वारानें कर्म करणारा जो वायु आहे त्याला उदान वायु म्हणतात. ) पुण्येन पुण्यलोकं, पापेन पापं उभाभ्यां एव मनुष्यलोकं नयति ( हा वायु जीवानें पुण्यकर्म केलें असतां स्वर्गादि देवलोकास नेतो, पापकर्म केलें असतां नरकलोकास नेतो आणि पापपुण्य समान असतां, जीवाला मनुष्यलोकास नेतो. ) ॥ ७ ॥

मागच्या मंत्रांत प्रधान नाड्या एकशेंएक आहेत म्हणून सांगितलें त्यांतील एक नाडी ऊर्ध्व-गामिनी आहे. इला सुषुम्ना नाडी असें म्हणतात. जीवाच्या सत्कर्म दुष्कर्मानुसार ही नाडी जीवाला स्वर्ग, नरक अथवा मनुष्य लोक प्राप्त करून देते. या नाडींतून संचार करणारा वायु पायाच्या तळव्यापासून डोक्यापर्यंत आपली सत्ता चालवितो. ज्या स्थानांतून उदान वायु बाहेर गेल्यामुळें मनुष्य गतप्राण होतो, त्या स्थानावरून तो स्वर्गलोकीं गेला किंवा दुसऱ्या कोठें गेला हें चाणाक्ष पुरुषांस कळतें, असा समज आहे. उदान वायु हा प्राणाचा पांचवा भाग होय. सुषुम्ना नाडी हें त्याचें स्थान आहे. या प्रमाणें प्राण-विभागांचें वर्णन होऊन प्राण कोणत्या द्वारानें बाहेर जातो याचेंही संकीर्तन झालें. आतां यापुढें अधिभूत, अधिदैवत इत्यादिकांचें वर्णन यावयाचें आहे. ॥ ७ ॥

---

## मंत्र आठवा.

**आदित्यो ह वै बाह्यः प्राण उदयत्येष ह्येनं चाक्षुषं प्राणमनुगृह्णानः । पृथिव्यां या देवता सैषा पुरुषस्यापानमवष्टभ्यान्तरा यदाकाशः स समानो वायुर्व्यानः ॥ ८ ॥**

**अन्वय व अर्थ**—आदित्यः ह वै बाह्यः प्राणः ( आदित्य अथवा सूर्य हा बाह्य प्राण आहे. ) एनं चाक्षुषं अनुगृह्णानः हि एषः उदयति ( डोळ्यांतील प्राणावर अनुग्रह करीत होत्साता हा सूर्य उगवतो. ) पृथिव्यां या देवता सा एषा पुरुषस्य अपानं अवष्टभ्य ( पृथ्वीची जी

अधिष्ठात्री देवता आहे. ती पुरुषाच्या अपान-वृत्तीवर आपली सत्ता चालवून अपानावर अनुग्रह करिते ) यत् अन्तरा आकाशः सः समानः ( सूर्य आणि पृथ्वी यांच्यांमध्यें जी आकाश देवता आहे. तेथें राहणारा वायु समान वायूवर अनुग्रह करितो. ) वायुः व्यानः ( आणि सामान्य वायु व्यानावर अनुग्रह करितो. ) ॥ ८ ॥

येथें आधिदैविक व आधिभौतिक देवता प्राणाच्या निरनिराळ्या भागांवर ( अध्यात्मावर कसा अनुग्रह करितात हें व प्राणाचें आधिदैवतादिस्वरूप सांगितलें आहे. सूर्य हा डोळ्यांवर अनुग्रह करून जीवाला दर्शनसामर्थ्य देतो. पृथ्वी ही देवता अपान वायूवर अनुग्रह करून जीवांस खालीं पडूं न देतां त्याचें शरीरसंरक्षण करिते. समान वायूची अनुग्राहक आकाशदेवता आणि व्यानाची वायुदेवता आहे. तात्पर्य, सूर्यादि देवता प्राणरूप आहेत, हें मागें सांगितलें आहे. या मंत्रांत जीवाच्या देहांत व इंद्रियांत जो अध्यात्मप्राण असतो, त्याच्यावर विश्वप्राणाच्या देवता कसा अनुग्रह करितात हें सांगितलें. विश्वप्राण हे देहस्थप्राणाचीं कशीं स्वरूपें आहेत, हें या मंत्रावरून समजतें आणि प्राणरूपी तत्त्व सर्वव्यापी व एकरस आहे, असा निश्चय होतो. प्राण स्वरूपतः एकच आहे, उपाधींच्या भिन्नतेमुळें तो निराळा वाटतो, हें तत्त्व लक्ष्यांत ठेवणें अत्यंत अवश्य आहे. ॥ ८ ॥

---

## मंत्र नववा.

तेजो ह वा उदानस्तस्मादुपशान्ततेजाः । पुनर्भवमिन्द्रियैर्मनसि संपद्यमानैः ॥ ९ ॥

अन्वय व अर्थ—तेजः ह वै उदानः ( सामान्य जें तेज आहे तें उदान वायूवर अनुग्रह करितें. ) तस्मात् उपशान्ततेजाः मनसि संपद्यमानैः इंद्रियैः पुनर्भवं ( म्हणून ज्या जीवांचें तेज नाहींसें झालें आहे, तो आसन्नमरण पुरुष मनामध्यें लीन झालेल्या इंद्रियांसह पुनः जन्म घेतो. ) ॥ ॥९॥

मागील मंत्रांत बाह्य अनुग्राहकांचें वर्णन झालें व तेथेंच अध्यात्मावरील अनुग्रहाचेंही वर्णन झालें. उदान वायूवर सामान्य तेजाचा अनुग्रह होतो. मुख्य प्राण वायु हा सूर्य, अग्नि इत्यादि देवतांवर अनुग्रह करून त्यांचें धारण करितो. आणि प्राणापानादिकांवर अनुग्रह करून त्यांच्या द्वारानें ते ज्या शरीराचे ग्राहक असतात त्यावर ही अनुग्रह करितो. म्हणजे मुख्यप्राण हा अनेक प्राणापानादि स्वरूपें धारण करून त्यांच्या योगानें त्या शरीराची व शरीरभागांची धारणा करितो. अर्थातच भौतिक जें शरीर त्याच्यावर मुख्यप्राणाचा अनुग्रह होतो.

तसेंच प्राण हाच नेत्र आहे, वाणी आहे, इत्यादि श्रुति आहे म्हणून नेत्र कर्णादि इंद्रियें हीं प्राणरूपच होत. नेत्र-श्रवणादि इंद्रियास जीं रूपशब्दादि ज्ञानें होतात, तीं मुख्य प्राणाच्या अनुग्रहानेंच होतात. एवंच सूर्यादि देवता प्राणरूप, चक्षु श्रवणादिकांचीं शारीरिक स्थानेंही प्राणरूप आणि रूप शब्दादि जे विशेष अध्यात्म संस्कार होतात तेही प्राणरूपच आहेत. सारांश, सर्वांवर प्राणाचा अनुग्रह आहे. आधिभूत, अधिदैव आणि अध्यात्मस्वरूपानें सर्वांवर मुख्य प्राणाचा अनुग्रह आहे. हा प्राणाचा अनुग्रह जोंपर्यंत असतो तोंपर्यंत जीव जिवंत राहतो. पण ज्यावेळीं हा अनुग्रह नाहींसा होतो, उदानावर तेजाचा अनुग्रह होत नाहीं, तेव्हां जीव मरणासन्न होतो असें या मंत्रांत सांगि-तलें. ज्या जीवाच्या मनाचे संकल्प विकल्प संपले नाहींत त्याची वाणी, नेत्र, कर्ण इत्यादि इंद्रियें मनामध्यें प्रवेश करितात. आणि हा असा बनलेला लिंगदेह दुसऱ्या शरीरांत प्रवेश करितो. हा मंत्र वाचतांना गीतेंतील १५ व्या अध्यायाची आठवण कोणास होणार नाहीं! यावरून असें ठरतें कीं जोंपर्यंत वासना आणि संकल्प जिवंत आहेत, तों पर्यंत अज्ञान संपत नाहीं तोंपर्यंत जीवाची जन्म-मरण यात्राही संपत नाहीं. तथापि मुख्य गोष्ट ही लक्षांत ठेवावयाची कीं, प्राणाचा अनुग्रह नाहींसा झाला म्हणजे जीवाचें आयुष्य-सूत्र त्रुटित होतें. ॥९॥

---

## मंत्र दहावा.

**यच्चित्तस्तेनैष प्राणमायाति प्राणस्तेजसा युक्तः।**
**सहाऽऽत्मना यथासंकल्पितं लोकं नयति ॥ १० ॥**

अन्वय व अर्थ—यच्चित्तः तेन एषः प्राणः ( मनुष्याचे जे संकल्प असतील त्यांच्यासह हा प्राण मुख्य प्राणामध्यें प्रवेश करितो. ) तेजसा युक्त -प्राण -आत्मना सह यथा संकल्पितं लोकं नयति ( नंतर तेजानें युक्त झालेला प्राण आपल्या स्वामीसह अशा लोकाला जातो कीं जेथें जाणें त्या स्वामीला इष्ट असतें. ) ॥ १० ॥

या मंत्रांत असें सांगितलें आहे कीं, मनुष्य मरणासन्न झाला म्हणजे त्याचा उदानवायु त्याच्या वासनांसह मुख्य प्राणांत प्रवेश करितो. नंतर हा प्राण भोगाची वासना असणाऱ्या जीवासह शरीर सोडून बाहेर जातो. पुढें हा प्राण वायु आपल्या स्वामीस ( जीवास ) इष्ट असणाऱ्या म्हणजे पापपुण्यानुसार सिद्ध झालेल्या वासनांच्या अनुरोधानें निश्चित झालेल्या लोकीं घेऊन जातो. ॥ १० ॥

---

### मंत्र अकरावा.

**य एवं विद्वान्प्राणं वेद। न हास्य प्रजा हीयतेऽमृतो भवति तदेषः श्लोकः ॥ ११ ॥**

अन्वय व अर्थ—यः विद्वान् प्राणं एवं वेद, न ह अस्य प्रजा हीयते; अमृतः भवति ( ज्या विद्वान पुरुषाला प्राणाचें हें श्रुत्युक्त स्वरूप समजलें त्याची प्रजा केव्हांही नाहींशी होत नाहीं. तसेंच तो पुरुष अमर होतो ) तत् एषः श्लोकः ( हा सिद्धांत समर्थन करणारा पुढील श्लोक आहे. ) ॥ ११ ॥

या मंत्रांत प्राणाचें ज्ञान असणाऱ्या पुरुषाचें ऐहिक कल्याण होतें. म्हणजे त्याचा वंशच्छेद होत नाहीं. त्याला पारमार्थिक फळही प्राप्त होतें. म्हणजे तो पुरुष प्राणरूप होऊन अमर होतो. सारांश, त्याला ऐहिक व पारमार्थिक सुखाचा लाभ होतो. प्राणाचें स्वरूप समजून घेऊन जें कुळ प्रजापतिव्रताचें अनुष्ठान करितें, त्याचा वंशवृक्ष अखंड राहतो व त्या वंशीं कुळांतील विद्वान पुरुष कल्पपर्यंत सूर्यलोकीं अमर होऊन राहतात. ही फलश्रुति होय. ॥ ११ ॥

---

### मंत्र बारावा.

**उत्पत्तिमायतिं स्थानं विभुत्वं चैव पञ्चधा।**
**अध्यात्मं चैव प्राणस्य विज्ञायामृतमश्नुते विज्ञायामृतमश्नुत इति ॥ १२ ॥**

अन्वय व अर्थ—प्राणस्य उत्पत्तिं, आयतिं, स्थानं, विभुत्वं च पञ्चधा एव, अध्यात्मं च एव विज्ञाय अमृतं अश्नुते, विज्ञाय अमृतं अश्नुते इति ( प्राणाची उत्पत्ति, त्याचें आगमन, त्याचीं स्थानें, त्याचें स्वामित्व, त्याचे पाच विभाग आणि त्याचें आध्यात्मिक, आधिदैविक व आधिभौतिक स्वरूप समजलें असतां जीवाला प्राणरूपी अमरत्व प्राप्त होतें. )॥१२॥

वरील १० मंत्रांत कौसल्यास जीं उत्तरें दिलीं व अकराव्या मंत्रांत जी फलश्रुति सांगितली त्यांचाच अनुवाद या मंत्रांत केला आहे. ॥ १२ ॥

**येथें तिसरा प्रश्न समाप्त झाला.**

या प्रश्नांत प्राणाच्या गमनागमनाचे उपप्रश्न उत्पन्न करून त्याचें पूर्ण स्वरूप उद्घाटित केलें आहे.



---

## प्रश्न चवथा.

### मंत्र पहिला.

**अथ हैनं सौर्यायणी गार्ग्यः पप्रच्छ ॥**

अन्वय व अर्थ—अथ सौर्यायणी गार्ग्यः एनं पप्रच्छ ह ( नंतर सूर्य कुलोत्पन्न गार्ग्यानें–गर्गगोत्रोत्पन्न पुरुषानें पिप्पलादमुनींस विचारिलें.)

**भगवन्नेतस्मिन्पुरुषे कानि स्वपन्ति कान्यस्मिञ्जाग्रति कतर एष देवः स्वप्नान्पश्यति कस्यैतत्सुखं भवति कस्मिन्नु सर्वे संप्रतिष्ठिता भवन्तीति ॥ १ ॥**

अन्वय व अर्थ—( १ ) भगवन् एतस्मिन् पुरुषे कानि स्वपन्ति ( २ ) अस्मिन् कानि जाग्रति, ( ३ ) कतरः एषः देवः स्वप्नान् पश्यति, (४) कस्य एतत् सुखं भवति, (५) नु कस्मिन् सर्वे संप्रतिष्ठिताः भवन्ति इति १ भगवन्, ह्या पुरुषामध्यें कोण झोंपी जातात, २ कोण जागृत राहतात, ३ कोणता देव स्वप्नें पाहतो, ४ कोणाला सुख प्राप्त होतें आणि ५ कोणच्या ठिकाणीं हे सर्व प्रतिष्ठित होतात ? या प्रश्नांची उत्तरें मला द्यावीं. ) ॥ १ ॥

येथें पांच प्रश्न विचारिले आहेत. (१) पुरुषाला स्वप्न पडत असतां किंवा तो निद्रेंत असतां त्याचीं कोणतीं इंद्रियें झोंपी जातात, २ कोणतीं जागृत असतात ( ३ ) स्वप्नाचा द्रष्टा कोण ? ( ४ ) निद्रेमध्यें जें सुख उत्पन्न होतें, त्याचा भोक्ता कोण ? ( ५ ) आणि गाढ निद्रा लागली असतां हीं सर्व इंद्रियें कोठें जाऊन लीन होतात, असे हे पांच प्रश्न आहेत. वाचकांच्या ध्यानांत येईलच कीं, प्रश्नोपनिषदांतील पहिल्या तीन प्रश्नांत चराचरात्मक जगतीच्या व्यवहाराचा विचार झाला आहे. चौथा प्रश्न हा व्यवहाराच्या पलीकडचा आहे. येथें जागृत स्थिति संपून स्वप्नस्थिति व निद्रास्थिति यांस आरंभ झाला. आपलीं कर्मेंद्रियें व ज्ञानेंद्रियें स्तब्ध झालीं असतांही स्वप्नामध्यें व्यवहार चालतोसा दिसतो, तेव्हां आपल्याला प्राप्त झालेल्या उपकरणांत कोणतीं इंद्रियें झोंपी जातात, कोणतीं जागृत असतात, स्वप्नाला पाहतो कोण ? गाढनिद्रेमध्यें सुख कोणाला होतें ? इत्यादि प्रश्न जागृत जीवाचे अथवा व्यवहारी जीवाचे संबंधानें नव्हेत; इंद्रियें स्वकर्मनिवृत्त झालीं असतांही आपण स्वप्नें पाहतों व व्यापार करितों असें भान असतें. तेव्हां सहजच प्रश्न उत्पन्न होतो कीं, स्वप्नस्थितींत जागें तरी कोण असतें ? स्वप्नें पाहणार कोण ? आणि निद्राकालीं मनबुद्धि निर्व्यापार असतांही सुखाचा अनु-

भव येतो तो कोणाला ? या प्रश्न-परंपरेवरून असें दिसतें कीं गार्ग्याचा अभिप्राय इंद्रियातीत असणाऱ्या कोणा एकाचें स्वरूप काय आहे हें समजावें. जागृति, स्वप्न, आणि सुषुप्ति यांच्या पलीकडे असून नेत्र कर्णादि व बुद्धिमनादि ज्ञानोपकरणें व कर्मसाधनें नसणारा असा जो कोणी एक आहे, त्याचें स्वरूप समजून घ्यावें. अर्थात् [illegible] प्रश्न आत्मविषयक आहे. अर्थातच येथें व्यावहारिक शास्त्राची मात्रा चालत नाहीं. कारण व्यवहारशास्त्रें भौतिक असोत, अथवा मानसिक असोत, वा सामाजिक अथवा नैतिक असोत, त्यांचे सिद्धांत व त्यांचे नियम सांगतां येण्यासारख्या अनुभवावरून व परंपरेवरून सिद्ध झालेले असतात. पण जागृत स्थिति संपून निद्रास्थिति किंवा मुमुर्षस्थिति प्राप्त झाली, म्हणजे येथें बाह्य अनुभवाचें राज्य संपलें, अनुभवजन्य अथवा परंपराप्राप्त शास्त्राचें येथें कांहीं चालत नाहीं. शब्दांनीं किंवा इतर दृश्य चिन्हांनीं जेथील गोष्टी समजत नाहींत, तेथें विचारी शास्त्रें काय करणार ? म्हणून हे निद्रास्थितींतील अनुभव व त्याची मीमांसा सुघटित करण्यास श्रुतीची (अपौरुषेय ग्रंथांची) आवश्यकता आहे. शंकराचार्यांनीं म्हटल्याप्रमाणें येथून पुढें आतां पराविद्येला आरंभ झाला आहे; म्हणून हा विषय आत्मपर आहे. याचें दिग्दर्शन एक श्रुति मात्र करूं शकते. ॥ १ ॥

---

### मंत्र दुसरा.

तस्मै स होवाच। यथा गार्ग्य मरीचयोऽर्कस्यास्तं गच्छतः सर्वा एतस्मिंस्तेजोमण्डल एकीभवन्ति। ताः पुनः पुनरुदयतः प्रचरन्त्येवं ह वै तत्सर्वं परे देवे मनस्येकीभवति। तेन तर्ह्येष पुरुषो न शृणोति न पश्यति न जिघ्रति न रसयते न स्पृशते नाभिवदते नाऽऽदत्ते नाऽऽनन्दयते न विसृजते नेयायते स्वपितीत्याचक्षते ॥ २ ॥

अन्वय व अर्थ—तस्मै स ह उवाच (गार्ग्याला पिप्पलाद मुनींनीं उत्तर दिलें) गार्ग्य! अस्तं गच्छतः अर्कस्य सर्वाः मरीचयः यथा एतस्मिन् तेजोमंडले एकीभवन्ति, पुनः पुनः उदयतः प्रचरन्ति (गार्ग्यशिष्य! अस्ताला जाणाऱ्या सूर्याचे सर्व किरण ह्या तेजोमंडलामध्यें सामावून जाऊन एकरूपी होतात आणि पुनः पुनः सूर्योदय झाला असतां हे किरण सर्वत्र संचार करितात.) एवं ह वै परे देवे मनसि तत् सर्वं एकीभवति (त्या प्रमाणें इंद्रियांच्या पलीकडे असणारें व

इंद्रियांस प्रकाशित करणारें जें मन त्यामध्यें हीं सर्व इंद्रियादि उपकरणें लीन होतात. ) तेन तर्हि एषः पुरुषः न शृणोति, न पश्यति, न जिघ्रति न रसयते, न स्पृशते, न, विसृजते, न ईयायते, स्वपिति इति आचक्षते ( म्हणून हा पुरुष ऐकत नाहीं, पाहत नाहीं, याला वास येत नाहीं, रसज्ञान होत नाहीं, हा स्पर्श करीत नाहीं, बोलत नाहीं, कांहीं देत घेत नाहीं, त्याला आनंद होत नाहीं, तो जात येत नाहीं. अशी स्थिति असली म्हणजे तो निजलेला असें म्हणतात. ॥ २ ॥

या मंत्रांत असें सांगितलें आहे कीं निद्राकालीं आपलीं सर्व ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें मनामध्यें प्रवेश करून लीन होतात. हीं सर्व इंद्रियें मनाच्या तंत्रानें स्वस्वव्यापार करितात; त्यावेळीं पुरुष जागा असतो. पण तो ज्यावेळीं झोंपीं जातो, त्यावेळीं हीं सर्व ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें व्यापारविन्मुख होऊन मनामध्यें शिरून एकरूप (मनोरूप) होतात. अर्थातच या वेळीं निद्रागत पुरुषाला बाह्य विषयांचें ज्ञान होणाऱ्या पण स्तब्ध झालेल्या इंद्रियांच्या द्वारें कोणत्याही विषयाचें ज्ञान होत नाहीं. तसेंच त्यांचीं सर्व कर्मेंद्रियेंही स्तब्ध असतात. यालाच निद्रा असें म्हणतात. मनाच्या तंत्रानें सर्व इंद्रियें आपापलीं कर्में करितात किंवा विषय प्रकाशितात हा श्रुतीचा सिद्धांत आधुनिक मानसिक सिद्धांताची पूर्ण पूर्वकृति आहे. केवळ इंद्रियें विषयग्रहणाला किंवा विषयाचें ज्ञान करून घेण्याला समर्थ नाहींत, मनाचें साहाय्य असल्याशिवाय इंद्रियांना विषयज्ञान होत नाहीं किंवा विषय देतां घेतां येत नाहीं, हा सिद्धांत सर्वमान्य आहे. मंत्रांत मनाला देव ( विषय-प्रकाशक ) असें म्हटलें आहे, तें सर्वथा योग्य आहे. त्याच्याच तंत्रानें सर्व इंद्रियें स्वकर्म करितात आणि झोंपेच्या काळींही मनांतच लीन होतात. सारांश, सूर्य उदित झाला म्हणजे त्यापासून निघणारे किरण सर्व विषय प्रकाशित करितात आणि तो अस्ताला गेला म्हणजे ते सर्व किरण सूर्यबिंबांत प्रविष्ट होतात. लीनकालीं किरणांस विषयप्रकाशनाचें सामर्थ्य असत नाहीं. हा प्रकार आपण नित्य पाहतों. असाच इंद्रियांचा व मनाचा संबंध आहे. सारांश, निद्राकालीं ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें झोंपीं जातात. हें गार्ग्याच्या पहिल्या प्रश्नाचें उत्तर आहे. इंद्रियें मनोरूप होतात, ही गोष्ट ध्यानांत ठेवावी. मनस्तंत्रानें चालणारीं इंद्रियें केव्हां केव्हां मन जाग्यावर नसलें तरी आपापलीं कामें करितात, असा क्वचित् प्रसंगीं अनुभव येतो. पण इंद्रियें मनोरूप झालीं म्हणजे विषयदर्शनाचें त्यांचें काम निःशेष संपतें. हा आर्यसिद्धांताचा विषय-विशेष लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे. ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**प्राणाग्नय एवैतस्मिन्पुरे जाग्रति। गार्हपत्यो ह वा एषोऽपानो व्यानोऽन्वाहार्यपचनो, यद्गार्हपत्यात्प्रणीयते प्रणयनादाहवनीयः प्राणः ॥ ३ ॥**

अन्वय व अर्थ—एतस्मिन् पुरे प्राणाग्नयः एव जाग्रति ( हा शरीर-नगरींत पंचप्राणरूप अग्नि–अग्निरूप पंचप्राण–हे मात्र जागृत असतात. ) एषः अपानः गार्हपत्यः ह वै ( पंचप्राणांतील अपान हा गार्हपत्य अग्नि आहे. ) व्यानः अन्वाहार्यपचनः ( व्यान हा अन्वाहार्यपचन अथवा दक्षिणाग्नि आहे. ) यत् गार्हपत्यात् प्रणीयते, प्रणयनात् प्राणः आहवनीयः ( जो गार्हपत्य अग्नीपासून घेतला जातो तो आहवनीय अग्नि म्हणजे प्राण होय, ) ॥ ३ ॥

वैदिकधर्म ठाऊक असणाऱ्या वाचकांस हें सांगावयास नकोच कीं, अग्नि-होत्रामध्यें विशेष प्रकारचीं तीन कुंडें असतात. त्यांस प्रत्येकीं गार्हपत्य, दक्षिण आणि आहवनीय अशीं नांवें आहेत. गार्हपत्य अग्नि हा प्रत्येक गृहस्थानें ठेवला पाहिजे. लग्न झाल्या दिवसापासून तो मरणापर्यंत हा अग्नि प्रत्येक गृह-स्थाच्या घरीं पिढीदरपिढीला जिवत असावा लागतो. दुसरे; सर्व अग्निहोत्र-संबंधी किंवा इतर धार्मिक संबंधी संस्कारांत लागणारा अग्नि गार्हपत्य अग्नी-पासूनच घेत असतात. आहवनीय अग्नीचें कुंड पूर्वेकडे असतें व दक्षिणाग्नीचें कुंड दक्षिणेकडे असतें. दक्षिणाग्नीमध्यें दर्शकालीं अथवा श्राद्धपक्षादिकालीं द्यावे लागणारे पिंडाची आहुति देतात. याप्रमाणें तीन अग्नींची व्यवस्था सांगितली. पंचप्राण हे आपल्या शरीरांतील पंचाग्नि आहेत. त्यांतील अपान हा गार्हपत्याच्या स्थानीं आहे. या अपानवायूपासूनच मुख–नासिकांच्या द्वारानें संचार करणारा प्राण ग्रहण केलेला असतो. व्यान हा हृदयाच्या दक्षिणनाडीनें बाहेर येतो व तो सर्व शरीरभर पसरतो, म्हणून त्याला दक्षिणाग्नीचें नांव दिलें आहे. वैदिक धर्मानें चालणाऱ्या आर्यांच्या घरीं अग्नि नित्य जागृत असतो. त्याप्रमाणें शरीर-नगरींतील अपान, व्यान, आणि प्राण हे नित्य जागृत असतात. समान व उदान हेही प्राण जागृत असतात; पण यांचें वर्णन पुढील मंत्रांत येणार आहे. असो; इंद्रियें निद्रित झालीं असतां जागें कोण राहतें, या प्रश्नाला प्राण जागृत राहतात हें उत्तर आहे. ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**यदुच्छ्वासनिश्वासावेतावाहुती समं नयतीति स समानः। मनो ह वाव यजमान इष्टफलमेवोदानः स एनं यजमानमहरहर्ब्रह्म गमयति ॥ ४ ॥**

अन्वय व अर्थ—यत् उच्छ्वासनिश्वासौ एतौ आहुती समं नयति इति सः समानः (आपले उच्छ्वास आणि निश्वास या दोन आहुति आहेत. त्या दोन आहुती साम्य स्थितीला नेऊन जो शरीररक्षण करितो तो समानवायु होय.) मनः ह वाव यजमानः (मन खरोखर यजमान आहे.) उदानः इष्टफलं एव (उदान वायु हा इष्ट फल अथवा इष्ट फलाचा दाता आहे.) सः एनं यजमानं अहरहः ब्रह्म गमयति (हा उदान वायु यजमानाला प्रत्येक दिवशी ब्रह्मस्वरूपाकडे नेतो.) ॥ ४ ॥

या मंत्रांत समान आणि उदान या दोन वायूंचा विचार केला आहे. आपण तिन्ही अवस्थांमध्ये बाहेर श्वास टाकणें व आंत श्वास घेणें यांची म्हणजे श्वासो-च्छ्वासाची क्रिया करीत असतों. श्वासोच्छ्वास (श्वास व उच्छ्वास) ह्या दोन नित्य आहुति आहेत. या आहुति देणारा समानवायु आहे. समानवायु हा होता होय. स्वतः समान हा जरी अग्निरूप आहे तथापि तो श्वासोच्छ्वासरूपी आहुति देतो, म्हणून त्याच्याकडे होतृत्व येतें. उदानवायूच्या साहाय्यानें आपल्याला इष्ट-प्राप्ति होते, म्हणून त्याला फल असें म्हटलें. या अग्निहोत्राचा यजमान मन आहे. याप्रमाणें अपान, व्यान, आणि प्राण हे तीन अग्नि, समान हा होता, मन यजमान आणि उदान यज्ञ-फल दाता आहे. असो; जसें ज्ञान किंवा जसें कर्म असेल त्या-प्रमाणें उदानवायु फल देतो असें मागें सांगितलें आहे. असो; श्रुतींतील अग्निहो-त्राची कल्पना येथें टाकसेठीक बसली. अग्निहोत्रांतील अग्नि नेहमीं जिवंत असतो म्हणून प्राणाचेंही नित्य-जागृतत्व स्पष्ट होतें. आणि हें त्याचें जागरण म्हणजे एक नित्य सिद्ध होत असणारें अग्निहोत्र होय. ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा.

**अत्रैष देवः स्वप्ने महिमानमनुभवति। यद् दृष्टं दृष्टमनुपश्यति श्रुतं श्रुतमेवार्थमनुशृणोति देश-दिगन्तरैश्च प्रत्यनुभूतं पुनः पुनः प्रत्यनुभवति दृष्टं**

**चादृष्टं च श्रुतं चाश्रुतं चानुभूतं चाननुभूतं च सच्चासच्च सर्वं पश्यति सर्वः पश्यति ॥ ५ ॥**

**अन्वय व अर्थ**—अत्र एषः देवः स्वप्ने महिमानं अनुभवति (जागृत-स्थिति संपली असतां हा मनोदेव स्वप्नकाळीं आपल्या स्वतःच्या विभूतीचा पराक्रमाचा–ऐश्वर्याचा–अनुभव घेतो.) यत् दृष्टं दृष्टं अनुपश्यति, श्रुतं श्रुतं एव अर्थं अनुशृणोति, देशदिगन्तरैः च प्रत्यनुभूतं पुनः पुनः प्रत्यनुभवति (जें काय वारंवार पाहिलें असेल, ऐकलें असेल किंवा निर-निराळ्या देशीं किंवा निरनिराळ्या दिशेला ज्याचा अनुभव आला असेल तें हा मनोदेव स्वप्नामध्यें पुनः पाहतो, पुनः ऐकतो आणि पुनः त्याचा अनुभव घेतो) दृष्टं च अदृष्टं च, श्रुतं च अश्रुतं च, अनुभूतं च अननुभूतं च, सत् च असत् च, सर्वं पश्यति सर्वः पश्यति (जें काय दृष्ट म्हणजे येथें पाहिलें असेल किंवा अदृष्ट या जन्मांत न पाहतां पूर्वजन्मांत पाहिलें असेल, या जन्मीं ऐकिलें असेल किंवा पूर्वजन्मीं ऐकिलें असेल, याजन्मीं किंवा देशदिगंतरीं अनुभव घेतला असेल किंवा पूर्वजन्मीं घेतला असेल, त्या सर्व पदार्थांचें दर्शन आणि जलासारख्या सद्वस्तु व मृगजलासारख्या असद्वस्तु, सारांश, सर्व वस्तु–पाहण्याला हें मन समर्थ आहे. कारण सर्व इंद्रियांचें नियंतृत्व मनाकडे आहे.) ॥ ५ ॥

या मंत्रांत गार्ग्याच्या तिसऱ्या प्रश्नाचें उत्तर दिलें आहे. सर्व इंद्रियें निद्रा-वश झालीं असतां स्वप्नकाळीं द्रष्टा कोण असतो हा प्रश्न आहे. त्याचें उत्तर मन, द्रष्टा असतो हें आहे. स्वप्नकाळीं आपलीं सर्व कर्ण–नेत्रादि ज्ञानेंद्रियें व हस्तपादादि कर्मेंद्रियें स्तब्ध असतांही स्वप्नामध्यें अनेक वस्तु आपण पाहतों, अनेक वस्तूंचा दान–प्रतिग्रह करितों, याचें द्रष्टृत्व व कर्तृत्व मनाकडे असतें. जागृतकाळीं वस्तु पाहत असतां किंवा आपण कर्म करीत असतां मनावर कांहीं एक विशिष्ट संस्कार होत असतात व स्वप्नकाळीं ते ते संस्कार स्वबला-नुरूप कमी किंवा जास्ती प्रमाणानें मनःप्रेरणेमुळें जागृत होतात. आणि जीवाचे बाह्य व्यापार संपले म्हणजे कांहीं बलवान् संस्कार आपापलीं स्वरूपें प्रकट करितात. या स्वरूपांचा द्रष्टा मन आहे व त्या प्रमाणेंच आपण जें काय कर्म करितों त्याचाही कर्ता व द्रष्टा मन आहे. सामान्यतः स्वप्नामध्यें ज्या वस्तूंचा अनुभव आपल्याला येतो त्या वस्तु जागृतकाळीं आपण पाहिलेल्या ऐकलेल्या किंवा दिल्या घेतलेल्या असतात. केव्हां केव्हां आपण पाहिली नाहीं किंवा ऐकली नाहीं अशी वस्तु आपल्याला स्वप्नामध्यें दिसते, हें कसें? याचा उलगडा श्रुति असा करिते कीं, पूर्व जन्मीं आपण त्या गोष्टी पाहिलेल्या किंवा ऐकिलेल्या

असतात. उदाहरणार्थ मनुष्याला एखादे वेळीं आपणा स्वतःस फाशी दिल्याचें स्वप्न पडतें. आतां आपल्या स्वतःचा शिरच्छेद झाला, हें या जन्मांत पाहणें मनुष्यास शक्य नाहीं. पण तसें स्वप्न तर पडतें. तेव्हां या मानगडीचा श्रुति असा उलगडा करितात कीं, स्वप्नांत फाशी गेलेल्या मनुष्याचा लिंगदेह फाशी जाण्याचा विधि पाहतो, व हा संस्कार देहांतर्यी ( स्थूल देहांत ) उद्भव होऊन आपण फाशीं गेलों असें मनुष्याला स्वप्न पडतें. ही मीमांसा संप्रदायविद् आहे. पण मला असें वाटतें कीं, बाहेरून आलेल्या वस्तुज्ञानाचें ग्रहण करणें हें सामर्थ्य मनाला आहे, त्याप्रमाणेंच वस्तूंच्या स्वरूपाची विघटना करणें, विरोधी वस्तुंस एकत्र करणें किंवा सजातीय वस्तुंस भिन्न करणें इत्यादि कर्तृत्व ही मनाकडे आहे. जागृत काळीं कवि, चित्रकार इत्यादि ललित-कलांचे पुरस्कर्ते, वस्तूंचें अथवा वस्तुसमूहाचें स्वरूपांतर करितात, हें आपण पाहतों. हें सामर्थ्य त्यांस मनाच्या उत्कट कर्तृत्वानें प्राप्त होतें. जागृत काळीं जर मनाला हें सामर्थ्य असतें तर स्वप्न काळीं तरी तें कां नसावें ? अशा; श्रुतीचा असा अर्थ करावा कीं जागृत काळीं न पाहिलेल्या वस्तु मनोदेव हा स्वप्नकाळीं उत्पन्न करितो. सारांश, मनाकडे भोक्तृत्व आहे तसेंच कर्तृत्वही आहे. यामुळें त्यास सद्वस्तूचा व असद्वस्तूचा ( खऱ्या व खोट्या गोष्टींचा ) अनुभव घेतां येतो म्हणजे तें सर्वज्ञ आहे व सर्वरूप आहे असें ठरतें. हा सर्व प्रकार मनाच्या वासनासामर्थ्यानें सिद्ध होतो. ॥ ५ ॥

---

## मंत्र सहावा.

**स यदा तेजसाऽभिभूतो भवति । अत्रैष देवः स्वप्नान्न पश्यत्यथ तदैतस्मिञ्शरीर एतत्सुखं भवति ॥ ६ ॥**

अन्वय व अर्थ—सः यदा तेजसा अभिभूतः भवति ( हा मनोदेव जेव्हां तेजानें वेष्टिला जातो ) अत्र ( तेव्हां ) एषः देवः स्वप्नान् न पश्यति ( हा मनोदेव स्वप्नें पाहण्यास असमर्थ होतो ) अथ तदा एतस्मिन् शरीरे एतत् सुखं भवति ( *नंतर त्या वेळीं ह्या शरीरांत उत्तम प्रकारचें हें सुख होतें.* ) ॥ ६ ॥

स्वप्नस्थिति संपून निद्राकाल प्राप्त झाला म्हणजे हा मनोदेव एका प्रकारच्या पित्तात्मक तेजानें वेष्टिला जातो. यावेळीं म्हणजे निद्राकाळीं मनाला स्वप्नें दिसत नाहींत, म्हणजे मन ही यावेळीं व्यापारशून्य असतें. याप्रमाणें मन, बुद्धि, चित्त आणि अहंकार ही सर्व व्यापारशून्य झालीं म्हणजे प्रत्यगात्मा ( जीवात्मा )

निरुपाधि होतो. त्याचें सर्व विशेष ज्ञान नाहींसें होतें. तो स्वस्वरूप होतो. स्वस्वरूप म्हणजे सुखरूप होय. जीवाला निद्राकाळीं सुखानुभव येतो, तो जीव परमार्थतः आत्मरूप असतो म्हणून येतो. याप्रमाणें कोणाला सुख होतें या गार्ग्याच्या चौथ्या प्रश्नाला असें उत्तर मिळालें कीं मनाच्या पलीकडे असणारा जो जीव किंवा आत्मा तो सुखी होतो. वास्तविक तो सुखरूपच आहे. मन आदि उपाधींनीं विशेष ज्ञान व विशेष कर्तृत्व उत्पन्न केलें असल्यामुळें जीवाला सुख-दुःखाचें किंवा शीतोष्णाचें भान होतें. इतकेंच काय तें. उपाधि सरल्या म्हणजे हें भान सरतें आणि तो असा स्वरूपतःच सुखरूप असतो तसाच 'मी आहें, असें त्याला ज्ञान होतें म्हणजे अनुभव येतो, सुखरूप होतो. ॥ ६ ॥

---

## मंत्र सातवा.

**स यथा सोम्य वयांसि वासोवृक्षं संप्रतिष्ठन्ते । एवं ह वै तत्सर्वं पर आत्मनि संप्रतिष्ठते ॥ ७ ॥**

अन्वय व अर्थ—यथा हे सोम्य! वयांसि वासोवृक्षं संप्रतिष्ठंते, एवं ह वै तत् सर्व-च-सः परे आत्मनि संप्रतिष्ठते ( हे सौम्य ज्याप्रमाणें पक्षी आपल्या आश्रय देणाऱ्या वृक्षावर जाऊन बसतात, त्याप्रमाणें हें सर्व विश्व आणि हा औपाधिक जीव परमात्म्याचा आश्रय करितात.) ॥७॥

याचा भावार्थ स्पष्ट आहे. संध्याकाळीं पक्षी जसे एखाद्या महावृक्षाचा आश्रय करून तेथें राहतात, त्या प्रमाणें हें सर्व विश्व व त्याचा द्रष्टा व भोक्ता जीव, सारांश सर्व चराचर वस्तु परमात्म स्वरूपाच्या आश्रयाला जाऊन सुखरूप राहतात व शेवटीं तेथें लीन होतात. सूर्योदय झाल्यावर ज्याप्रमाणें पक्षी चोहीं कडे उडून जातात, त्याप्रमाणें व्यवहारकालीं, अज्ञानकाळीं, हा सर्व प्रपंच आणि त्यातील जीव 'आपण परमात्म्याच्या आश्रयाला आहोंत' हें विसरतात आणि विशेष सुख-दुःखाचीं कारणें आणि कार्यें पत्करून जीव सुख-दुःखाचा अनुभोक्ता होतो. ॥ ७ ॥

---

## मंत्र आठवा.

**पृथिवी च पृथिवीमात्रा चाऽऽपश्चाऽऽपोमात्रा च तेजश्च तेजोमात्रा च वायुश्च वायुमात्रा चाऽऽका-**

**शश्चाऽऽकाशमात्रा च चक्षुश्च द्रष्टव्यं च श्रोत्रं च श्रोतव्यं च घ्राणं च घ्रातव्यं च रसश्च रसयितव्यं च त्वक्च स्पर्शयितव्यं च वाक्च वक्तव्यं च हस्तौ चाऽऽदातव्यं चोपस्थश्चाऽऽनन्दयितव्यं च पायुश्च विसर्जयितव्यं च पादौ च गन्तव्यं च मनश्च मन्तव्यं च बुद्धिश्च बोद्धव्यं चाहंकारश्चाहंकर्तव्यं च चित्तं च चेतयितव्यं च तेजश्च विद्योतयितव्यं च प्राणश्च विधारयितव्यं च ॥ ८ ॥**

अन्वय व अर्थ—पृथिवी च पृथिवीमात्रा च, आपः च आपोमात्रा च, तेजः च तेजोमात्रा च, वायुः च वायुमात्रा च, आकाशः च आकाशमात्रा च, चक्षुः च द्रष्टव्यं च, श्रोत्रं च श्रोतव्यं च, घ्राणं च घ्रातव्यं च, रसश्च रसयितव्यं च, त्वक् च स्पर्शयितव्यं च, वाक् च वक्तव्यं च, हस्तौ च आदातव्यं च, उपस्थः च आनंदयितव्यं च, पायुः च विसर्जयितव्यं च, पादौ च गंतव्यं च, मनः च मंतव्यं च, बुद्धिः च बोद्धव्यं च, अहंकारः च अहंकर्तव्यं च, चित्तं च चेतयितव्यं च तेजः च विद्योतयितव्यं च प्राणः च विधारयितव्यं च ( पृथ्वी आणि तिची गंध-तन्मात्रा, जल आणि जलमात्रा, तेज आणि त्याची मात्रा, वायु आणि त्याची मात्रा, आकाश व आकाशमात्रा, नेत्र आणि द्रष्टव्य—पहावयाची वस्तु,—कर्ण आणि श्रोतव्य, घ्राण आणि घ्रातव्य, रस आणि रसयितव्य, त्वचा आणि स्पृश्य वस्तु वाणी आणि तिचा विषय, हस्त आणि ग्रहण करण्याचे विषय, उपस्थ आणि रतिविषय, पायु—गुदद्वार—आणि मल, चरण आणि गमन, मन आणि मननाचा विषय, बुद्धि आणि जाणण्याचा विषय, अहंकार आणि त्याचा विषय, चित्त आणि त्याचा विषय, तेज आणि त्याचा विषय, प्राण आणि प्राणाचा विषय, हीं सर्व परमात्म्याचा आश्रय घेणारीं आहेत.) ॥८॥

सातव्या मंत्रात उल्लेखिलेल्या प्रकाराचें विस्तृत वर्णन येथें केलें आहे. या वर्णनात पृथ्वीआदि पंच महाभूतें व त्यांच्या तन्मात्रा, ज्ञानेंद्रियें आणि त्यांचे विषय, कर्मेंद्रियें आणि त्यांचे विषय, मन, बुद्धि, चित्त आणि अहंकार व त्यांचे विषय, या सर्वांत राहून सर्वांना व्यापून टाकणारें तेज आणि प्राण या सर्वांचा निर्देश केला आहे. हा सर्व प्रपंच—विस्तार होय. परमात्म्याचे

स्वरूप या सर्व प्रपंचस्वरूपाहून निराळें असूनही तो परमात्मा या सर्वांस आश्रय देतो. सर्वांचा मूळ आधार परमात्मा असून तो सर्वव्यापी आहे हें येथें मुख्यत्वानें सांगावयाचें आहे. ॥ ८ ॥

---

## मंत्र नववा.

**एष हि द्रष्टा स्प्रष्टा श्रोता घ्राता रसयिता मन्ता बोद्धा कर्ता विज्ञानात्मा पुरुषः स परेऽक्षर आत्मनि संप्रतिष्ठते ॥ ९ ॥**

**अन्वय व अर्थ—**एषः हि द्रष्टा, स्प्रष्टा, श्रोता, घ्राता, रसयिता, मन्ता, बोद्धा, कर्ता, विज्ञानात्मा, पुरुषः, सः परे अक्षरे आत्मनि संप्रतिष्ठते ( आणि द्रष्टा–पाहणारा, स्प्रष्टा–स्पर्श करणारा,–श्रोता, घ्राता–वास घेणारा, रस चाखणारा, मनन करणारा, जाणणारा, कर्ता, असा हा विज्ञानात्मा पुरुष ( जीव ) असतो, तोही अक्षर–अविनाशी असा जो परमात्मा त्याच्या ठिकाणीं आश्रय घेतो. ) ॥ ९ ॥

या मंत्रांत प्रपंच पाहणाऱ्या जीवाचें वर्णन आहे. सातव्या मंत्रांत 'सः' या पदानें अभिप्रेत असणारा जो कर्ता भोक्ता जो जीव, त्याचें वर्णन येथें आहे; प्रापंचिक उपाधि जीवानें पतकरिलेल्या अवस्था म्हणजे तो कर्ता, भोक्ता, व विषय पाहणारा असतो. पण हा प्रपंच निद्रेमध्यें जसा परमात्मस्वरूपांत विलीन होऊन एकरूप होतो, त्याच प्रमाणें निद्राकाळीं जीवाच्या सर्व उपाधी नष्ट होऊन तो परमात्मस्वरूपी म्हणजे ज्ञानरूप अथवा सुखरूप होतो याप्रमाणें गार्ग्यांच्या पांचव्या म्हणजे शेवटच्या प्रश्नास पिप्पलादांनीं उत्तर दिलें आणि सांगितलें कीं प्रपंच आणि प्रपंच–द्रष्टा जीव हे उभयतां परमात्म–स्वरूपाचा आश्रय करून त्याच्या आधारानें स्थित होतात. असो; याप्रमाणें स्वप्नस्थितीचें व निद्रास्थितीचें वर्णन झालें. जाग्रत स्थितीचा विचार पहिल्या तीन शिष्यांच्या तीन निरनिराळ्या प्रश्नांत झाला आहे. आतां परमात्म–स्वरूप सांगून, ( सर्वांच्या आधाराचें स्वरूप सांगून ) या प्रश्नाची परिसमाप्ति पिप्पलादमुनि राहिलेल्या दोन मंत्रांत करतील. ॥ ९ ॥

---

### मंत्र दहावा.

परमेवाक्षरं प्रतिपद्यते स यो ह वै तदच्छायम-
शरीरमलोहितं शुभ्रमक्षरं वेदयते यस्तु सोम्य ।
स सर्वज्ञः सर्वो भवति तदेष श्लोकः ॥ १० ॥

अन्वय व अर्थ—तु यः ह वै तत् अच्छायं, अशरीरं, अलोहितं, शुभ्रं, अक्षरं, यः वेदयते, सोम्य ! सः परं एव अक्षरं प्रतिपद्यते ( पण ज्याला या अच्छाय—तमःशून्य, उपाधिरहित—शरीरशून्य, रूपशून्य, गुणशून्य, शुद्ध आणि अविनाशी स्वरूपाचें ज्ञान होतें, हे सौम्य ! तो पुरुष अविनाशी आणि अत्यंत श्रेष्ठ स्वरूप परमात्मस्वरूप प्राप्त करून घेतो. ( सः सर्वज्ञः सर्वः भवति ( तो सर्वज्ञाता आणि सर्वरूप होतो. ) तत् एषः श्लोकः ( याच अर्थाचा संग्रह करणारा पुढील श्लोक आहे. ) ॥ १० ॥

कोणत्याही प्रकारची छाया नसणाऱ्या, कोणतीही उपाधि नसणाऱ्या निर्गुण, शुद्ध, नित्य, अशा ज्ञानरूप परमात्म्याचें स्वरूप ज्याला समजतें तो पुरुष परमात्मस्वरूपाला जाऊन पोंचतो. म्हणजे ब्रह्मवेत्ता ब्रह्म होतो म्हणजे तो सर्वज्ञ होतो, अथवा ज्ञानरूप होतो. तो सर्व होतो अथवा सर्वव्यापी होतो. तात्पर्य जीवाचें सर्व अज्ञान नाहींसें झालें व त्याला पूर्ण प्रपंचवैराग्य झालें, म्हणजे तो ब्रह्मरूप होतो. त्याला मग आशेचें किंवा भीतीचें कारण उरत नाहीं. हीच श्रुतीनें सांगितलेली तुर्यावस्था आहे. ही जाग्रत, स्वप्न, आणि सुषुप्ति यांच्या पलीकडील अवस्था आहे. या प्रमाणें येथें ब्रह्मस्वरूप कसें आहे व ब्रह्मज्ञानाचें फल काय आहे हें सांगितलें. अर्थात् येथें गार्ग्यकृत प्रश्नप्रपंचाची समाप्ति झाली. आतां या मंत्रांत जें काय सांगितलें त्याचा अनुवाद करणारा पुढील मंत्र उद्धृत केला म्हणजे गार्ग्याच्या प्रश्नाची मीमांसा पूर्ण झाली. ॥ १० ॥

---

### मंत्र अकरावा.

विज्ञानात्मा सह देवैश्च सर्वैः प्राणा भूतानि
संप्रतिष्ठन्ति यत्र । तदक्षरं वेदयते यस्तु सोम्य
स सर्वज्ञः सर्वमेवाविवेशेति ॥ ११ ॥

अन्वय व अर्थ—सोम्य, यत्र सर्वैः देवैः सह विज्ञानात्मा च प्राणः च भूतानि संप्रतिष्ठन्ति ( सर्व मन इन्द्रियादि देवतांसह विज्ञानात्मा—सोपा-

धिक आत्मा, जीव—पंचप्राण आणि सर्व जड वस्तु हीं ज्याचा आश्रय घेतात,) तत् अक्षरं यः वेदयते तु सः सर्वज्ञः सर्वं एव आविवेश ( तें अक्षर स्वरूप ज्याला समजतें तो सर्वज्ञ पुरुष सर्वांमध्यें प्रवेश करितो. अथवा तो सर्वव्यापी आणि सर्वसाक्षी होतो. ॥ ११ ॥

पाठीमागील सात, आठ, नऊ, दहा या मंत्रांतील अर्थांचा संग्रह करणारा हा मंत्र आहे. येथें स्पष्ट असें सांगितलें आहे कीं, ज्या पुरुषाला ब्रह्माचें—म्हणजे सर्व इंद्रियें व त्याच्या देवता यांच्यासह असणारा जो कर्ता भोक्ता जीव, त्यास व सर्व सामर्थ्यें आणि सर्व जड वस्तु यांस आधार देणाऱ्या (यांचें अधिष्ठान असणाऱ्या) अविनाशी ब्रह्माचें—ज्ञान होतें, तो सर्वज्ञ पुरुष सर्वसाक्षी आणि सर्व व्यापी होतो. ॥ ११ ॥

चवथा प्रश्न समाप्त.

---

## प्रश्न पांचवा.

### मंत्र पहिला.

**अथ हैनं शैब्यः सत्यकामः पप्रच्छ ॥**

अन्वय व अर्थ—अथ ह एनं शैब्यः सत्यकामः पप्रच्छ ( नंतर सत्यकाम या नांवाच्या शैब्यानें प्रश्न केला. )

**स यो ह वै तद्भगवन्मनुष्येषु प्रायणान्तमोंकारमभिध्यायीत । कतमं वाव स तेन लोकं जयतीति तस्मै स होवाच ॥ १ ॥**

अन्वय व अर्थ—भगवन्, सः यः ह वै मनुष्येषु प्रायणान्तं ॐकारं अभिध्यायीत ( भगवन्, जो कोणी मनुष्यलोकांतील जीव मरणापर्यंत ॐकाराचें एकनिष्ठ ध्यान करील ) तेन कतमं वाव लोकं सः जयति ( हा ॐकाराच्या ध्यानानें तो कोणत्या लोकाची प्राप्ति करून घेतो. ) इति ( हा सत्यकामाचा प्रश्न होता. ) तस्मै सः उवाच ह ( त्याला पिप्पलाद मुनींनीं उत्तर दिलें. ) ॥ १ ॥

सर्वसंगपरित्याग करून ब्रह्मचर्यपुरःसर एकनिष्ठपणानें ध्यान करणें याचें नाव अभिध्यान आहे. असें ॐकाराचें एकनिष्ठ ध्यान जो पुरुष आम-

### मंत्र दहावा.

**परमेवाक्षरं प्रतिपद्यते स यो ह वै तदच्छायम-
शरीरमलोहितं शुभ्रमक्षरं वेदयते यस्तु सोम्य।
स सर्वज्ञः सर्वो भवति तदेष श्लोकः ॥ १० ॥**

अन्वय व अर्थ—तु य ह वै तत् अच्छायं, अशरीरं, अलोहितं, शुभ्रं, अक्षरं, यः वेदयते, सोम्य! सः परं एव अक्षरं प्रतिपद्यते ( पण ज्याला या अच्छाय—तमःशून्य, उपाधिरहित—शरीरशून्य, रूपशून्य, गुण-शून्य, शुद्ध आणि अविनाशी स्वरूपाचें ज्ञान होतें, हे सौम्य! तो पुरुष अवि-नाशी आणि अत्यंत श्रेष्ठ स्वरूप परमात्मस्वरूप प्राप्त करून घेतो. ( स सर्वज्ञः सर्वः भवति ( तो सर्वज्ञाता आणि सर्वरूप होतो. ) तत् एषः श्लोकः ( याच अर्थाचा संग्रह करणारा पुढील श्लोक आहे. ) ॥ १० ॥

कोणत्याही प्रकारची छाया नसणाऱ्या, कोणतीही उपाधि नसणाऱ्या निर्गुण, शुद्ध, नित्य, अशा ज्ञानरूप परमात्म्याचें स्वरूप ज्याला समजतें तो पुरुष परमात्म-स्वरूपाला जाऊन पोंचतो. साराश ब्रह्मवेत्ता ब्रह्म होतो म्हणजे तो सर्वज्ञ होतो, अथवा ज्ञानरूप होतो. तो सर्व होतो अथवा सर्वव्यापी होतो. तात्पर्य जीवाचें सर्व अज्ञान नाहींसें झालें व त्याला पूर्ण प्रपंचवैराग्य झालें, म्हणजे तो ब्रह्मरूप होतो. त्याला मग जीवाचें किंवा भीतीचें कारण उरत नाहीं. हीच श्रुतीनें सांगितलेली तुर्यावस्था आहे. ही जाग्रत, स्वप्न, आणि सुषुप्ति यांच्या पलीकडील अवस्था आहे. या प्रमाणें येथें ब्रह्मस्वरूप कसें आहे व ब्रह्मज्ञानाचें फल काय आहे हें सांगितलें. अर्थातच येथें गार्ग्यकृत प्रश्नपत्रकाची समाप्ति झाली. आता या मंत्रात जें काय सांगितलें त्याचा अनुवाद करणारा श्लोकमंत्र उद्धृत केला म्हणजे गार्ग्याच्या प्रश्नाची मीमांसा पूर्ण झाली. ॥ १० ॥

---

### मंत्र अकरावा.

**विज्ञानात्मा सह देवैश्च सर्वैः प्राणा भूतानि
संप्रतिष्ठन्ति यत्र। तदक्षरं वेदयते यस्तु सोम्य
स सर्वज्ञः सर्वमेवाविवेशेति ॥ ११ ॥**

अन्वय व अर्थ—सोम्य, यत्र सर्वैः देवैः सह विज्ञानात्मा च प्राणः च—भूतानि संप्रतिष्ठन्ति ( सर्व मन इंद्रियादि देवतांसह विज्ञानात्मा—सोपा-

धिक आत्मा, ज़ीव—पचप्राण आणि सर्व जड वस्तु हीं ज्याचा आश्रय घेतात,) तत् अक्षरं यः वेदयते तु सः सर्वज्ञः सर्व एव आविवेश ( तें अक्षर स्वरूप ज्याला समजतें तो सर्वज्ञ पुरुष सर्वांमध्यें प्रवेश करितो. अथवा तो सर्वव्यापी आणि सर्वसाक्षी होतो. ॥ ११ ॥

पाठीमागील सात, आठ, नऊ, दहा या मंत्रातील अर्थाचा संग्रह करणारा हा मंत्र आहे. येथें स्पष्ट असें सांगितलें आहे कीं, ज्या पुरुषाला ब्रह्माचें-म्हणजे सर्व इंद्रियें व त्यांच्या देवता यांच्यासह असणारा जो कर्ता भोक्ता जीव, त्यास व सर्व सामर्थ्य आणि सर्व जड वस्तु यांस आधार देणाऱ्या (यांचें अधिष्ठान असणाऱ्या) अविनाशी ब्रह्माचें-ज्ञान होतें, तो सर्वज्ञ पुरुष सर्वसाक्षी आणि सर्व व्यापी होतो. ॥ ११ ॥

चवथा प्रश्न समाप्त.

---

## प्रश्न पांचवा.

### मंत्र पहिला.

**अथ हैनं शैब्यः सत्यकामः पप्रच्छ ॥**

अन्वय व अर्थ—अथ ह एनं शैब्यः सत्यकामः पप्रच्छ ( नंतर सत्यकाम या नांवाच्या शैब्यानें प्रश्न केला. )

**स यो ह वै तद्भगवन्मनुष्येषु प्रायणान्तमोंकारमभिध्यायीत । कतमं वाव स तेन लोकं जयतीति तस्मै स होवाच ॥ १ ॥**

अन्वय व अर्थ—भगवन्, सः यः ह वै मनुष्येषु प्रायणान्तं ॐकारं अभिध्यायीत ( भगवन्, जो कोणी मनुष्यलोकांतील जीव मरणापर्यंत ॐकाराचें एकनिष्ठ ध्यान करील ) तेन कतमं वाव लोकं सः जयति ( ह्या ॐकाराच्या ध्यानानें तो कोणत्या लोकाची प्राप्ति करून घेतो. ) इति ( हा सत्यकामाचा प्रश्न होता. ) तस्मै सः उवाच ह ( त्याला पिप्पलाद मुनींनीं उत्तर दिलें. ) ॥ १ ॥

सर्वसंगपरित्याग करून ब्रह्मचर्यपुरःसर एकनिष्ठपणानें ध्यान करणें याचें नांव अभिध्यान आहे. असें ॐकाराचें एकनिष्ठ ध्यान जो पुरुष आम-

रणांत करितो त्याला फलप्राप्ति काय होते, एतद्विषयक हा प्रश्न आहे. ॐकार हें ब्रह्माचें एक नांव आहे, असें कठोपनिषदांत सांगितलें आहे. ॐकाराचें एकनिष्ठ ध्यान केलें असतां काय फळ होतें हें आतां समजून घ्यावयाचें आहे. तसेंच प्रसंगतः हें ॐकारोपासन कसें करावें, याचाही विधि आचार्य सांगणार आहेत.१

### मंत्र दुसरा.

**एतद्वै सत्यकाम परं चापरं च ब्रह्म यदोंकारः ।**
**तस्माद्विद्वानेतेनैवाऽऽयतनेनैकतरमन्वेति ॥ २ ॥**

अन्वय व अर्थ—सत्यकाम, यत् ॐकारः एतत् वै परं च अपरं च ब्रह्म ( हा जो ॐकार आहे तो हे सत्यकाम, पर—सर्वश्रेष्ठ, निर्गुण, व अपर—गौण—सगुण—ब्रह्म आहे. ) तस्मात् एतेन एव आयतनेन एकतर अन्वेति ( म्हणून या साधनानें ॐकाराचें ज्ञान असणारा पुरुष आपल्या ध्यानानुसार पर किंवा अपर ब्रह्माची प्राप्ति करून घेतो. ) ॥ २ ॥

या मंत्रांत ॐकाराच्या ध्यानानें ब्रह्मप्राप्ति होते असें सांगून आचार्यांनीं सत्यकामाच्या प्रश्नाचें उत्तर एकदम देऊन टाकलें. त्यांतच ब्रह्म हें पर आणि अपर असें दोन प्रकारचें आहे असेंही सांगितलें. परब्रह्म हें सत्यरूप आणि अविनाशी असतें व अपरब्रह्म हें सगुण उपासना करण्यास योग्य आणि भक्तास प्रसन्न होणारें असें असतें. परब्रह्माचें प्रतीक ॐकार आहे व तें अपरब्रह्माचें वाचक आहे. प्रतीकरूपानें निर्गुणब्रह्माचें एकनिष्ठ ध्यान केलें म्हणजे ज्ञान होऊन मोक्ष मिळतो आणि उपासनापूर्वक ॐकाराचा जप करून अपरब्रह्माचें ध्यान केलें असतां अपरब्रह्माची प्राप्ति होते. असें फळ येथें सांगितलें आहे. ॥ २ ॥

### मंत्र तिसरा.

**स यद्येकमात्रमभिध्यायीत स तेनैव संवेदित-स्तूर्णमेव जगत्यामभिसंपद्यते । तमृचो मनुष्य-लोकमुपनयन्ते स तत्र तपसा ब्रह्मचर्येण श्रद्धया संपन्नो महिमानमनुभवति ॥ ३ ॥**

अन्वय व अर्थ—सः यदि एकमात्रं अभिध्यायीत सः तेन एव संवेदितः तूर्णं एव जगत्याम् अभिसंपद्यते ( जो कोणी त्रिमात्रक ॐकाराचें केवळ एकमात्रेनेंच ध्यान करील तो त्या ध्यानानें ज्ञानी होऊन

भूलोकाची सत्वर प्राप्ति करून घेईल. ) तं ऋचः मनुष्यलोकं उपनयन्ते (या एकमात्रक ॐकाराचें ध्यान करणाराला ऋग्वेदांतील मंत्र मनुष्यलोकाला नेऊन पोंचवितात.) सः तत्र तपसा, ब्रह्मचर्येण, श्रद्धया संपन्नः महिमानं अनुभवति ( तो पुरुष मृत्युलोकीं तपःसंपन्न, ब्रह्मचर्यसंपन्न आणि श्रद्धा-संपन्न होऊन अतिश्रेष्ठ पदवीचा अनुभव घेतो. ) ॥ ३ ॥

अ, उ आणि म् अशा ॐकाराच्या तीन मात्रा आहेत. या मात्रांपैकीं ॐकार म्हणून अकाराचें जो ध्यान करील, अकार म्हणजेच ॐकार असें समजून जो पुरुष एकनिष्ठ ध्यान करितो, तो लवकरच मनुष्य लोकास जाऊन पोंचतो. हें त्याच्या ध्यानबलाचें फल होय. अकार हा ऋग्वेदाचा उल्लेख करितो. अकार म्हणजे ऋग्वेद होय असें समजतात. ऋग्वेद-मंत्रपूर्वक ॐकारोपासना करणाऱ्याला मनुष्यलोकाची प्राप्ति होते. ऋग्वेद हा मनुष्य-लोकाचा दर्शक आहे असें समजतात, असो; तप, ब्रह्मचर्य आणि श्रद्धा यांच्या साहाय्यानें तो ध्यानी पुरुष संपन्न झाल्यामुळें अति श्रेष्ठ योग्यतेचा अनुभविता होतो. साराश त्याचें मनुष्यलोकीं कल्याण होतें ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**अथ यदि द्विमात्रेण मनसि संपद्यते सोऽन्तरिक्षं यजुर्भिरुन्नीयते सोमलोकं स सोमलोके विभूति-मनुभूय पुनरावर्तते ॥ ४ ॥**

अन्वय व अर्थ—अथ यदि द्विमात्रेण मनसि संपद्यते सः यजुर्भिः अंतरिक्षं सोमलोकं उन्नीयते ( पण जो कोणी ॐकार हा द्विमात्रक समजून—' अ ' आणि ' उ ' या दोन मात्रावर ॐकार स्वरूपाची भावना धरून—ध्यान करितो तो यजुर्वेदाच्या साहाय्यानें अंतरिक्षांत असलेल्या सोम-लोकाची प्राप्ति करून घेतो. ) सोमलोके विभूतिं अनुभूय पुनः आवर्तते ( नंतर तो सोमलोकांतील सुखाची प्राप्ति करून घेऊन पुनः या मृत्युलोकीं अवतीर्ण होतो. ) ॥ ४ ॥

या मंत्रांत 'अ' सह उ या अक्षराचें ध्यान करून व हें ध्यान ॐकार स्वरू-पाचें आहे अशी भावना धरून जो ध्यानस्थ राहतो त्याला सोमलोकाची प्राप्ति होते. हा सोमलोक अंतरिक्षांत आहे. तेव्हां या स्वरूपाचें ध्यान करणारा मनुष्य मेल्यानंतर सोमलोकास किंवा पितृलोकास जातो. आणि तेथील सुख अनु-भवून पुनः तो मनुष्यलोकीं येऊन पोंचतो. 'उ' हें अक्षर यजुर्वेदाचें दर्शक

आहे. ऋग्वेदानें मनुष्यलोकाची प्राप्ति होते ह्या प्रमाणें यजुर्वेदानें सोमलोकाची अथवा चंद्रलोकाची प्राप्ति होते. या मंत्रांतील द्विमात्र या पदाचा अर्थ दुसरी मात्रा असा श्रीमच्छंकराचार्यांनीं केला असा मला भास होत आहे; पण मला असें वाटतें कीं द्विमात्र या पदाचा अर्थ दोन मात्रा असा करावा. अ आणि उ ह्या त्या दोन मात्रा होत. असा अर्थ केला असतां मनुष्यलोकाहून श्रेष्ठ जो पितृलोक याची प्राप्ति द्विमात्राचें ध्यान करणारांस होते; हें म्हणणें नीट होईल. एकमात्रक ॐकाराचें ध्यान करणारापेक्षां द्विमात्रक (अ आणि उ) या स्वरूपांतल ॐकारध्यान करणारा पुरुष जास्त योग्यतेचा आहे, ही गोष्ट स्पष्ट होते. असो; उकारानें यजुर्वेदप्राप्ति होऊन सोमलोक मिळत असल्यास उत्तमच गोष्ट झाली. ऋग्वेद जागृतस्थानीं आहे आणि यजुर्वेद स्वप्नस्थानीं आहे अशी सांप्रदायिक कल्पना आहे. ॥ ४ ॥

## मंत्र पांचवा.

**यः पुनरेतं त्रिमात्रेणोमित्येतेनैवाक्षरेण परं पुरुषमभिध्यायीत स तेजसि सूर्ये संपन्नः। यथा पादोदरस्त्वचा विनिर्मुच्यत एवं ह वै स पाप्मना विनिर्मुक्तः स सामभिरुन्नीयते ब्रह्मलोकं स एतस्माज्जीवघनात्परात्परं पुरिशयं पुरुषमीक्षते तदेतौ श्लोकौ भवतः ॥ ५ ॥**

अन्वय व अर्थ—यः पुनः त्रिमात्रेण ॐ इति एतेन एव अक्षरेण एतं परं पुरुषं अभिध्यायीत सः तेजसि सूर्ये संपन्नः (जो कोणी त्रिमात्रक म्हणजे अ, उ आणि म् ह्या अक्षरांनीं सिद्ध झालेल्या ॐकाराच्या साहाय्यानें ह्या पुरुषोत्तमाचें एकनिष्ठ ध्यान करितो, तो तेजस्वी सूर्याशीं एकरूप होऊन जातो.) यथा पादोदरः त्वचा विनिर्मुच्यते, एवं ह वै सः पाप्मना विनिर्मुक्तः; स सामभिः ब्रह्मलोकं उन्नीयते (ज्याप्रमाणें सर्प हा आपल्या त्वचेपासून मुक्त होतो, त्याप्रमाणें ॐकाराचें ध्यान करणारा पुरुष पापापासून विनिर्मुक्त होतो आणि सामवेदाच्या साहाय्यानें तो ब्रह्मलोकीं जाऊन पोहोंचतो.) सः एतस्मात् जीवघनात् परात्परं पुरिशयं पुरुषं ईक्षते (त्याला ह्या जीवघन हिरण्यगर्भाहून अत्यंत श्रेष्ठ व सर्व चराचरांत राहून त्यांस अस्तित्व देणाऱ्या पुरुषोत्तमाचें दर्शन होतें.)

तत् एतौ श्लोकौ भवतः ( हाच अर्थ सांगणारे पुढील दोन मंत्र आहेत. ) ॥ ५ ॥

या मंत्रांत ॐकाराच्या संपूर्ण स्वरूपाचें एकनिष्ठ ध्यान करणाऱ्या पुरुषाला सूर्यलोकाची जणु कांहीं स्थिति प्राप्त होते. साप कात टाकून मोकळा होतो, त्याप्रमाणें ॐकाराचें ध्यान करणारा पुरुष पापापासून मोकळा होतो. नंतर तो ब्रह्मलोकाला जातो आणि तेथें गेल्यावर त्याला हिरण्यगर्भाच्याही पलीकडे असणाऱ्या परब्रह्माचें, पुरुषोत्तमाचें दर्शन होऊन, तो मुक्त होतो. येथें त्याचें जन्म—मरण संपतें. सामवेदाचा ॐकार हा दर्शक आहे. येथें सुषुप्तीची स्थिति असते. परम सुखाचाही लाभ येथेंच होतो. हा लाभ म्हणजे हिरण्यगर्भ लोकाची प्राप्ति झाल्यावर त्या पुरुषाला हळू हळू हिरण्यगर्भाहून श्रेष्ठ असणाऱ्या परब्रह्माची प्राप्ति होते आणि तो मुक्त होतो. ही तुर्यावस्था आहे. हीच शेवटची स्थिति होय. येथें जाण्यायेण्याची म्हणजे सर्व यातायातींची समाप्ति होते. या प्रमाणें ॐकाराचें एकनिष्ठ ध्यान करणाराला कोणतें फळ प्राप्त होतें हें सांगितलें आणि ॐकाराचें ध्यान मुमुक्षूनें कसें केलें असतां परब्रह्मप्राप्ति होते, त्याचेंही निवेदन केलें. सारांश येथें फळ आणि विधि या दोन्हींचेंही संकीर्तन केलें आहे. ॥ ५ ॥

---

मंत्र सहावा.

**तिस्रो मात्रा मृत्युमत्यः प्रयुक्ता अन्योन्यसक्ता अनविप्रयुक्ताः। क्रियासु बाह्याभ्यन्तरमध्यमासु सम्यक्प्रयुक्तासु न कम्पते ज्ञः ॥ ६ ॥**

अन्वय व अर्थ—तिस्रः मात्राः प्रयुक्ताः मृत्युमत्यः ( या ॐकाराच्या तीन मात्रा एकेक मात्रापरत्वानें प्रयुक्त केल्या असतां—एकेकच मात्रा घेऊन ध्यान केलें असतां—या ध्यानाचा परिणाम मृत्युमय होतो. ) बाह्याभ्यंतरमध्यमासु सम्यक्प्रयुक्तासु क्रियासु अन्योन्यसक्ताः अनविप्रयुक्ताः ज्ञः न कम्पते ( पण सर्वांतबाह्य आणि योग्य रीतीनें विनियोग केलेल्या ध्यान क्रियांमध्यें परस्पर संबंध करून आणि सर्वांस एकत्र करून जर या तीन मात्रांचा उपयोग केला व ॐकाराचें पूर्ण ध्यान केलें तर ज्ञानी पुरुषाला भय असण्याचें कारण राहात नाहीं. ) ॥ ६ ॥

या वेद मंत्रांत असें सांगितलें आहे कीं, तीन मात्रा असणाऱ्या ॐकाराचें ध्यान एकएक मात्रा घेऊन मात्र जर केलें म्हणजे अ हाच ॐकार आहे, उ हाच

ॐकार आहे म् हाच ॐकार आहे अशी भावना धरून जर ध्यान केलें तर हें सर्व ध्यान मृत्यु असणारें होतें. तात्पर्य, या ध्यानानें मृत्यु चुकत नाहीं. पण बाह्य (जागृत स्थिति) मध्य (स्वप्न स्थिति) अभ्यंतर (सुषुप्ति स्थिति) या सर्व स्थितींस योग्य असणाऱ्या ध्यानक्रियांमध्यें या तिन्ही मात्रांस एकत्र करून व त्यांचे परस्पर संबंध कायम ठेवून योग्य रीतीनें ध्यान केलें तर उत्तम प्रकारचें ज्ञान प्राप्त होतें. असें ज्ञान झालेल्या पुरुषाला कोणत्याही प्रकारचें भय असण्याचें कारण राहात नाहीं. खरेंच आहे—जीवाच्या तिन्ही अवस्थांमध्यें साक्षी असणाऱ्या पुरुषोत्तमाचें ध्यान जर सर्वसाक्षित्वाचा उपदेश करणाऱ्या ॐकारस्वरूपानें झालें तर साक्षीचें ज्ञान निरुपाध होऊन ध्यान करणारांच्या सर्व उपाधी नष्ट होतात आणि तो मुक्त होतो. एकेक मात्रेनें ध्यान केलें असतां मृत्यु येतो आणि ॐकाराचें सामन्यानें ध्यान केलें असतां जीव मुक्त होतो, हें श्रुतीला सांगावयाचें आहे. ॥ ६ ॥

## मंत्र सातवा.

### ऋग्भिरेतं यजुर्भिरन्तारिक्षं सामभिर्यत्तत्कवयो वेदयन्ते। तमोंकारेणैवाऽऽयतनेनान्वेति विद्वान्यत्तच्छान्तमजरममृतमभयं परं चेति ॥ ७ ॥

अन्वय व अर्थ—ऋग्भिः एतं, यजुर्भिः अंतरिक्षं, (ऋग्वेदांतील ऋचांनीं मनुष्यलोकाचा उल्लेख होतो, यजुर्वेदाच्या यजूंनीं अंतरिक्षाचा, चंद्रलोकाचा उल्लेख होतो) यत् सामभिः तत् कवयः वेदयंते (पण सामवेदाच्या सामांनीं ज्याचा उल्लेख व प्राप्ति होते तें अति विद्वान् पुरुषास मात्र माहीत आहे.) ॐकारेण एव आयतनेन तं अन्वेति (ॐकाराच्या मात्र साहाय्यानें त्या परमब्रह्मलोकांत प्रवेश करितां येतो.) यत् तत् शांतं अजरं, अमृतं, अभयं, परं च, (तो ब्रह्मलोक शांत आहे. जरामरणरहित आहे, निर्भय आहे आणि सर्वश्रेष्ठ आहे.) इति (याप्रमाणें हे सत्यकाम, तुझ्या प्रश्नाचें हें उत्तर आहे.) ॥ ७ ॥

या मंत्रांत पांचव्या प्रश्नाच्या उत्तराचा सर्व सारांश आला आहे. उत्तम ॐकाराच्या एकनिष्ठ ध्यानानें प्रथमतः अपर ब्रह्माची प्राप्ति होऊन नंतर मग जरामरणशून्य, निर्भय, शांत आणि सर्व-श्रेष्ठ अशा परब्रह्माची प्राप्ति होते, हे येथे सांगितलें आहे. तसेंच नुसत्या 'अ' च्या ध्यानानें (ऋग्वेदानें) मनुष्य लोकाची प्राप्ति होते व तेथें मृत्यूची भीति असते आणि नुसत्या 'उ' च्या ध्यानानें (यजुर्वेदानें) सोमलोकाची (चंद्र लोकाची) प्राप्ति होते, तथापि

त्याही लोकांत जरामरणाची भीति असते.' पण समग्र ॐकाराचे अवयव-संबंध काय आहेत, हें समजून घेऊन व अवयवाची तोडातोड न करितां जर एकनिष्ठपणानें ॐकारध्यान केलें, तर प्रथमतः अपरब्रह्माची आणि नंतर पर-ब्रह्माची प्राप्ति होऊन जीव कृतार्थ होतो, असें सांगितलें ॥ ७ ॥



पांचवा प्रश्न समाप्त.

---

प्रश्न सहावा.

## मंत्र पहिला.

**अथ हैनं सुकेशा भारद्वाजः पप्रच्छ ।**

अन्वय व अर्थ—अथ ह एनं सुकेशा भारद्वाजः पप्रच्छ ( नंतर भारद्वाज कुळोत्पन्न सुकेशा विचारिता झाला. )

**भगवन्हिरण्यनाभः कौसल्यो राजपुत्रो मामुपेत्यैतं प्रश्नमपृच्छत । षोडशकलं भारद्वाज पुरुषं वेत्थ तमहं कुमारमब्रुवं नाहमिमं वेद यद्यहमिममवेदिषं कथं ते नावक्ष्यमिति समूलो वा एष परिशुष्यति योऽनृतमभिवदति तस्मान्नार्हाम्यनृतं वक्तुं स तूष्णीं रथमारुह्य प्रवव्राज । तं त्वा पृच्छामि क्वासौ पुरुष इति ॥ १ ॥**

अन्वय व अर्थ—भगवन्, कौसल्यः राजपुत्रः हिरण्यनाभः माम् उपेत्य प्रश्नं अपृच्छत ( हे भगवन्, हिरण्यनाभ नामक कोसलदेशचा राजपुत्र माझ्याकडे येऊन मला प्रश्न विचारिता झाला ) भारद्वाज, षोडशकलं पुरुषं वेत्थ ( हे भारद्वाज, सोळा कलांचा पुरुष आपल्यास माहीत आहे काय ? ) तं अहं, कुमारं अब्रुवं ( मी त्या कुमाराला बोललों ) न अहं इमं वेद ( हा पुरुष मला ठाऊक नाहीं. ) यदि अहं इमं अवेदिषं कथं ते न अवक्ष्यं इति । समूलः वै एषः परिशुष्यति यः अनृतं अभिवदति, तस्मात् न अनृतं वक्तुं अर्हामि ( जर मला या पुरुषाचें ज्ञान असतें तर तें मी तुला कसें सांगितलें नसतें ! जो मनुष्य खोटें बोलतो, तो *मूळासकट* नष्ट होतो, हें मला ठाऊक आहे म्हणून मी केव्हांही खोटें बोलावयाचा नाहीं. ) सः रथं तूष्णीं आरुह्य प्रवव्राज ( तो निरुत्तर

होऊन व लज्जित होऊन रथांत बसला आणि निघून गेला. ) क्व असौ पुरुषः इति तं त्वा पृच्छामि ( म्हणून आपल्यास विचारितों कीं तो कलात्मक पुरुष कोठें आहे ? ) ॥ १ ॥

या मंत्रांत सोळा कलांचा पुरुष कोण आहे व त्याचें स्वरूप काय, अशा अर्थाचा प्रश्न आहे. याचें उत्तर पिप्पलाद मुनि पुढील मंत्रांत देणार आहेत. प्रसंगप्राप्त ही गोष्ट वाचकांनीं लक्षांत ठेवावयाची कीं, पूर्वकालीं क्षत्रिय लोक आणि त्यांतून राजपुत्रही ब्रह्मविचारासारख्या आत्मिक प्रश्नाची मीमांसा करीत असत आणि ब्रह्मज्ञान मिळविण्यासाठीं ते लागतील तितके प्रयत्न करण्यास व हाल सोसण्यास सिद्ध असत.' तसेंच दुसरें हें लक्षांत ठेवावयाचें कीं कोणीही प्रश्न विचारला व त्याचें उत्तर आपल्यास ठाऊक असलें तर तें उत्तर देण्यास केव्हांही अनमान करावयाचा नाहीं, अशी त्या वेळची पद्धति होती. आणि तिसरी गोष्ट ही कीं असत्य भाषण करणें हें फार मोठें पापकृत्य आहे, अशी तत्कालीन समजूत असून असत्य भाषणाच्या संबंधानें तीव्र तिटकारा जागृत असे. तसेंच, विचारल्याशिवाय आत्मज्ञान किंवा इतर ज्ञान सांगत सुटावयाचें नाहीं, असा संप्रदाय त्यावेळीं असे; असें दिसतें. ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**तस्मै स होवाच इहैवान्तःशरीरे सोम्य स पुरुषो यस्मिन्नेताः षोडश कलाः प्रभवन्तीति ॥ २ ॥**

अन्वय व अर्थ—तस्मै सः उवाच ( त्याला आचार्यांनी उत्तर दिलें ) सोम्य, यस्मिन् एताः षोडश कलाः प्रभवन्ति, सः पुरुषः इह एव अन्तःशरीरे इति ( हे सौम्य, ज्याच्यामध्यें सोळा कलांचा उद्भव होतो, तो पुरुष येथेंच आपल्या अंतःकरणरूपी शरीरांत वास्तव्य करितो. समजलास? ) ॥२॥

ज्याच्यापासून सोळा कलांची उत्पत्ति होते तो पुरुष कोठें आहे [redacted] प्रश्नाला हें उत्तर मिळालें कीं तो पुरुष जीवांच्या शरीरांतच वास्तव्य करीत असतो. सोळा कला कोणत्या तें चौथ्या मंत्रांत सांगणार आहेत. हा पुरुष म्हणजे, आत्मस्वरूप होय. सोळा कला ह्या पुरुषाचे ठिकाणीं असतात. किंवा हा पुरुष षोडशकलात्मक आहे, असें म्हणण्याचा श्रुतीचा अभिप्राय नाहीं. त्याच्यामध्यें सोळा कला निर्माण होतात हें खरें; तथापि तो स्वरूपतः निष्कल आहे, कलारूप आहे असें पुढें पांचव्या व सहाव्या मंत्रांत श्रुतिच स्वतः सांगणार आहे. या सोळा कला पुरुषामध्यें उत्पन्न होतात व अस्ताला जातात असें भासमात्रानें दिसतें, हें श्रुतीस सांगावयाचें आहे. पुरुषाचें स्वरूप निष्कल म्हणजे निर्गुण

आहे. या कला सूर्यांवर येणाऱ्या अभ्राप्रमाणें, क्षणभंगुर आहेत. अभ्रें येतात व जातात, तथापि सूर्यस्वरूपाला त्यापासून यत्किंचितही विकार उत्पन्न होत नाहीं. कला बदलल्या म्हणजे आत्मस्वरूप मोठें किंवा लहान होतें, सविकृत अथवा अविकृत होतें असा भाग नाहीं. तें निर्विकार अखंड, निर्गुण आणि एकस्वरूप असतें, असें विशेषत्वानें येथें सांगावयाचें आहे. या मंत्राच्या भाष्यामध्यें श्रीमच्छंकराचार्यांनीं बौद्धांच्या, नैयायिकांच्या व चार्वाकादि नास्तिकांच्या म्हणण्याचा विचार करून त्यास उत्तर केलें आहे, तें जिज्ञासु वाचकांनीं काळजीपूर्वक वाचावें अशी माझी त्यास आग्रहाची विनति आहे. ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**स ईक्षांचक्रे कस्मिन्नहमुत्क्रान्त उत्क्रान्तो भविष्यामि कस्मिन्वा प्रतिष्ठिते प्रतिष्ठास्यामीति ॥ ३ ॥**

अन्वय व अर्थ—सः ईक्षांचक्रे (त्या पुरुषानें विचार केला) कस्मिन् उत्क्रांते अहं उत्क्रांतः भविष्यामि, कस्मिन् वा प्रतिष्ठिते प्रतिष्ठास्यामि इति (कोणती गोष्ट उत्क्रांत झाली असता मी उत्क्रांत होईन व कोणती गोष्ट स्थित झाली असता मी स्थित होईन, असा विचार आत्म्यानें केला) ॥३॥

येथें आत्मस्वरूपापासून सृष्टि–उद्भव कसा झाला याचा विचार केला आहे. कोणत्या गोष्टी आविर्भूत (प्रकट) झाल्या असतां आत्मस्वरूप प्रकट होईल व कोणत्या गोष्टी तिरोभूत (अस्तगत) झाल्या असतां आत्मस्वरूप अदृश्य होईल याची मीमांसा आत्म्यानें केली आणि तदनुसार सृष्टीची उत्पत्ति केली. या सृष्टीच्या उत्पत्तीनें आत्मस्वरूपांत कांहीं विकृति झाली असा मात्र भाग नाहीं. सृष्टि उत्पन्न करणें किंवा ती लयाला नेणें हीं कार्ये झालींशीं आपल्यास दिसतात, परंतु वस्तुतः परमार्थामध्यें कांहीं उत्पन्न होत नाहीं किंवा कांहींहि जात नाहीं अशी स्थिति असते. मृगजल उत्पन्न होणें किंवा तें नाहींसें होणें इत्यादि कार्यांनीं सूर्यस्वरूपांत जसा कोणत्याही प्रकारचा विकार प्राप्त होत नाहीं, तो स्वतः आहेसाच असतो, तशीच विश्वाच्या उत्पत्तीची, स्थितीची व लयाची गोष्ट आहे. व्यावहारदृष्टीनें पाहिलें असतां ही सृष्टि ज्ञानपूर्वक झाली आहे असें दिसतें व व्यवहारांत ती तशी आहे ही. तथापि परमार्थदृष्टीनें आत्मस्वरूपाकडे सृष्टिकर्तृत्वाचा किंवा संहारकत्वाचा भाग येत नाहीं. व्यवहारांत परमेश्वर हा सृष्टीचा उत्पादक, संरक्षक आणि विनाशक आहे असेंच धरून चाललें पाहिजे. ज्ञानाच्या आणि ज्ञानपूर्वक प्रयोजनाच्या वशानें उत्पत्ति–स्थिति–लयाचें कर्म चाललें आहे. हा सृष्टीचा नियंता सर्व मंगलगुणांनीं परिपूर्ण आहे, म्हणून

या सृष्टिनियंत्याची आपण सर्वात्मना उपासना केली पाहिजे व त्यास प्रिय होईल असेंच कर्म केलें पाहिजे. हें सर्व नीट आहे; तथापि उपासनेनें व ईश्वरानुकूल कर्मानें परिशुद्ध होऊन जीव तत्त्वज्ञानाचें अध्ययन करण्यास योग्य झाला म्हणजे त्याला परमात्म्याचें व जीवात्म्याचें स्वरूप एकच असून तें निर्विकार, निर्गुण आणि निरामय आहे असेंच प्रत्ययास येईल. सारांश, व्यावहारिक सृष्टि परमेश्वरानें निर्माण केली, अन्य कोणी नाहीं, असें या श्रुतीनें सिद्ध होतें. म्हणून सांख्यादि वाद्यांचें म्हणणें ठीक नाहीं, असा निश्चय होतो. सारांश, सृष्टि उत्पन्न झाली म्हणजे परमेश्वरी स्वरूप प्रकट होतें; पण तें स्वरूप परमार्थतः अखंड आणि निरंजन आहे; हें जिज्ञासु पुरुषांनीं समजून घ्यावें. ॥ ३ ॥

---

### मंत्र चवथा.

**स प्राणमसृजत प्राणाच्छ्रद्धां खं वायुर्ज्योतिरापः पृथिवीन्द्रियं मनः । अन्नमन्नाद्वीर्यं तपो मन्त्राः कर्म लोका लोकेषु च नाम च ॥ ४ ॥**

अन्वय व अर्थ—सः प्राणं असृजत ( त्यानें प्राणाची म्हणजे हिरण्यगर्भाची–सर्व प्राणाच्या इंद्रियादिकांचा व प्राणांचा आधार असणाऱ्या पुरुषाची–उत्पत्ति केली ) प्राणात् श्रद्धां, खं, वायुः, ज्योतिः, आपः, पृथिवी, इंद्रियं, मनः, ( प्राणापासून शुभकर्मांची इच्छा देणारी श्रद्धा, आकाश, वायु, तेज, जल, पृथिवी, कर्मेंद्रियें, ज्ञानेंद्रियें आणि अंतःकरणचतुष्टय, हा वस्तु निर्माण केल्या. )–सः–अन्नं असृजत ( त्यानें अन्न म्हणजे उपभोगाचे पंचभूतात्मक पदार्थ उत्पन्न केले. ) अन्नात् वीर्यं, तपः मन्त्राः कर्म, लोकाः, लोकेषु च नाम च ( अन्नापासून वीर्य–सामर्थ्य–तप, मंत्र, भुवनें आणि भुवनांतील नामरूपें उत्पन्न केली. ) ॥ ४ ॥

परमेश्वरानें विचारपूर्वक प्राणाची व अन्नाची उत्पत्ति केली. पहिल्या प्रश्नांतील कबंधीच्या विनंतीला जें उत्तर मिळालें याचा हा अनुवाद आहे. येथें जास्ती हें सांगितलें आहे कीं, प्रत्येक प्राणी आपल्या पुरुषार्थासाठीं रात्रंदिवस प्रयत्न करीत असतो. आपलें कल्याण व्हावें व इष्ट हेतु साधावे या साठीं प्रत्येक प्राण्याची जी प्रयत्नवृत्ति विचारपूर्वक सुरू असते तिला श्रद्धा असें म्हणतात. याला ( Faith ) किंवा ( Will-Force ) असें ही म्हणावें. कारण तरी एक अत्युत्तम वस्तु आहे आणि तिची प्राप्ति आपल्यास करून घेतली पाहिजे असें ज्ञान व अशी कर्म-प्रेरणा यांचा श्रद्धेमध्यें अंतर्भाव होतो. मानवी विचाराच्या

पलीकडे असून विचारांस आश्रय देणारी जी शास्त्रपरंपरा ती सत्य आहे, अशी भावना असणें याला श्रद्धा असें म्हणतात व ही श्रद्धा आपलें इष्टतम पुरुषार्थ साध्य करून घेण्याविषयीं प्राण्यास प्रेरणा करीत असते. अशी; या श्रद्धेनंतर पंचमहाभूतांची आपापल्या गुणांसह उत्पत्ति झाली. हीं पंचमहाभूतें जीवाला आपलें इष्टतम पुरुषार्थ साध्य करण्याच्या कामीं साहाय्य करितात. या पंचमहाभूतांच्या साहाय्यानें जीवांच्या ज्ञानेंद्रियांचीं, कर्मेंद्रियांचीं तसेंच अंतःकरणचतुष्टयाचीं उपादान—कारणें सिद्ध होतात. अशी; परमेश्वरानें प्राण्यांच्या भोगासाठीं अनेक पदार्थ उत्पन्न केले, त्या पदार्थांपासूनच वीर्य म्हणजे बल, तप, ऋग्वेदादिकांचे बोधक मंत्र, प्राण्यांचें कर्म, अनेक भुवनें आणि येथील नामरूपें हीं उत्पन्न होतात. या संबंधानें उपसंहारांत विशेष विचार करावयाचा आहे. म्हणून हें प्रकरण येथेंच सोडून देतों. ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा.

**स यथेमा नद्यः स्यन्दमानाः समुद्रायणाः समुद्रं प्राप्यास्तं गच्छन्ति भिद्येते तासां नामरूपे समुद्र इत्येवं प्रोच्यते । एवमेवास्य परिद्रष्टुरिमाः षोडश कलाः पुरुषायणाः पुरुषं प्राप्यास्तं गच्छन्ति भिद्येते चाऽऽसां नामरूपे पुरुष इत्येवं प्रोच्यते स एषोऽकलोऽमृतो भवति तदेषः श्लोकः ॥ ५ ॥**

*अन्वय व अर्थ*—यथा इमाः स्यंदमानाः समुद्रायणाः नद्यः समुद्रं प्राप्य अस्तं गच्छन्ति, तासां नामरूपे भिद्येते, समुद्रः इति एवं प्रोच्यते (नित्य वाहणाऱ्या व समुद्राकडे जाणाऱ्या ह्या नद्या समुद्रांत प्रवेश करितात, तेथें अस्ताला जातात, त्यांचीं नामरूपें नाहींशीं होतात व सर्वांस समुद्र असें नांव प्राप्त होतें.) एवं एव अस्य परिद्रष्टुः इमाः पुरुषायणाः षोडश कलाः पुरुषं प्राप्य अस्तं गच्छन्ति, आसां नामरूपे भिद्येते, च पुरुषः इति एव प्रोच्यते (त्याचप्रमाणें ह्या सर्वज्ञ पुरुषाच्या सोळा कला पुरुषाकडे जाण्यास प्रवृत्त होतात, पुरुषाची गांठ पडल्यावर अस्ताला जातात; त्यांचीं नामरूपें नाहींशीं होतात व त्यांस पुरुष अशी संज्ञा प्राप्त होते.) सः एषः अकलः अमृतः भवति (तो हा पुरुष निष्कळ आणि मरणशून्य

असतो. ) तत् एषः श्लोकः ( ह्याच अर्थ समर्थन करणारा पुढील मंत्र आहे. ) ॥ ५ ॥

या मंत्रांतील दृष्टांत तर स्पष्टच आहे. प्रत्येक अखंड नदीचा प्रवाह समुद्राकडे चाललेला आहे. समुद्राशीं संगम झाल्यावर प्रत्येक नदीचें नामरूप नष्ट होतें आणि त्या सर्व जल-संचयास समुद्र हें नांव प्राप्त होतें. हा आबालवृद्धांचा अनुभव सर्वप्रसिद्ध आहे. याच प्रमाणें श्रुति असें म्हणते कीं सर्वज्ञ व सर्वसाक्षी पुरुषापासून निघालेल्या सर्व कला, नित्यपुरुषप्राप्त्यर्थ म्हणजे आत्मस्वरूपाच्या प्राप्तीसाठीं प्रयत्न करीत असतात. इष्टार्थसिद्धि झाली म्हणजे त्यांचीं नामें आणि त्यांचीं रूपें नाहींशीं होतात आणि त्यांस आत्म्याचें नांव प्राप्त होतें. सारांश, ह्या सर्व कला आत्मरूप होतात. या प्रमाणें सर्वाधिष्ठान असणारा पुरुष कलाशून्य आहे, गुणधर्मशून्य आहे आणि जरामरणशून्य आहे, असें स्पष्ट होतें; समुद्रास मिळणाऱ्या नद्या आल्या काय किंवा गेल्या काय, त्याच्या योगानें समुद्र मोठा किंवा लहान होत नाहीं. येणाऱ्या नद्या त्यांत भर टाकीत नाहींत किंवा नद्या आल्या नाहींत तर त्याचा जलसंचय कमी होत नाहीं. सारांश, नद्यांच्या अपेक्षेनें समुद्र हा निर्गुण आणि अजरामर आहे. असा प्रकार पुरुषोत्तमाचा आहे. तो सोळा कला उत्पन्न करितोसा दिसतो, आत्मस्वरूपाच्या अधिष्ठानावर सोळा कलांची उत्पत्ति झालीशी दिसते, तसेंच ह्या सर्व कला म्हणजे विश्वांतील सर्व सामर्थ्यें व सर्व जड वस्तु आत्मस्वरूपांत लीन होतातसें दिसतें. तथापि विश्वाच्या उत्पत्तीनें किंवा लयानें आत्मस्वरूपांत कोणताही विकार होत नाहीं. कारण तो स्वतः निर्गुण आहे. यावरून श्रुतीला आत्म्याचें निर्गुणस्वरूप अभिप्रेत आहे, उत्पत्तिस्थितिलयाचा प्रकार व्यावहारिक, तात्पुरता, क्षणभंगुर आहे असें म्हणावयाचें आहे, असें मला वाटतें शिवाय वाचकांच्या लक्षांत हेंही येईल कीं येथें श्रुतीनें जीवाचा प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें उल्लेख केला, तथापि श्रुतीनें जीवाच्या आत्म्याचा ( Soul ) उल्लेख कोठेंही केला नाहीं. मला असें वाटतें कीं, सोळा कला नाहींशा केल्या म्हणजे परमात्मस्वरूपांत व प्रत्यगात्म स्वरूपांत यत्किंचितही भेद राहावयाचा नाहीं. इतकेंच नव्हे तर तीं उभयताही एकच आहेत असें विचारांतीं ठरेल. श्रुतीला ही हें एकत्व इष्ट आहे असो. ॥ ५ ॥

---

मंत्र सहावा.

अरा इव रथनाभौ कला यस्मिन्प्रतिष्ठिताः । तं वेद्यं पुरुषं वेद यथा मा वो मृत्युः परिव्यथा इति ॥६॥

अन्वय व अर्थ—रथनाभौ अराः इव यस्मिन् कलाः प्रतिष्ठिताः, तं वेद्यं पुरुषं वेद ( रथाच्या नाभीमध्यें जशा सर्व अरा प्रतिष्ठित होतात त्याप्रमाणें ज्याच्यामध्यें सोळा कलांचें प्रतिष्ठापन झालें आहे, त्या ज्ञेय पुरुषाचें ज्ञान करून घ्यावें. ) यथा वः मृत्युः मा परिव्यथाः ( —असें ज्ञान करून घ्यावें—कीं ज्या योगानें तुम्हांला मृत्यूपासून पीडा होणार नाहीं. ) ॥ ६ ॥

याही मंत्रांत चाकांच्या अरांचा दृष्टांत देऊन असें दाखविलें आहे कीं, चाकाच्या अरा रथाच्या तुंब्यामध्यें जाऊन प्रतिष्ठित होतात, तथापि त्या अरा तुंब्याचें किंवा रथाचें स्वरूप ठरवित नाहींत. त्या प्रमाणेंच सर्व कला जरी परम पुरुषाच्या आधारावर राहतात; तथापि तो पुरुष स्वतः सर्वतः निरपेक्षच आहे. असो; जर आपल्यास जन्ममरणाची भीति नाहींशी करून घ्यावयाची असेल, जाणाऱ्या येणाऱ्या कलाचक्रांतून मुक्त व्हावयाचें असेल, तर जो ज्ञानस्वरूप आहे, जो ज्ञान्याला मात्र ज्ञानरूपानें प्रतीत होणार, त्या सच्चिदानंदैक पुरुषाचें ज्ञान करून घ्यावें म्हणजे कोणत्याही प्रकारें जन्ममृत्यूची पीडा होणार नाहीं. पुरुष या पदानें असा अर्थ व्यंजित होतो कीं, सर्व पदार्थास आश्रय देणारा, त्यांचें नियमन करणारा व त्यांस लयास नेणारा, आत्माराम स्वतः परिपूर्ण आहे, निरपेक्ष आहे आणि ज्ञानस्वरूप आहे. ॥ ६ ॥

---

## मंत्र सातवा.

### तान्होवाचैतावदेवाहमेतत्परं ब्रह्म वेद।
### नातः परमस्तीति ॥ ७ ॥

अन्वय व अर्थ—तान् ह उवाच ( पिप्पलाद मुनि पुढें म्हणाले, ) एतावत् एव अहं एतत् परं ब्रह्म वेद ) मला परब्रह्माचें स्वरूप येथपर्यंत मात्र ठाऊक आहे. ) न अतः परं अस्ति ( आतां यापुढें पलीकडे सांगावयाचें किंवा जाणावयाचें असें कांहीं राहिलें नाहीं. )

*सारांश, गुरूनें जितका उपदेश करणें शक्य आहे तितका उपदेश पिप्पलादाचार्यांनीं केला. आतां पुढें सांगावयाचा भाग राहिला नाहीं. एकनिष्ठ मनन आणि एकनिष्ठ चिंतन यांनी सिद्ध होणारा जो साक्षात्कार तो ज्याचा त्यानेंच करून घेतला पाहिजे. उपदेशाचा भाग येथें संपला व उपनिषदार्थाचीही परिसमाप्ति झाली ॥ ७ ॥*

---

## मंत्र आठवा.

ते तमर्चयन्तस्त्वं हि नः पिता योऽस्माकमविद्यायाः परं पारं तारयसीति । नमः परमऋषिभ्यो नमः परमऋषिभ्यः ॥ ८ ॥

या मंत्राचा अन्वय व अर्थ सरळ आहे व येथें विस्तारानें सांगण्यासारखें अवेंही कांहीं नाहीं. विद्येचा उपदेश झाल्यावर गुरूची पूजा करणें हें योग्यच आहे. तसेंच अविद्येच्या समुद्रांतून तारून नेऊन शिष्यास मुक्त करणारा गुरु हा जन्म देणाऱ्या जनकाइतका थोर आहे असेंच नव्हे, तर त्याची योग्यता आईबापांपेक्षां व योगक्षेम चालविणाऱ्या यजमानापेक्षांही जास्त श्रेष्ठ आहे. ॥८॥

सहावा प्रश्न समाप्त.

याप्रमाणें प्रश्नोपनिषदाचें विवरण समाप्त झालें.

# प्रश्नोपनिषत्.

## इतर आचार्यांच्या सिद्धान्तांचा उल्लेख.

येथें श्रीमद्रामानुजाचार्यादि भाष्यकारांनीं शंकराचार्यांच्या भाष्याहून कोठें विभिन्नता प्रकट केली आहे, तिचें स्वरूप सांगून एकंदर त्यांचा अभिप्राय काय आहे हें कळविण्याचें योजिलें आहे.

### श्रीरंगरामानुजाचार्य.

### प्रश्न पहिला.

चौथ्या मंत्रांत प्रजापतीचा अर्थ परमात्मा अथवा ब्रह्म असा केला आहे. सहाव्या मंत्रात आदित्याचा अर्थ जीव असा करून, प्राच्यान् प्राणान् म्हणजे चक्षुरादिकरून इंद्रियें असा गोड अर्थ केला आहे. रश्मीचा अर्थ धर्मसंबंधी ज्ञान असा केला आहे. दहाव्या मंत्रांत सांगितलेलें अमृत आणि अभयस्थान परब्रह्माचें आहे, केवळ सूर्याचेंच आहे असें नव्हे, असें स्पष्ट सांगितलें आहे; कारण ज्ञानकर्मसमुच्चयानें अमृत मिळतें असा याचा सिद्धांत आहे. अकराव्या मंत्रातील पञ्चपाद' याचा संवत्सर, संवत्सर, परिवत्सर, इडावत्सर, अनुवत्सर, असा ठीक अर्थ केला आहे. सप्तचक्राचा 'सहस्तक' अर्थ चिंतनीय होय. पंधराव्या मंत्रातील 'प्रजापति-व्रत म्हणजे मंत्रपूर्वक अन्नभक्षण करणें होय. अन्न मात्र भक्षण करणारे ब्रह्मचर्यशून्य लोक प्रजा उत्पन्न करितात व त्यास पुत्र, पशु, अन्न-आदि संसारलोक प्राप्त होतो' असें या आचार्यांचें म्हणणें आहे.

पहिल्या प्रश्नातील भावार्थासंबधानें केवलाद्वैत आणि विशिष्टाद्वैत यांच्यामध्यें फारसा भेद उत्पन्न होणें शक्य नाहीं. शंकराचार्य प्रजापति शब्दानें हिरण्यगर्भाचा अवतार करितात, तर श्रीमद्रामानुज वरील शब्दानें सर्व नियामक व सर्वव्यापी परब्रह्माचा अवतार करितात. उभयतांनीं आपआपल्या तत्त्वज्ञानविषयक समजुतींस वश होऊन प्रत्येक मंत्र आपल्या पूर्वग्रहास अनुकूल आहे, असें ठरविण्याचा प्रयत्न केला आहे. दुसऱ्या किरकोळ भेदांपैकीं कांहींचा निर्देश वर केला आहे; त्यावरून मुख्य तात्पर्यांमध्यें विशेष विरोध दिसत नाहीं, असें वाचकांच्या प्रत्ययास येईल.

### प्रश्न दुसरा.

तिसऱ्या मंत्रात मुख्य प्राणाचें महत्त्व असें वर्णिलें आहे कीं, आकाशादि पञ्चमहाभूतें आपापलीं स्वकार्यें मात्र करण्यास समर्थ असतात. देहाचीं सर्व कार्यें करण्याचें सामर्थ्य त्यांपैकीं कोणाही एकास नसतें; पण

प्राण सर्व भूतांच्या स्वस्वकार्यांचें निमित्तकारण असल्यामुळें प्रत्येक महाभूताचें कार्य त्यास करितां येतें, पण पंचमहाभूतांपैकीं कोणत्याही भूताला प्राणाचीं जीवधातृत्व व जीवदातृत्व इत्यादि कामें करितां येत नाहींत. हा कायदो विशेष स्मरणीय अर्थविशेष मला दिसत आहे. सहाव्या मन्त्रातील क्षत्र आणि ब्रह्म या शब्दांचे स्थावर आणि जंगम प्राणी असा उपलक्षणानें अर्थ करून मन्त्राचें विवरण केलें आहे.

## प्रश्न तिसरा.

दुसऱ्या मन्त्रात ब्रह्मिष्ठ या पदाचा अर्थ ब्रह्मवेत्ता असा केला आहे. तिसऱ्या मन्त्रात 'अकृतेन' याचा प्रयत्नाशिवाय असा अर्थ करून आतत म्हणजे अविनाभाव (नित्य साहचर्य) असा अर्थ केला आहे, आणि तात्पर्यार्थ असा काढला आहे कीं, मन आणि प्राण हे पुरुषाशीं नित्य साहचर्यानें असतात. म्हणजे परब्रह्म हें नित्य मन आणि प्राण या विशेषांनीं युक्त असतें. हा अर्थ विशिष्टाद्वैताच्या सरणीस योग्यच होय. आठव्या मन्त्रात आदित्याला बाह्य प्राण असें म्हटलें आहे. हा केवल उपचार आहे आणि उपासनेचा अर्थ सिद्ध व्हावा, यासाठीं आदित्यादिकांस प्राणात्मकत्व अर्पित केलें आहे. दहाव्या मन्त्रात मुख्य प्राण आणि उपप्राण हे सर्व जीवामध्यें लीन होतात, जीव प्राणामध्यें लीन होत नाहीं, असा अर्थ केला आहे. शंकराचार्य म्हणतात कीं, लिंगदेह मुख्य प्राणामध्यें (हिरण्यगर्भामध्यें) लीन होतो. पण श्रीरंगरामानुज म्हणतात कीं, जीव उत्क्रांत होवो किंवा प्रतिष्ठित होतो, तो प्राणासह होतो. असो.

## प्रश्न चौथा.

पांचव्या मन्त्रात 'देव' शब्द जीवाचा बोध करितो, असें म्हटलें आणि सहाव्या मन्त्रात 'युक्त होतें' असें जें म्हटलें आहे, तें भौतिक शरीरात जीव असेल तर होतें, नाहीं तर नाहीं, असें मन्त्राचें तात्पर्य काढिलें आहे आठव्या आणि नवव्या मन्त्राचें तात्पर्य असें ठरविलें कीं, आत्मा ज्ञानरूप नसून तो ज्ञानी आहे आणि त्याच्या आश्रयानें सर्व चेतनाचेतनरूप प्रपञ्च राहतो या म्हणण्यानें मायावादाचा निरास होतो असें रंगरामानुजाचार्यांचें मत आहे. दहाव्या मन्त्रात छाया शब्दाचा अर्थ ज्ञानाचा संकोच करणारें कर्म असा अर्थ करून, अच्छाय म्हणजे निष्पाप असें ठरविलें। येथें परब्रह्म म्हणजे वासुदेव होय.

## प्रश्न पांचवा.

तिसऱ्या मन्त्रातील 'एकमात्र' या पदानें अपरब्रह्माचा वाचक 'ह्रस्व प्रणव' असा अर्थबोध केला आहे आणि चौथ्या मन्त्रातील द्विमात्रप्रणव हाही अपरब्रह्माचा मात्र वाचक आहे, असें सांगितलें आहे. पांचव्या मन्त्रातील जीवघन याचा अर्थ आत्मप्रत्यक्षपर्यंत असणारें संसारमंडल आणि पुरुष म्हणजे वासुदेव असें

अर्थ केले. वासुदेवाचें ध्यान करणारे लोक ब्रह्मलोकाला म्हणजे वासुदेवलोकाला जातात असें या मंत्रांत सांगितलें. सहाव्या मंत्रांत विप्रयुक्त म्हणजे अत्यंत लवकर ज्यांचा उच्चार केला आहे अशा मात्रा होत. अर्थातच त्यांचा एकमेकांशीं दृढ संयोग होणें म्हणजे अन्योन्यसक्तता होय. तात्पर्य, अत्यंत सावकाश रीतीनें मात्रांचा उच्चार केला असतां, त्या मात्रांचा तो उच्चार अनर्थावह होतो, असें स्पष्ट सांगावयाचें आहे. यज्ञादिक बाह्य क्रिया, मानसक्रिया आणि मध्यमा म्हणजे जपरूप वाचिक क्रिया ह्या तीन क्रियांमध्यें तिन्ही मात्रांचा यथार्थ उपयोग केला असतां जीव निर्भय होतो असें ठरतें.

या प्रश्नाचें तात्पर्य असें काढिलें आहे कीं, पाहण्याचें अथवा विचार करण्याचें कर्म करणाऱ्या परमात्म्याकडे जीवाला ॐकाराच्या आश्रयानें जातां येतें. प्रश्नांत उल्लेखिलेलें शांत, अजर, अभय आणि अमृतदायी स्थान हें परमात्म्याचें वास्तव्य स्थान आहे. म्हणून ॐकाराचें यथाशास्त्र ध्यान करणारा जीव हिरण्यगर्भापर्यंतच न जातां परमात्मस्वरूपापर्यंत जातो. जीवघन शब्दानें हिरण्यगर्भाचाही उल्लेख होतो. त्या जीवघनाच्या पलीकडे ॐकाराच्या मात्र साहाय्यानें जीवास जातां येतें. म्हणून जीवघनांत अंतर्भूत होणारा जो हिरण्यगर्भ, त्याच्या पलीकडे असणाऱ्या परब्रह्मस्थानाप्रत ॐकाराचा आश्रय करणारा एकनिष्ठ उपासक जातो असें तात्पर्य आहे. एकमात्रक प्रणवाची (ह्रस्वोच्चारित प्रणवाची) उपासना करणाऱ्या जीवाला मनुष्यलोकाची प्राप्ति होते. एकनिष्ठ द्विमात्रक ॐकाराची, मध्यमोच्चारित प्रणवाची, उपासना करणारास स्वर्गलोक प्राप्त होतो; आणि त्रिमात्रक प्रणवाची, दीर्घोच्चारित प्रणवाची, उपासना करणारा जीव परब्रह्माची प्राप्ति करून घेतो. असें पांचव्या प्रश्नाचें तात्पर्य यांनीं काढिलें आहे.

## प्रश्न सहावा.

या प्रश्नाच्या दुसऱ्या मंत्रांत प्रभवन्ति (समर्थ होतात.) या पदावर विशेष कटाक्ष धरून त्याच्या बळानें या मंत्रांतील पुरुष शब्दाचा अर्थ जीव असा केला आहे आणि त्याचें समर्थन जीव जेथें राहतो, त्या शरीराच्या अंतर्भागानें केलें आहे. या अर्थाचें समर्थन—इह एव अंतःशरीरे (येथेंच अंतःशरीरांत म्हणजे शरीरानें मर्यादित केलेल्या प्रदेशाचा ज्यास आधार आहे, त्या जीवाधिष्ठानामध्यें) अशा या पदाचा अर्थ करून केलें आहे. पुढें चौथ्या मंत्रांत प्राणाला आरंभ करून,—नामापर्यंतच्या सर्व सोळा कला जीवास होणाऱ्या सुख—दुःखादि भोगरूप उपकार करण्यास समर्थ होतात असें म्हटलें आहे. सारांश, षोडशकलत्व जीवाचें मात्र आहे, असें ठरविलें आहे आणि याला नियामक पुढील मंत्र मिळाला आहे. सोळा कलांचा आविर्भाव व तिरोभाव यांना जीवाचा आवि-र्भाव (प्रकट होणें) व तिरोभाव (अस्त पावणें) होतात; म्हणून जीवाला प्राणादि षोडशकलांचें जननसामर्थ्य येऊन षड्कोशत्व संभवनीय होतें.

चौथ्या मंत्रांत तर रंगरामानुजाचार्यांनीं सर्व कलांचें उत्पादकत्व जीवाच्या माथीं मारलें आहे आणि त्याचें समर्थन असें केलें आहे कीं, परमेश्वराच्या संकल्पानुसार वागणाऱ्या अदृष्टोत्पादी (पाप-पुण्यादि धर्मात्मक) कर्मांचें कर्तृत्व जीवाकडे आहे. सारांश, तो प्राणादिकांचा कर्ता आहे. नंतर यापुढील मंत्रांत विशिष्टाद्वैतात्मक विशेष मला दिसला नाहीं. पाठीमागील मंत्रानुसार पुढील मंत्राचा अर्थ केला आहे आणि परमेश्वर कलाजन्य भोक्तृत्वाचा लेश स्वीकारीत नाहीं, म्हणून त्याला निष्कल असें म्हटलें आहे.

पुढें सारांश सांगतांना अशी एक शंका उत्पन्न केली आहे कीं, "ज्याअर्थी पिप्पलादाचार्य 'यापलीकडे परब्रह्म नाहीं, मीं सांगितलें इतकेंच परब्रह्म मला ठाऊक आहे,' असें म्हणतात; त्याअर्थी जीवापलीकडे ब्रह्म नाहीं, असा त्यांचा अभिप्राय दिसतो." या शंकेचें समाधान "जीवब्रह्मामध्यें भेद सांगितला आहे म्हणून तें जीवाहून अधिक आहे." या ब्रह्मसूत्रावर (२।१।२२) भिस्त ठेवून केलें आहे व असें मानलें नाहीं तर सूत्राशीं विरोध येईल असें म्हटलें आहे. ईश्वरानें जगत् उत्पन्न केलें आहे, असें जीव आणि ब्रह्म यांचा अभेद मानून मानिलें तर आपलेंच अहित कोणी करणार नाहीं. ब्रह्माशीं अभिन्न असणाऱ्या जीवानें जगत् उत्पन्न केलें असतें, तर जीवाला दुःख देणारे प्रसंग जगांत आढळतात; तसे आढळले नसते. कारण, ब्रह्म हें सर्वज्ञ, सत्यसंकल्पी इत्यादि मंगलगुणांनीं युक्त आहे. तसाच जीवही असणार; म्हणून जगांत दुःख दिसलें नसतें; पण जगांत दुःख दिसतें. म्हणून जीव आणि ब्रह्म एक आहेत असें मानतां येत नाहीं; असा सिद्धांत केला आहे. तसेंच आपल्या म्हणण्याच्या समर्थनार्थ अनेक द्वैतमूलक श्रुतींचा अवतार केला आहे.

असो, हा वाद फार मोठा आहे. आणि या उत्पन्न केलेल्या शंकेचें समाधान विशिष्टाद्वैती श्रीमद्रामानुजाचार्यांचें सूत्रभाष्य वाचलें असतां सहज करून घेतां येईल. आपल्यापरीनें कां होईना; पण विशिष्टाद्वैताचार्यांनीं अनेक श्रुति एकत्र आणून त्या सर्वांचा अभिप्राय जीव आणि ब्रह्म यांच्यामध्यें परस्पर भेद आहे, असा उद्धृत केला आहे.

तात्पर्य, विशिष्टाद्वैताचें जें मुख्य रहस्य तें या प्रश्नोपनिषदांत श्रीरंगरामानुजांनीं संग्रहित केलें आहे. ब्रह्म सगुण आहे; सर्व-नियामक आहे; सर्वकर्तें आहे; जीवाचें नियामक तेंच परब्रह्म आहे; जीव परब्रह्माहून निराळा आहे; तो अल्पज्ञ आहे; ब्रह्म सर्वज्ञ आहे; जीव अमर आहे; तथापि त्याच्या ज्ञानसंकोचविकासानें रूपांतर पावणारा आहे; मुक्ति मिळविण्यासाठीं त्यानें ज्ञाननिष्ठा व कर्मनिष्ठा यांचा आश्रय केलाच पाहिजे; एक परब्रह्मच मात्र भयशून्य आणि मरणशून्य आहे; सर्वनियामक परब्रह्माच्या संकल्पानुसार अदृष्टानें प्रेरित झालेला जीव प्राणादि षोडश कला उत्पन्न करितो; मिथ्या नाहीं; आत्म्याचें होणारें ज्ञान सत्यरूप मात्र असतें. इत्यादि अनेक सिद्धांत प्रथित केले आहेत.

---

## श्रीमन्मध्वाचार्य.

या आचार्यांनी केलेल्या भाष्यांत व श्रीजयतीर्थकृत विस्तृत टिप्पणींत जो काय अर्थांतरें या उपनिषदांत मला दिसलीं, त्यापैकीं कांहीं नमूद करीत आहें.

### प्रश्न पहिला.

मंत्र पहिला—ब्रह्मपर म्हणजे वेदाच्या अभ्यासामध्यें वेदतात्पर्याकडे मात्र लक्ष देणारे; ब्रह्मनिष्ठ म्हणजे वेदोक्त कर्मांचें अनुष्ठान एकनिष्ठपणानें करणारे होत. हीं विशेषणें ब्रह्मजिज्ञासेचा अधिकार या उपनिषदांतील सहा शिष्यांस होता, हें दाखविण्यासाठीं आहेत. तिसऱ्या मंत्रांत कबंधीच्या प्रश्नाची अशी फोड केली आहे: प्रजांची उत्पत्ति होते हें प्रसिद्ध आहे. याचें कारण कोणतें? अचेतन कारण असणें शक्य नाहीं. चेतनांच्या आश्रयानें अचेतन नसलें म्हणजे तें कांहीं एक कार्य करीत नाहीं, असा अनुभव आहे. तसेंच जीव परतंत्र असल्या-मुळें तोही अचेतनाचा स्वतंत्र नियामक होऊं शकत नाहीं. ईश्वरही प्रजोत्पादनाचें कारण नव्हे. कारण, तसा अनुभव नाहीं. याप्रमाणें सचेतन, अचेतन व परमेश्वर यांपैकीं कोणीही कारण असल्याचें सिद्ध होत नाहीं. तेव्हां प्रजांची उत्पत्ति कशी? असा पहिला प्रश्न आहे. तिसऱ्या मंत्रात प्रजापति याचा अर्थ परमेश्वर केला आहे. परमेश्वरानें तप केलें तें लोकांचें अनुकरण करण्यासाठींच होय. परमेश्वरानें प्राण आणि रयि या उभयतांस उत्पन्न करून असें ठरविलें कीं, हीं उभयतां अनेक प्रकारच्या प्रजा उत्पन्न करतील. या उभयतांमध्यें शिरून मी प्रजोत्पादन करीन. अथवा तीं प्रजोत्पादनाचें निमित्तकारण होतील. हा चौथ्या मंत्रांतील भावार्थ आहे. पांचव्या मंत्रांत सर्व रयि म्हणजे तेज, जल आणि अन्न या मूर्त वस्तु आणि प्रकृत्यादि अमूर्त वस्तु हें राशिद्वय ज्याचें उपादानकारण आहे, तें या मंत्रांतील ' सर्व ' होय. या राशिद्वयापासून विभक्त झालेली जी मूर्ति ती रयि होय. प्राण हा सूर्यांमध्यें राहून प्रजोत्पत्तीचें निमित्तकारण असतो. हें सहाव्या मंत्राचें तात्पर्य आहे शिवाय या आचार्यांनी उपनिषदांत सांगितलेल्या देवांच्या भार्यांचाही अंतर्भाव केला आहे. सातव्या मंत्रांतील संवत्सरांत सान्निध्य करणारा प्रजापति आहे. या संवत्सराचीं दोन अयनें प्राण आणि रयिरूप आहेत. उत्तरायण प्राण आणि दक्षिणायन रयि होय. येथील ' कृत ' शब्दाचा अर्थ अन्य कर्म असा सांगितला आहे. आठव्या मंत्रांतील उत्तरार्धाचा व पूर्वार्धाचा संबंध असा दाखविला आहे कीं, उत्तरार्ध हा दक्षिणमार्गास नेणारा आहे आणि प्रथम अर्ध देवयानमार्गानें जाणारा आहे. नवव्या मंत्रांतील सूर्यलोकास जाऊं इच्छिणारे ऋषि शुक्लपक्षांत इष्टि करितात, म्हणजे निष्काम अशी प्राणपूजा करितात व चंद्रलोकास जाऊं इच्छिणारे ऋषि कृष्णपक्षांत काम्यइष्टि म्हणजे रयि–पूजा करितात; असें तात्पर्य सांगितलें आहे. अहोरात्रांतील दिवस हा प्राण पुरुषामध्यें असतो आणि रात्रीची अधिष्ठात्री रयि स्त्रियांमध्यें असते. म्हणून पुरुषरेतामध्यें राहणारा प्राण

दिवसा स्त्री–संगत झाला, तर तो सग व्यर्थ होतो. हा अर्थ चिंत्य आहे, या आचार्य–मापामध्ये उत्तरायण, शुक्लपक्ष, दिवस हीं सर्व प्राणरूप आणि दक्षिणायन, कृष्णपक्ष आणि रात्र हीं रयिरूप अथवा सरस्वतीरूप आहेत असें प्रतिपादिलें आहे. जे प्रजापतिव्रत करितात ते सत्यलोकाला जातात, असें दहाव्या मंत्राचें तात्पर्य सांगितलें आहे। सारांश, रयि, प्राण व परमेश्वर मिळून सृष्टीची उत्पत्ति होते.

## प्रश्न दुसरा.

या प्रश्नाचें उत्तर देताना आकाशादि पंचमहाभूतांच्या अभिमानी देवता किंवा तत्त्वदेवता स्थिति–हेतु आहेत, व चक्षुरादि देवता प्रकाश–हेतु आहेत आणि त्यांत मुख्य प्राण हा श्रेष्ठ आहे, असें दुसऱ्या मंत्रात देवतांचें पृथकरण केलें आहे. तिसऱ्या मंत्रात 'प्रकाश्य' असा पाठ घेऊन, त्याचा अर्थ प्रकाशवत असा केला आहे. तिसऱ्या मंत्रात "मी या शरीरांतील पंचप्राणादि रूपानीं हें शरीर धारण करितों व प्रकाशितों, अशी वस्तुस्थिति असून तुम्हीं आपसामध्यें धारक कोण व प्रकाशक कोण असा वाद चालला आहे, हा तुमचा मोह होय." असें प्राण इतर देवतांस म्हणाला. अभिमान याचा अर्थ शरीर असा केला आहे. प्राण हाच गर्भस्थ असून, जनिक्रिया करणारा आहे. असा पांचव्या मंत्रातील 'चरसि गर्भे' इत्यादि मंत्रखंडाचा अर्थ केला आहे.

## प्रश्न तिसरा.

परमेश्वर जगाच्या जन्मस्थितिलयाचा नियामक आहे. या सिद्धांताचें स्पष्टीकरण या प्रश्नात केलें आहे. येथें परमेश्वरापासून प्राण कसा उत्पन्न होतो ! त्याचे पंचभेद कसे होतात ! तो शरीरात का वास्तव्य करितो ! त्याचे विभाग कसे ! कोणत्या विभागामुळें जीवाचें उत्क्रमण होतें आणि त्याचीं अधिभूतादि स्वरूपें कशीं ! इत्यादि प्राणविषयक अनेक प्रश्न येथें केले आहेत. दुसऱ्या मंत्रापासून उत्तराला आरंभ झाला आहे. ज्याप्रमाणें छाया ही सर्वथा शरीराधीन असते, त्याप्रमाणें महाश्रेष्ठ जो प्राण तोही आत्म्याच्या अत्यंत अधीन असतो. यावरून प्राणापेक्षा आत्म्याची म्हणजे परमात्म्याची आवश्यता जास्त आहे, असें ठरतें. येथें मन म्हणजे परमेश्वरी संकल्प होय. सारांश, परमेश्वराच्या इच्छेनें प्राण ■ शरीरात प्रवेश करितो व तोच सर्व प्राणाचा (मुख्य प्राणाचाही) नियामक आहे. वायुपुराणात असें सांगितलें आहे कीं, 'प्रभु हा स्वतः पंच प्राणरूपात्मक होतो आणि मोक्षादिकाचें दान करितो. सूर्य हा प्राणाचें बाह्य स्वरूप आहे. सूर्यांत असणारा प्राण नेत्रामध्यें असणाऱ्या प्राणवायूवर अनुग्रह करितो, असें सहाव्या मंत्रात सांगितलें आहे. सातव्या मंत्रात "मरणकाळीं जीवाला ज्या विषयाचें चिंतन असतें त्या विषय–सहित जिवासह जीव मुख्य प्राणाजवळ जातो. पण मुख्य प्राण हा उदानासह व परमेश्वरासह जीवास

त्याच्या इष्ट स्थानाकडे घेऊन जातो. सारांश जीवाचें उत्क्रमण करणारा उदान वायु आहे. याप्रमाणें प्राणाची परमात्म्यापासून उत्पत्ति होते, त्याच्या इच्छेनें तो शरीरांत राहतो. येथें पंचप्राणरूपी होऊन (विविध स्वरूपें धारण करून) मुख्य प्राण आपलें स्वामित्व प्रकट करितो; तोच आध्यात्मिकादि स्वरूपवान् होतो इत्यादि प्रकारचें ज्ञान ज्यास होतें तो मुक्त होतो; असें तिसऱ्या प्रश्नाचें तात्पर्य आहे.

## प्रश्न चौथा.

या प्रश्नांत जगताचें भगवन्नियामकत्व केवळ जागृतावस्थेंतच नाहीं, तर इतर अवस्थांमध्येंही आहे, असें सांगितलें आहे. जीव निद्रा घेत असतां कोणत्या देवता स्वव्यापारापासून निवृत्त होतात? कोणत्या स्वव्यापार करितात? स्वप्नामध्यें पदार्थ पाहणारा कोण? निद्रास्थितींत कोणाला सुख होतें? इत्यादि प्रश्न विचारले आहेत. जीवाला स्वतंत्रतेनें या अवस्था प्राप्त होत नाहींत. मुख्य प्राणाधीनही या अवस्था नाहींत. अतएव कोणाच्या आश्रयानें या जीवाच्या अवस्था असतात? हेंही जाणावयाची शौनकाची इच्छा आहे. दुसऱ्या मंत्रांत सूर्यकिरणांचा दृष्टांत घेऊन असें सांगितलें आहे कीं, स्वप्न पडत असतां सर्व देवता मनामध्यें वास्तव्य करणाऱ्या विष्णु-स्वरूपांत एकत्र होतात, आणि गाढ निद्रेंत हृदयाकाशस्थ विष्णुस्वरूपांत एकत्र होतात. तिसऱ्या मंत्रांत अग्निहोत्राचा दृष्टांत घेऊन अपान हा पश्चिमेकडे असणारा गार्हपत्य अग्नि, व्यान हा दक्षिणेकडे असणारा अग्नि, अपानापासून येणारा प्राण हा आहवनीय अग्नि, श्वासोच्छ्वासाला यथाकाल येणाऱ्या दोन आहुतींसह समत्व रूप देणारा समानवायु हा अध्वर्यु, जीव हा यजमान, इष्ट फळ देणारा उदान हा उद्गाता, इत्यादि रूपक संपूर्ण केलें आहे आणि मनाला स्वप्नदर्शन होतें, असा निष्कर्ष काढिला आहे. चौथ्या मंत्रांत जीव हा परमेश्वरी तेजानें अभिभूत झाल्यामुळें (परमेश्वराचें सान्निध्य प्राप्त झाल्यामुळें) गाढ निद्रेंत त्याला अत्यंत सुखप्राप्ति होते. कारण, भगवंताच्या शरीरासारखें शरीर या वेळीं प्राप्त होतें व त्याला आत्मस्वरूपाचें ज्ञान असतें म्हणून सुख होतें आणि शेवटीं असें सांगितलें आहे कीं, पंचमहाभूतें, त्यांच्या तन्मात्रा, ज्ञानेंद्रियें, कर्मेंद्रियें, शब्दस्पर्शादि सर्व विषय, मनःप्रमुख अंतःकरण पंचक, चेतनप्राणी इत्यादि सर्व पदार्थांस परमेश्वराचा आश्रय आहे. प्राण हा मुख्य धर्ता आहे. परमेश्वर हा सर्वांस सर्वप्रकारची शक्ति देणारा आहे, त्याचें शरीर प्राकृत नाहीं, असें परमेश्वरी ज्ञान ज्यास होईल, तो तत्स्वरूप होऊन त्याच्या जवळ राहतो. सारांश, मुक्त होतो.

## प्रश्न पांचवा.

या प्रश्नांत ॐकारोपासनेचे मंत्र आहेत. तसेंच येथें फलश्रुतीही सांगितली आहे. दुसऱ्या मंत्रांत ओंकार हा परमात्म्याचा प्रतिपादक आहे. आणि त्याच-

प्रमाणें प्रतिमेच्या द्वारा ब्रह्मदेवाचा प्रतिपादक आहे. ज्ञान झालें असतां प्रणव-उपासना फलप्रद होते. प्रणवाच्या तीन मात्रा आहेत. त्या अकार, उकार आणि मकार होत. जो कोणी अकार हेंच अक्षर परमात्म्याचें वाचक आहे, असें समजून अकार–प्रणवानें परब्रह्माचें ध्यान करील, त्याला ऋग्वेदाभिमानी देवतांच्या साहाय्यानें भूलोकावर उत्तम ब्राह्मणकुलीं जन्म प्राप्त होऊन तो तपादिकांनीं संपन्न होईल. याचप्रमाणें द्विमात्रक प्रणवाचें ध्यान करणाराला अंतरिक्ष लोकाची प्राप्ति होते, आणि त्रिमात्रक ओंकारसाहाय्यानें परमात्म्याचें ध्यान करणाराला परमेश्वराचा साक्षात्कार होऊन तो तेजःस्वरूपी होतो. त्याला मात्र पुनर्जन्म प्राप्त होत नाहीं. मंत्रांतील ' जीवघन ' याचा अर्थ विरिंच (ब्रह्मदेव) असा केला आहे. तिसऱ्या मंत्रांत 'विप्रयुक्ताः' म्हणजे एकेक मात्रा निराळेपणानें जाणलेल्या असा अर्थ केला आहे. ' अनविप्रयुक्ताः ' याचाही तोच अर्थ केला आहे. अन्योन्यसक्त म्हणजे दोन मात्रांची जोडी होऊन त्यांचा संबंध झालेल्या मात्रा होत. याप्रमाणें दोन दोन मात्रांचें युग्म जाणलें असतां आणि तार ( उंच ) मंद्र ( मंद) आणि मध्यमस्वरानें त्यांचा उच्चार केला असतां मृत्यूचें निवारण होत नाहीं; पण तिन्ही मात्रांचें उत्तम प्रकारचें ज्ञान होऊन त्यांचा उच्चार यथायोग्य झाला म्हणजे हा ध्याता मुक्त होतो, असा भावार्थ काढिला आहे.

## प्रश्न सहावा.

हा वेळपर्यंत प्राण आणि जीव तिन्ही अवस्थांमध्यें परमेश्वराच्या स्वाधीन असतात असें ठरविलें. या प्रश्नात मुक्त पुरुष सुद्धां त्याच्याच स्वाधीन असतात असें ठरवावयाचें आहे. येथें पहिल्या मंत्रांतील ' पुरुष ' या शब्दाचा अर्थ ' विष्णु ' असा आहे प्राणादि सोळा कला जीवाच्या शरीराचे भाग असतात. त्या विष्णूपासून उत्पन्न होतात, तेथें लय पावतात आणि त्याच्या आश्रयानें असतात. तो पुरुष ( विष्णु ) जीवशरीराच्या अंतर्भागीं असतो. हा प्रथम प्राणाची उत्पत्ति करितो. ' हा सर्वथा माझ्या स्वाधीन असणारा आहे व भक्तिज्ञानादिकांनीं संपन्न होणारा आहे ' असा निश्चय करून परमेश्वरानें जीव–कळेचा अभिमानी जो प्राण त्याची उत्पत्ति केली. प्राणानंतर श्रद्धा, याक्रमानें सोळा कलांची उत्पत्ति परमेश्वरानें केली. येथें ज्या कला सांगितल्या आहेत त्या त्या कलांचा व त्यांच्या अभिमानी देवतांचा समह करावयाचा आहे. असा अर्थ केला म्हणजे मोक्षामध्यें जड कलांचा प्रवेश होत नाहीं आणि जीवासह म्हणजे प्राणाभिमानी देवतेसह परमेश्वरप्राप्ति होते, हें म्हणणें सयुक्तिक होतें. वासुदेव हा प्राणाचा स्वामी असून त्याचा उत्पादक आहे. तो पर, अव्यय, अद्वितीय अशा स्वरूपाचा आहे. मंत्रामध्यें जो क्रम सांगितला आहे, तसाच कलांची उत्पत्ति झाली आहे, असें नाहीं; तर प्राण, मन, इंद्रियें, आकाश, वायु, तेज, जल आणि पृथ्वी असा उत्पत्तीचा क्रम आहे. विष्णु हा नित्यमुक्त आहे आणि

म्हणून तो सर्वोत्तम आहे. म्हणजे याचें उत्तमत्व सर्व-विलक्षण आहे. तिसऱ्या मत्रांत समुद्र हा शब्द प्रथमांत नसून, सप्तमी विभक्तीमध्यें आहे! आणि त्याचा अर्थ समुद्रामध्यें असा करून, समुद्र आणि नद्या यांमध्यें भेद प्रकट केला आहे; आणि या फेरफारानें असा अर्थ केला आहे कीं, समुद्रांत जाऊन मिळणाऱ्या नद्या अज्ञानी लोकांना दिसत नाहींत; तथापि त्यांचीं नामरूपें समुद्राहून निराळींच असतात, असें विद्वान् लोक म्हणतात. त्याचप्रमाणें मोक्षकालीं कला ( नामरूपांसह ) परमेश्वरी स्वरूपांत लीन झाल्या, असें अज्ञानी पुरुषांस वाटतें; पण खरा प्रकार तसा नसून, कलांचीं नामरूपें परमेश्वराहून भिन्न म्हणजे निराळींच असतात, हा सिद्धांत आहे. भेद या शब्दाचा नाश असा कधींच अर्थ होत नाहीं; अवयव-विभाग असा अर्थ होतो. पुढें मग आपण अनुमानानें त्याचा नाश असा अर्थ करितों; शिवाय नामरूपें अवयव-हीन असतात, म्हणून त्यांचा नाश होणें शक्य नाहीं. 'नामरूपे विहाय' येथें 'रूपे' या पदापुढें अवग्रह आहे, असें समजून 'अविहाय' असें पद घेतलें म्हणजे श्रुतीचा अर्थ सुसंगत होतो! तात्पर्य येथें श्रुतीला भेद इष्ट आहे. जीव आणि ब्रह्म हीं निरनिराळीं आहेत, असें सांगावयाचें आहे. श्रुतीला भेदवाद इष्ट आहे, अद्वैतवाद इष्ट नाहीं. याप्रमाणें श्रीमन्मध्वाचार्यांचा सिद्धांत आहे. श्रीमन्मध्वाचार्यांनीं आपल्या सिद्धांताचें प्रणयन श्रुतीच्या व स्मृतिपुराणा-दिकांच्या द्वारें केलें आहे.

---

यापुढें श्रीमद्दयानंद स्वामींचे प्रवचनाचा विचार करावयाचा; पण तें सद्यःप्रसंगीं फारसें इष्ट दिसत नाहीं. कारण हे स्वामीजी प्रायः द्वैतवादी अस-ल्यामुळें त्यांचे सिद्धांत विशिष्टाद्वैताच्या व केवळ द्वैतसिद्धांताच्या मध्यें अंत-र्भूत होतात, म्हणून त्यांचा विचार येथें मी करीत नाहीं.

याप्रमाणें इतर आचार्यांच्या मतांचें विवरण झालें. यावरून कोणाच्याही लक्ष्यांत हें येईल कीं, प्रत्येक आचार्यास जो सिद्धांत खरा वाटत आहे, त्याला अनुसरून प्रत्येकानें त्या सिद्धांतास अनुकूल असा प्रत्येक मंत्राचा अर्थ केला आहे. हें करितांना प्रत्येक आचार्यास थोडीबहुत पदांची व अर्थांची ओढाताण करावी लागली आहे. असो; झालंसंख्येनें मी गणित केलें नाहीं, तथापि मायावादी शंकराचार्यांच्या मतानुसार अर्थ करावयाचा म्हणजे फार कमी ओढाताण पडते, इतर मतांत जास्त पडते, असा माझा अजमास आहे. श्रुतीला केवलाद्वैत मात्र इष्ट आहे; पण अधिकारानुसार श्रुतीनें आपले अपौरुषेय बोल कधीं द्वैतमार्गांत व कधीं अद्वैतमार्गांत प्रकट केले आहेत, अशी माझी समजूत असल्यामुळें, मला अर्थ करितांना कोठेंच अडचण पडत नाहीं. इतर आचार्यांच्या अनुयायांनीं हा प्रकार एकदां अजमावून पहावा

म्हणजे कोठें अडचणी येतात, हें त्यांस समजेल व अर्थांचा उलगडा होईल. परमार्थतः सर्वत्र एकरसात्मक अद्वितीय ऐक्य आहे, असें मानण्याकडे मानवी मनाची अखंड प्रवृत्ति आहे व एकत्व स्थापिल्याखेरीज मनःसमाधान होत नाहीं, असा अनुभव त्रिकालाबाध आहे. असो; श्रुति, युक्ति व अनुभव यांचा हा पुरुषार्थ केवळअद्वैत हा आहे; हें इतरराष्ट्रीय तत्त्वज्ञानाच्या इतिहासावरूनही दिसतें, ही वस्तुस्थिति आहे. याउपर ज्याला जसा अर्थ करावासा वाटेल, तसा तो करण्याचें प्रत्येकास स्वातंत्र्य आहेच! तथापि श्रुतीला, न्यायाला व अनुभवाला कोणता अर्थ पटतो, हें ध्यानांत आणून व आपल्यास पुरुषार्थ साधावयाचा आहे, हें लक्ष्यांत आणून मग कोणती पद्धति स्वीकारणें तें ठरवावें. सत्प्रयत्नाला श्रीहरि यश देतो.

# उपसंहार.

या उपनिषदांत सहा प्रश्नांची चर्चा केली आहे. ते प्रश्न कोणते हें वैदिक उपनिषद्–वाचकांस समजलेलेंच आहे. या प्रश्नांच्या व त्यांस दिलेल्या उत्तरांच्या संबंधानें मला काय म्हणावयाचें आहे, तें आतां सांगतों.—

कोणतेंही उपनिषद वाचावयास घेतलें असतां प्रथमदर्शनीं शिष्याचें विनीतत्व, आचार्याचें माहात्म्य, त्यांच्या संबंधानें शिष्याची पूज्य–बुद्धि आणि ब्रह्म-विद्येचा अभ्यास करण्याला अवश्य लागणारी चित्तशुद्धि, इत्यादिकांचें वर्णन बहुधा सांगोपांग केलेलें असतें. गुरु ज्ञानविज्ञानसंपन्न असावा, शिष्य अधिकारी व विनयपूर्ण असावा, हें विद्यार्जनाचें मुख्य साधन आहे. तसेंच गुरूच्या अंगीं शास्त्रनिपुणता व साक्षात्कारदर्शन या संपत्तीसह ज्ञान–विज्ञानाच्या प्रसाराची आस्था व शिष्य–कल्याणाची कळकळ यांची जशी आवश्यकता आहे, त्याचप्रमाणें शिष्य वैराग्यपूर्ण आणि विवेकनिपुण असून, त्याच्या ठिकाणीं मोक्षाची तीव्र आतुरता असली पाहिजे, हेंही आवश्यक आहे. कोणत्याही विद्येचें अर्जन करूं लागलें असतां वरील गुणधर्म गुरूच्या व शिष्याच्या अंगीं असलेच पाहिजेत. शास्त्र–नैपुण्याप्रमाणें गुरूला युक्तीचें बळ अवश्य आहे. व शिष्याच्या अंगीं श्रद्धा आणि विचारकुशलता असणें हेंही आवश्य आहे. विद्यार्थ्यानें ब्रह्मचर्याचें व्रत अवश्य पाळिलें पाहिजे. शरीररक्षण होऊन विद्येचें एकनिष्ठ चिंतन व निदिध्यास सहज रीतीनें करितां येईल, अशा प्रकारचे शिष्याचे आहार, विहार, चेष्टा ( वर्तन ) आणि निद्रा–जागृति यांची व्यवस्था असली पाहिजे. हा सर्व क्रम योग्य रीतीनें चालेल तर विद्येचें संपादन ठीक रीतीनें होतें.

पहिला प्रश्न प्रजांची उत्पत्ति कशी होते, यासंबंधाचा आहे. विश्वोत्पत्ति-संबंधाचा हा प्रश्न आहे. कोणतेंही तत्त्वज्ञान घ्या, प्रथमतः त्यांत विश्व व जीव यांची उत्पत्ति कशी झाली, हा विचार बहुधा केलेला असतो. आतां या प्रश्नाला आचार्यांनीं जें उत्तर दिलें आहे, तें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. प्रथमतः सृष्टिकर्त्यानें–प्रजापतीनें–तप करून (पूर्वी सृष्टि कशी झाली होती, याचा विचार करून ) मग ही नवीन सृष्टि उत्पन्न करण्यास त्यानें आरंभ केला. यावरून सृष्टि अनादि आहे, येथें उत्पत्ति व क्षय होतात, ते खरोखर पाहतां सृष्टीचे आविर्भाव आणि तिरोभाव होत, असें ठरतें. सूर्य उगवला असतां सूर्यविकासिनी कमळ प्रफुल्लित होतें. हा त्या पुष्पाचा आविर्भाव व सूर्य अस्तास गेला असतां तें निमीलित होतें, हा त्या पुष्पाचा तिरोभाव होय. पुष्पाच्या उघडण्या–मिटण्यापुरताच हा दृष्टांत आहे. तात्पर्य हें आहे कीं, सृष्टींत आवश्यक असणाऱ्या ज्या दोन वस्तु त्या उपादानकारण व निमित्तकारण होत.

यांच्या संबंधामध्यें कालानुसार संयोगवियोग उत्पन्न झाला असतां, सृष्टि प्रकाशित होते किंवा अस्तगत होते हें समजून घ्यावयाचें आहे. पिप्पलादांनीं सांगितलें आहे कीं, प्रजापतीनें प्रथमतः प्राण ( Force ) आणि रयि ( Matter ) हीं दोन द्रव्यें उत्पन्न केलीं. सृष्टिकर्ता हा या प्राण–रयिरूपी मिथुनाचा प्रकाशनकर्ता आहे. इतकेंच नव्हे; पण तो या मिथुनानें घटित झाला आहे; आणि इतकेंच सांगून आचार्य स्तब्ध राहिले असते, तर श्रीमद्रामानुजाचार्यांचे व श्रीमद्वल्लभाचार्यांचे सिद्धांत खरे आहेत, असें मानण्याचा प्रसंग येता. स्थूल दृष्टीनें पाहिलें असतां, सृष्टीची कमलाप्रमाणेंच उघड–झांप होत असते व बाह्यभीमताचें समर्थन होतें. सूक्ष्म विचारांतीं ही उघडझाप एकसारखी होत नसून, प्रत्येक वेळीं कार्य–कारण–संबंधानें होत असते असें दिसतें. पूर्वीच्या सृष्टींत उत्पन्न झालेलीं कार्यें कारणरूप होऊन पुढील सृष्टि विस्तृत करितात, असें नित्य प्रत्ययास येतें. म्हणून नुसत्या आविर्भाव–तिरोभावानें ( उघड-झापीनें ) मनाचें समाधान होत नाहीं; अथवा सत्याची प्रतीति येत नाहीं. आतां, प्रजापति ( किंवा शांकरी सगुणब्रह्म अथवा श्रीमद्रामानजाचार्यांचा परमेश्वर ) प्राण ( जीव, चिद्वस्तु ) व रयि ( जड किंवा अचेतन वस्तु ) या मिथुनानें संघटित झाला आहे असें म्हटलें, तर अथवा चिद्–अचिद् वस्तूंचा ( जड व चेतन यांचा ) नियामक परमेश्वर असून, जड व चेतन हे त्याचे दोन शारीरिक प्रकार आहेत; असें म्हटलें तर तेंही जुळत नाहीं. कारण सर्व मूर्तामूर्त वस्तु रयि आहेत आणि सर्व वस्तु प्राणरूप आहेत, असें याच उपनिषदांत सांगितलें आहे. सर्व वस्तु भोग्य असून प्रत्येक वस्तु भोक्त्री आहे, असें म्हणण्याचा पहिल्या प्रश्नाचा झोंक आहे. अलीकडील शास्त्री असें सांगत असतात कीं, प्राण आणि रयि यांच्यामध्यें विवेक करणें ही गोष्ट प्रायः अशक्य आहे. एकुणिसाव्या शतकाच्या शेवटीं व विसाव्या शतकाच्या प्रारंभीं असा सिद्धांत प्रकट झाला आहे कीं, हें सर्व विश्व म्हणजे प्राणाचे विलास होत. अमूर्त व अरूप आणि निर्गुण परमाणूंच्या आंदोलनांच्या संख्येच्या प्रमाणानें जडाजड वस्तु निर्माण होतात, म्हणजे रयि प्रकट होतो. हें अलीकडील अनुभवशास्त्र–पंडितांचें म्हणणें आहे व अनेक प्रयोग करून त्यांनीं तें आपलें म्हणणें अजमावूनही पाहिलें आहे. तेव्हां पिप्पलादाचे सिद्धांत व अलिकडे सिद्ध झालेले सिद्धांत यांची एकवाक्यता होऊन हें विश्व प्राणात्मक आहे, असें ठरूं पाहत आहे. म्हणजे या दृश्य विश्वांतही प्राण ही एकच वस्तु असून तिच्या कमी–जास्तपणावर किंवा तिच्या आंदोलनावर जडसृष्टीचें अस्तित्व अवलंबून असतें, असें ठरण्याचा व ठरविण्याचा समय जवळ जवळ येत आहे. यावरून 'परमेश्वर म्हणाला, प्रकाश होऊ दे, आणि प्रकाश उत्पन्न झाला' इत्यादि आरंभसृष्टीचें वर्णन अयथार्थ नाहीं; तथापि परमेश्वर मुद्दा पूर्वदृष्टयनुसार पुढील

सृष्टिव्यवस्था करतो, हें मत जास्त सुसंगत दिसतें. पुढें विवर्तवाद हा मात्र विशेष प्रामाणिक आहे, असें सिद्ध होईल. असो.

प्राण ( सूर्य ) आणि रयि ( चंद्र ) या उभयतांच्या बरोबरच कालाचाही संग्रह करावा लागतो. सूर्य, चंद्र आणि काल या वस्तु केव्हां आणि कशा उत्पन्न झाल्या, हें सांगण्याचें धाडस अनुभवशास्त्राला केव्हांही करतां यावयाचें नाहीं. या गोष्टी—मानवी बुद्धि-कक्षेच्या बाहेर आहेत. यांचा उलगडा केवळ वेदप्रदेशें मात्र होणार आहे. सर्वसाक्षी वेद या तीन वस्तु कशा उत्पन्न झाल्या हें सांगतो. प्रथमतः प्रजापति तप करून योगाच्या सामर्थ्यानें पूर्वसृष्टीची व्यवस्था कशी होती हें ध्यानांत आणितो आणि प्राण ( Force ), रयि ( Matter ) व काल यांच्या परस्पर संबंधास चालन देतो. हें वेदाचें अथवा प्रत्येक अपौरुषेय ग्रंथांचें सांगणें आहे. मनुष्याला या गोष्टी समजणें अवश्य आहे म्हणून व या गोष्टी गृहीत घेतल्या असतां सृष्टींतील सर्व गोष्टींचा उलगडा उत्कृष्ट रीतीनें होतो म्हणून या गोष्टी गृहीत धरून व त्यांच्यावर आपण निःसीम श्रद्धा ठेवून पुनःपुनः विचार करण्याची पद्धति कायम ठेविली पाहिजे. तसेंच, या दृश्य विश्वांत अदृश्य प्राणरूपी सत्त्व संचार करीत आहे आणि कालाच्या व स्थलाच्या अनुरोधानें यांत क्रमीभास्वरणा होऊन जडाची उत्पत्ति होत आहे, हें तरतरी आपण समजून घेतलें पाहिजे.

भोग्य पदार्थांवर वासना ठेवून व भोग्य पदार्थांचा अभिमान धरून ( मीच हे भोग्य पदार्थ आहें, हे माझे आहेत मी यांचा कर्ता–भोक्ता आहें, असा अभिमान धरून) चाललों, तात्पर्य, आपण रयिरूप झालों, म्हणजे जीवास इहलोकीं व परलोकीं रयिरूप व्हावें लागतें; पण प्राणाचा उत्कर्ष होण्यासाठीं मात्र रयीचा विनियोग केला पाहिजे, प्राणास शुद्ध प्राणरूप केलें पाहिजे, असें समजून जे लोक भोगांसंबंधानें विरक्त होतात व भोगांचा आणि भोग्य वस्तूंचा अभिमान सोडतात, ते येथें च परत प्राणरूप होतात, हें भक्तांचें सांगणें अनुभवालाही पटण्यासारखें आहे. भोगाच्या पाठीमागें लागणारे लोक पुण्यकर्मी असतील, तर चंद्रलोकास जातात ( येथें प्राणाचें वास्तव्य नाहीं. केवळ जड वस्तूंचा मात्र संग्रह येथें आहे. असें अलीकडील शास्त्री म्हणत असतात. ) व पापकर्मी असतील, तर नरकलोकास जातात आणि यथेंही यांच्या पाठीमागें भोग लागतात. हें आपल्या अनुभवदृष्टीनेंही सर्व सुसंगतच आहे. पण जे लोक पुण्यकर्म करूनही भोगसुखाची वासना ठेवीत नाहींत व भोग्यविषयांचा अभिमान धरीत नाहींत, ते महानुभव जीव देवयानमार्गानें सूर्यलोकास जातात. ( येथें सर्व सामर्थ्यांचा संग्रह आहे, येथूनच सर्व सामर्थ्ये उत्पन्न होतात, येथेंच सर्व सामर्थ्ये लयासही जातात. असें अलीकडील शास्त्रे सांगत असतात. ) आणि तेथून या जीवांस प्रलयकालपर्यंत परत यावें लागत नाहीं, असें उपनिषदाचें म्हणणें आहे. हें म्हणणें सुसंगतही दिसतें. आपल्या एकनिष्ठ चिंतनाचा जो विषय असतो, त्या विषयानुरूप आपलें अंतरंग स्वरूप

होत जातें, असा एक वैदिक सिद्धांत आहे. या सिद्धांताला आधुनिक शारीरिक शास्त्रांचें व मानसिक शास्त्रांचें किती पाठबळ मिळेल हें जरी मला सांगतां येणार नाहीं तरी स्थूलमानानें असें विधान करण्यास मला प्रत्यवाय वाटत नाहीं कीं, आपल्या अत्यंत इष्ट विषयाचें स्वरूप आपल्यास प्राप्त होतें, असा अनुभवही आहे. मद्यपी मद्यमय होतो, गानप्रिय गानमय होतो, नाटकप्रिय मनुष्य नाटकी होतो, इत्यादि हवीं तितकीं उदाहरणें देऊन असें सिद्ध करितां येईल कीं, आपला जो अभीष्ट विषय असेल व तदर्थ सिद्ध करण्यासाठीं अहर्निश आपण सर्वात्मना प्रयत्न करीत असूं तर तत्स्वरूपामध्यें आपलें पर्यवसान होतें. या आनुभविक नियमास अनुसरून शुद्ध प्राणोपासक प्राणरूप होतो ( सूर्यलोकास जाऊन प्राणरूप होतो. ) व केवळ भोगाची उपासना करणारा पुरुष भोगलोकीं ( चंद्रलोकीं अथवा नरकलोकीं ) जाऊन भोगात्मक होतो, असें श्रुती म्हणतात, तें अनुभवदृष्टीनेंही योग्यच आहे. जीवाला मरण नाहीं, भोगी जीवाला अनंत कालपर्यंत भोग घ्यावे लागतात, म्हणजे जन्ममरणाच्या चक्रांत पडावें लागतें आणि भोगविन्मुख प्राणोपासक जीव सूर्यलोकीं जाऊन [redacted] सूर्याच्या अपेक्षेनें अमर होतात, हें सर्व उपनिषदांत सामान्यतः गृहीत धरिलें आहे. चेतनाला अचेतनत्व प्राप्त होणें केव्हांही संभवनीय नाहीं, असें श्रुतीचें सांगणें आहे. चेतन आपलें वसतिस्थान बदलील, अनेक देह धारण करील, ही गोष्ट ठीक आहे; पण चेतन वस्तु नाहींशी होईल, असें कधींही म्हणावयाचें नाहीं. चेतन म्हणजे ज्ञानकला होय आणि प्राण व रयि हीं ज्ञेय म्हणजे जाणण्याच्या वस्तु होत. ज्ञान हें स्वरूपतः ज्ञेय होणें शक्य नाहीं, हें वैदिक विद्यार्थ्यास उलगडून सांगावयास नको आहे.

आतां जे प्रजापतिमताचें अनुष्ठान करितात. म्हणजे त्याच्या प्रमाणेंच कन्यापुत्रांची ( भाग्य मोठ्याची ) उत्पत्ति करितात त्यां पैकीं जे लोक वैदिक मार्गाचें अनुसरण करून तप व ब्रह्मचर्य यांचें अनुष्ठान करितात, ज्यांचें वर्तन सत्याला सोडून कधींही असत नाहीं ते लोक ब्रह्मलोकाला अथवा चंद्रलोकाला जातात; कारण यांची तपश्चर्या व ब्रह्मचर्य ( ऋतुकालीं मात्र भार्यागमन ) हें फलाच्या इच्छेनें झालेलें असतें. पण ज्यांच्याठिकाणीं परस्परविरोधी व्यवहाराचा गंध नाहीं, जे लोक स्वप्नांत किंवा थट्टेतही खोटें बोलत नाहींत आणि ज्यांचें अंतर्बाह्य वर्तन एकरूप असतें ते लोक सूर्यभुवनांत जातात; कारण त्यांचें कर्म शुद्ध म्हणजे निष्काम आणि निरभिमानाचें असतें.

याप्रमाणें प्रश्नोत्तरांच्या संबंधानें असें सांगितलें कीं सर्व प्राणांचें व अन्नाचें अभिधान जो प्रजापति तो प्राण, अन्न, काल, आणि आकाश यांस उत्पन्न करितो; म्हणजे प्रजोत्पादन करितो. दुसरें असें सांगितलें [redacted] केवळ प्राणोपासक निष्काम असतील तर सूर्यलोकास जातात आणि सकाम अन्नोपासक लोक चंद्रलोकाला जातात.

दुसरा जो प्रश्न आला आहे त्याचें उत्तर असें दिलें आहे कीं प्राण ही वस्तु कर्मेंद्रियें, ज्ञानेंद्रियें, चित्तचतुष्टय आणि पंचमहाभूतें या सर्वांपेक्षां श्रेष्ठ असून त्यांचें नियमन करिते. तसेंच, या सर्वांस आपापलीं कर्में करण्याचें सामर्थ्य देऊन या सर्वांकडून ती वस्तु शरीर–विधारणही करविते. 'प्राणाधीनं जगत्सर्वं' हें सर्वथा खरें।

तिसऱ्या प्रश्नांत असें विचारिलें आहे कीं प्राण कोठून उत्पन्न होतो, शरीराशीं त्याचा संयोग कसा होतो, त्याचे विभाग कोणते, तो शरीर सोडून बाहेर कसा जातो आणि त्याचीं दैविक, भौतिक व आध्यात्मिक स्वरूपें कशीं असतात. याला आचार्यांनीं जें उत्तर दिलें आहे तें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. ते म्हणतात कीं–हे सर्व प्रश्न अत्यंत गहन आहेत. यांचीं उत्तरें देणें कठिण काम आहे आणि दिलेलीं उत्तरें समजून घेणें हें त्याहीपेक्षां जास्त कठीण आहे. प्राणाची उत्पत्ति आत्म्यापासून होते. पण आत्मा कर्ता नाहीं, विकारी क्रिया विकार्य नाहीं, असा श्रुतीचा सिद्धांत आहे. आणि येथें तर प्राणाचें जनकत्व आत्म्याकडे दिलें आहे. तेव्हां याची संगति कशी? श्रुतीनें छायापुरुषाचा दृष्टांत देऊन प्राण म्हणजे पुरुषाची छाया असा या प्रश्नाचा अर्थ तिसऱ्या मंत्रांत स्पष्ट केला आहे. येथें मायावादाचा उद्भव होतो. जशी छाया वस्तुत खटकी; त्याप्रमाणेंच आत्मस्वरूपा-पासून उत्पन्न झालेला प्राणही लटका आहे आणि म्हणूनच हा प्रश्न जीव-ज्ञानाच्या कक्षेबाहेरचा आहे. शरीर–प्राणांचा संयोग होतो तो सुद्धां अदृष्ट व्यापारानें सिद्ध होतो. पूर्वजन्मीं जीवानें जीं कांय बरीं वाईट कर्में केलीं असतील, त्यांच्या फलांचा उपभोग जीवांस घ्यावा लागतोच. पण त्या त्या कर्मांचे संस्कार मनावर दृढ झालेले असल्यामुळें त्या संस्कारांच्या बळानें अथवा वासनावशात्, अज्ञानी जीवाला शरीराचा संयोग होतो. वास्तविक पाहतां अमूर्त प्राणवस्तूचा संयोग मूर्त शरीराशीं होणें केवळ अशक्य आहे. तथापि हा जो संयोग झालेला दिसतो, तो वास्तविक नसून दृढ मायिक आहे. मागें आपण पाहिलेंच आहे कीं प्राणाच्या आंदोलनानुसार स्त्रीची अथवा शरीराची उत्पत्ति होते. हें शरीर म्हणजे प्राणाची एक नियमित अवस्था आहे. तेव्हां जास्त आंदोलनें असणारी प्राणवस्तु कमी आंदोलनांनीं घटित झालेल्या शरीराशीं कशी संयुक्त होते, हें समजणें अत्यंत कठिण आहे, नव्हे अशक्य आहे. याप्रमाणें प्राणाची उत्पत्ति व त्याचा शरीराशीं संयोग हीं कशीं होतात; याला श्रुतीचें उत्तर इतकेंच आहे कीं, उत्पत्ति होणें व संयोग होणें हा मायेचा विलास आहे. सर्वच प्राणाचीं आंदोलनें असतात, सर्व प्राणरूप आहे, म्हणून प्राणशरीरसंयोग नसून दिसणारा संयोग केवळ मायानिर्मित आहे. या विलासाचा उलगडा परिच्छिन्न बुद्धीच्या जीवांस केव्हांही करितां यावयाचा नाहीं. शरीराशीं संयुक्त झाल्या-वर शरीरांत जेथें जेथें प्राणाची वसति असते, त्या त्या स्थानानुसार त्यास प्राण, अपान, समान, व्यान आणि उदान हीं नांवें प्राप्त होतात. वस्तुतः पाहिलें

असतां शरीरांतील सर्व प्राण एकरूप आहेत, इतकेंच नव्हे तर सर्व विश्वांत संचार करणारी जी प्राणवस्तु आहे तिचें स्वरूप व शरीरस्थ प्राणाचें स्वरूप एकच आहे; असें उपनिषदांचें सांगणें आहे. ह्या म्हणण्याचा अनुवाद स्पेन्सर व हक्स्ले इत्यादि पाश्चात्य शास्त्रतत्त्वज्ञांनीं केला आहे. सूर्य हा प्राणवायूवर, पृथ्वी अपानवायूवर, आकाश समानवायूवर, वायु व्यानवायूवर आणि सामान्य तेज उदानवायूवर अनुग्रह करितात अथवा हीं यांचीं आधिदैविक व आधिभौतिक स्वरूपें आहेत. तसेंच निरनिराळ्या इंद्रियांमध्यें जी प्राणशक्ति प्रकाशित होते, तें प्राणाचें आध्यात्मिक स्वरूप आहे. याप्रमाणें या उपनिषदानें पहिल्या तीन प्रश्नांत प्रजांची उत्पत्ति, प्राणाचें श्रेष्ठत्व आणि प्राणाच्या उत्पत्ति स्थित्यादि अवस्था या विषयांचा विचार करून जो पुरुष प्राणाचें स्वरूप समजून घेतो, तो इह लोकीं व परलोकीं अमर होतो, असें सांगितलें. त्याचा वंशच्छेद होत नाहीं, म्हणून इह लोकीं प्रत्येक प्राणोपासक अमर होतो आणि प्राणोपासकाला प्राणात्मकत्व प्राप्त होतें म्हणून तो परलोकींही अमर होतो, असें सांगण्याचा अभिप्राय आहे. अर्थात् हें अमरत्व ह्या कल्पापुरतेंच आहे. हें चाणाक्ष वाचकांस सांगण्याचें कांहीं कारण नाहीं. त्यांनी इतकीच गोष्ट लक्षांत ठेवावयाची आहे कीं, प्राणाची एकनिष्ठ उपासना करणाऱ्या पुरुषांचें चित्त शुद्ध आणि निर्मल होतें व या प्राणोपासकांस प्राणाच्याही पलीकडे असणारें जें चैतन्यतत्त्व त्याचें ज्ञान समजून घेण्याचा अधिकार प्राप्त होतो. असल्या अधिकारासाठींच पहिल्या तीन प्रश्नांची योजना झाली आहे.

वरील तीन प्रश्नांत जागृतावस्थेचाही विचार झाला; पण स्वप्नस्थिति, गाढ निद्रा आणि या शरीरांत कधींही जागें न होण्याची महानिद्रा ( मृत्यु ) यांत कोण जागृत असतो, याचा विचार केल्याशिवाय तत्त्वज्ञानाचें काम संपत नाहीं. अशाच अर्थाचा चौथा प्रश्न आहे. सर्व इंद्रियें झोंपी गेलीं असतां जागें कोण राहातें, या प्रश्नाला समर्पक उत्तर अलीकडील शास्त्रज्ञांनीं दिलें आहे, असें मला वाटत नाहीं. झोंपी जाऊं लागण्याच्या वेळीं व झोंप संपतांना आपण सामान्यतः स्वप्नस्थितींत असतों. स्वप्नस्थिति म्हणजे काय ? स्वप्नें पडतात कशीं ? स्वप्नें पाहणारा कोण ? इत्यादि प्रश्न भारी अवघड आहेत. आपलीं सर्व इंद्रियें शांत झालीं, मनबुद्धि आपापलीं कर्में करीनाशीं झालीं, शरीराला थकवा आला म्हणजे प्रत्येक जीवाला झोंप येऊं लागते. जागृतस्थिति संपून गाढ निद्रा लागण्याचे अगोदर स्वप्नें पडतात असा नियम आहे. स्वप्नें पडण्याचा काल अत्यंत नियमित असतो. म्हणजे एक किंवा दोन मिनिटांच्या ( पळांच्या ) पलीकडे स्वप्नाची मजल जात नाहीं ! यावेळीं आपलें मन तर जागृत असतेंच; पण आपलें मनही त्यावेळीं जागृत असतें. जाग्रत काळीं मनानें इंद्रियद्वारा जे जे संस्कार जन्मादारभ्य ग्रहण केले असतील, त्यांपैकीं कित्येक संस्कार कांहीं अनिर्वचनीय कारणांनीं उद्बुद्ध होतात. हे वासना-

वेळानें उद्‌बुद्ध झालेले संस्कार प्रत्यक्ष झाले म्हणजे त्याला आपण स्वप्नें असें म्हणतों. हे संस्कार ज्या कारणांनीं उत्पन्न झाले तीं कारणें ( आपले अनुभव आणि आपल्या वासना ) जशीच्या तशींच आपल्यास दिसतात असें नाहीं. तर त्या कारणांतील वस्तूंचा संकर होऊन कांहीं एक चमत्कारिक प्रकार स्वप्नकालीं आपल्या दृष्टीस पडतो. यावेळीं प्राणापानादिकांचे व्यवहार जागृत कालाप्रमाणेंच चाललेले असतात. म्हणजे सर्व इंद्रियें विश्रांतीचा उपभोग घेत असतांना पंच-प्राण कायेत जागृत असतात. तसेंच आपलें अंतःकरणही जागृत असतें आणि तेंच स्वप्नें पाहत असतें.

पण हें मनही झोंपी गेलें, मनालाही विश्रांति हवी असली म्हणजे तें स्तब्ध होतें. आणि त्यावेळीं आपला ज्ञानरूपी जो आत्मा म्हणजे जीवात्मा तो स्वरूप-मय होतो. म्हणून त्याला उत्तम प्रकारचें सुख होतें. जीवाच्या शरीर, इंद्रिय, प्राण, मन, बुद्धि आदि सर्व उपाधि स्तब्ध झाल्या असतां आत्म्याचें शुद्ध स्वरूप अज्ञानी जीवास भोगावयाला मिळतें, म्हणून त्याला अत्यंत सुख होतें. उत्तम निद्रा लागली असतां उत्तम सुख प्राप्त होतें, हें प्रत्येकास स्वानुभवानें समजलेलेंच आहे. सारांश, सुख होतें हें सर्वसंमत आहे. या सुखाचा भोक्ता कोण ? याला श्रुति हें उत्तर देते कीं, उपाधिरहित असणारा जीव या सुखाचा उपभोक्ता असतो. यावर कोणी असें म्हणेल कीं, निद्रास्थिति असणें हेंच जर सर्व सुखाचें आगर आहे, तर उत्तम निद्रा येण्याचीं साधनें उपलब्ध करून घेतलीं म्हणजे जीवाला अत्यंत सुख होईल व त्याचा पुरुषार्थ साध्य होऊन तो कृतकृत्य होईल ! यावर श्रुतीला असें सांगावयाचें आहे कीं, निद्रेंतील शुद्ध सुखाचा अनुभव घेणारा जीव उपाधिविरहित झाला तरी त्याचें अनादि अज्ञान जिवंत असतें म्हणून निद्रेंतील सुख हा पुरुषार्थ नव्हे. पुरुषार्थसिद्धीला असें स्थान हवें आहे कीं, जेथें कधीं निद्रा नाहीं किंवा जागृति नाहीं, विषय-सुख-दुःखांचा जेथें अभाव आहे; जें स्थान शुद्ध ज्ञानरूप आहे आणि जें केवल अस्तिस्वरूप मात्र आहे; असें स्थान मिळाल्याखेरीज जीव केव्हांही शुद्ध सुख-रूप व्हावयाचा नाहीं. हें स्थान म्हणजे परमात्मस्थान होय. जीवानें मायाज-नित अज्ञान उपाधीसह नाहींसें झालें म्हणजे तो आपल्या मूळस्वरूपावर जाऊन स्थिर होतो आणि त्याला जर परमात्मस्थितींत अंतर्बाह्य वस्तूंचें ज्ञान होणें शक्य असेल तर त्याला असें समजून येईल कीं, आपण मूळपासून जसे होतों तसेंच आहों, येथें यत्किंचितही आपल्या स्वरूपांत फरक झाला नाहीं, जें काय झालेंसें दिसलें तो केवळ मायेचा प्राविकृत चमत्कार होता. असो; ही परमात्मस्थिति हें सर्व दृश्यवस्तूंचें मूलस्थान आणि अंतिम गति आहे. या स्थितीचें ज्ञान जीवास झालें म्हणजे तो मुक्त होतो. श्रुतीनें अज्ञानी जीवाला ( Soul ) विज्ञानात्मा असें म्हटलें आहे व तोच कर्ता भोक्ता आहे असें आपण व्यवहारांत समजत असतों.

स्वप्नस्थितींत व निद्रास्थितींत आपलें शरीर, आपलीं कर्मेंद्रियें व आपलीं ज्ञानेंद्रियें निद्रास्थितींत असतात; पण यावेळीं प्राण आणि मन हीं जागृत असतात आणि मन हें स्वप्न पाहात असतें, असें ठरलें. येथें मन म्हणजे वासना आणि वासना म्हणजे आपला लिंगदेह होय. या स्थितींतही आत्मा विद्यमान आहेच. पण तो जागृत आहे किंवा झोपीं गेला आहे असें म्हणणें बालिशच होईल. म्हणून या आत्म्याच्या अधिष्ठानावर आपलें वासनात्मक मन प्राणासह जागृत असतें, असें म्हणावयाचें. प्राणाला विषयग्रहणाचें सामर्थ्य नाहीं, ज्ञानरूप आत्मा केव्हांच विषयग्रहण करीत नाहीं, म्हणून तिहीपैकीं मन हेंच स्वप्नाचें पाहणारें आहे असें ठरलें. गाढनिद्रा आगली म्हणजे अंतःकरणव्यापारही स्तब्ध होतात आणि यावेळीं जीवाला आपल्या शुद्ध सुखमय आत्मस्वरूपाचा अनुभव येतो. निद्रेच्या पलीकडे जी तुर्यावस्था आहे, ती स्वरूपज्ञान झालेल्या जीवाला मात्र (ब्रह्मज्ञजीवाला, ब्रह्मरूप जीवाला) अनुभवावयास सांपडते.

याप्रमाणें या प्रश्नांत स्वप्नस्थिति, निद्रा आणि तुर्यावस्था यांचें वर्णन झालें आणि शरीरापासून प्राणापर्यंत व अज्ञानी जीवापर्यंतच्या सर्व वस्तु परमात्मस्वरूपामध्यें प्रतिष्ठित होतात असें ठरलें.

पांचव्या प्रश्नांत ॐकाराचा विचार केला आहे. कठोपनिषदामध्येंही ॐकाराचा उच्चार झाला आहे. पण या प्रश्नाचा कहापोह पुढील एका उपनिषदांत सामस्त्यानें व्हावयाचा म्हणून येथें ह्या विषयावर मी कांहीं एक लिहीत नाहीं. केवळ इतकेंच सांगून ठेवतों कीं, ॐकारोपासना वैदिक मार्गानें विधिपूर्वक व यथासांग केली तर प्रथमतः सगुण ब्रह्माची प्राप्ति करून देऊन अंतीं ही उपासना परब्रह्मप्राप्तीचें साधन होतें.

सहाव्या प्रश्नांत ज्याला सोळा कलांचा पुरुष म्हणतात तो कोठें असतो असें विचारलें आहे. या प्रश्नाला श्रुतीनें जें उत्तर दिलें आहे तें सर्व वैदिक मार्गानुवर्ती तत्त्वज्ञान्यांनीं आणि सर्व जिज्ञासूंनीं मनन करण्यासारखें आहे. ह्या आपल्या जीवशरीरांतच त्या पुरुषाचें वास्तव्य असतें. त्याच्यापासूनच सोळा कला निर्माण झाल्या असें दिसतें. त्या सर्व कला पुनरपि ह्या पुरुषामध्यें अंतर्भूत होऊन तो पुरुष निष्कल होतो. असें येथें स्पष्ट सांगितलें आहे. हेंच केवलाद्वैती तत्त्वज्ञाचें म्हणणें आहे. सूर्यकिरणांच्या योगानें मृगजल उत्पन्न झालेंसें आपल्यास दिसतें व तें मृगजल सूर्यामध्येंच समर्पित होतें. मृगजलजन्य असें सूर्याचें शुद्ध व खोटेंल नगरीत बिंब आपल्या दृष्टीस पडतें. या सर्व कारभारांत सूर्याच्या स्वरूपाला यत्किंचितही धक्का लागलेला नसतो. याप्रमाणें शुद्ध आत्मस्थितीवर षोडशकलात्मक मायारूप आलेलें आपल्यास दिसतें व आपणही म्हणूं लागतों कीं हें सर्व विश्वच आत्म्यानेंच उत्पन्न केलेलें आहे. पण जसजसें आपल्यास विज्ञान व स्वरूपज्ञान होत जातें, विवेक आणि वैराग्य यांची वृद्धि होत जाते, तसतसें आपलें अज्ञान नाहींसें होतें आणि गुरुकृपेनें पूर्वीचा यथार्थ

अर्थबोध होऊन आपण मननिदिध्यासानें त्या अर्थाला विज्ञानाचें अथवा स्वानुभवानें स्वरूप दिलें, आपले ज्ञानचक्षु निरंजन झाले म्हणजे हा सर्व मायाप्रपंच नष्ट होऊन एक आत्मबिंब मात्र सत्य आहे, आपणही आत्मरूप आहों ही आपल्या चर्मचक्षूंस दिसणारी सृष्टिही आत्मरूप आहे, असें ज्ञान होतें आणि आपण आत्मरूप होतो. येथें दिलेला नदी-समुद्रांचा दृष्टांत* किंवा अरा-नाभींचा दृष्टांत हे दोन्ही ही अत्यंत समर्पक आहेत. सारांश, येथें श्रुतीला अद्वितीय ब्रह्माचा व ब्रह्मात्मैक्याचा उपदेश स्पष्टपणें करावयाचा आहे असें मला वाटतें.

या प्रश्नांत सोळा कळांचा उल्लेख आला आहे. त्यांत प्राण आणि मन या दोन कळांचा प्राधान्यानें निर्देश झाला आहे. सहाव्या प्रश्नांतील तिसऱ्या मंत्रांत असें म्हटलें आहे कीं, परमेश्वरानें प्राणाची उत्पत्ति केली, त्याबरोबरच अन्नाचीही उत्पत्ति केली. बालक उत्पन्न झाल्याबरोबर मातृस्तनांतील दुग्धाची उत्पत्ति तोच करितो हें सर्वविश्रुत आहे. असो; प्राणापासून श्रद्धा, पंच: महाभूतें, ज्ञानेंद्रियें कर्मेंद्रियें आणि अंतःकरणचतुष्टय उत्पन्न झालें, अन्नापासून बल, तप, मंत्र इत्यादि उत्पन्न झाली. नामरूपाचीही उत्पत्ति अन्नापासूनच आहे. असो; मला येथें विशेष आग्रहानें असें सांगावयाचें आहे कीं, श्रुतीच्या म्हणण्याप्रमाणें प्रथमतः प्राणापासून श्रद्धा उत्पन्न झाली व पृथ्वीची उत्पत्ति झाल्यावर मग इंद्रियें आणि मन यांची उत्पत्ति झाली. हें सर्व वाचकांनीं ध्यानांत ठेवावें. निदान श्रुतीनें श्रद्धेला अग्रस्थान दिलें आहे हें तरी विसरूं नये. विशेष आग्रहानें मी असें म्हणण्याचें धाडस करितों कीं या उपनिषदांत तरी पृथ्वीमागून इंद्रियांची व मनाची उत्पत्ति झाली, असें आकाश, वायु, तेज, जल, पृथ्वी इंद्रियें आणि मन या श्रुतिस्थित क्रमावरून दिसत आहे. आकाशामागून वायु झाला, वायूनंतर तेज उत्पन्न झालें, इत्यादि उत्पत्तीची प्रक्रिया सर्व वैदिक वाङ्मयांत संमत आहे. येथें पूर्वापरत्वाचा संबंध दिसत आहे. म्हणून मला असें वाटतें कीं पृथ्वीनंतरच इंद्रियांची व मनाची उत्पत्ति सांगावी, असा श्रुतीचा अभिप्राय आहे. म्हणजे पृथ्वीप्रमाणेंच इंद्रियें व मन हीं जड आहेत आणि अलीकडील कांहीं मानसिक शास्त्रयांच्या सिद्धांताप्रमाणें तीं मूर्त आहेत, असें सांगण्याचा श्रुतीचा अभिप्राय आहे. प्राणानंतर श्रद्धा सांगितली आहे व ती आकाशाच्या पूर्वी सांगितली आहे. यावरून श्रद्धाही प्राणाप्रमाणें व आकाशाप्रमाणें सर्वव्यापी असून अमूर्त आहे, असें श्रुतीस म्हणावयाचें आहे. आतां विषयाचा अनुभव जसजसा जास्त येत जाईल त्या त्याप्रमाणें इंद्रियें, मन, बुद्धि इत्यादि जास्त उन्नत होतात. पण तसा प्रकार श्रद्धेचा नाहीं. ती प्रथमपासूनच उन्नतावस्थेमध्यें असते आणि तिचा योग्य विषय तिला मिळाला म्हणजे ती स्वकार्य करण्यास समर्थ होते. इतकेंच नव्हे, तर स्वतःस योग्य असणाऱ्या विषयाची प्राप्ति करून घ्यावी, अशी प्रेरणा

करण्याचेंही स्वयंभू सामर्थ्य श्रद्धेच्या अंगीं आहे. श्रद्धा म्हणजे पुरुषार्थावर दृढ विश्वास आणि तो साध्य करून घेण्याविषयींची दृढ वासना होय. सारांश, प्राणी जन्माला आला म्हणजे आपलें कल्याण होईल, असा त्याला दृढ विश्वास असतो. आणि तें कल्याण सिद्ध करण्याच्या कामीं त्याचे प्रयत्न सदैव सुरू असतात. विषयांच्या ज्ञानाज्ञानानुसार श्रद्धेची दिशाभूल होते हें खरें आहे; तथापि आत्मकल्याणाची इच्छा प्रत्येक प्राण्यास असते. हेंही निर्विवाद आहे. यावरून "जीव हा निरंतर दुःखी असावयाचा" असा जो उपनिषद्–विदेवर आरोप आला आहे तो या उपनिषदाप्रमाणें तरी अवास्तव आहे. हें उपनिषद तरी निदान दुःखवादी ( Pessimostic ) नसून तें कल्याणवादी ( Optimistic ) आहे, असें म्हणतां येतें. 'संसार दुःखमय आहे.' हें उपनिषदाचें म्हणणें आहे व तें खरें आहे असें मला वाटतें. जोंपर्यंत आपण या संसाराकडे स्वतःच्या अथवा शारीरिक व मानसिक सुखभोगांच्या दृष्टीनें पाहतों, संसारामध्यें आपल्या स्वतःस मात्र विषयसुख व्हावें अशी वासना जोंपर्यंत प्रबळ असते, तोंपर्यंत संसार कितीही संपन्नतेचा असला तरी तो दुःखमयच होणार. पण आपल्यास इष्ट पुरुषार्थ साधावयाचा आहे ही वृत्ति जर अखंड ठेविली, व विषयभोग हें आपलें इष्ट नव्हे, असें वर्तन राखिलें म्हणजे नीतियुक्त कर्म, उन्नतिकारी उपासना आणि प्रगतिमूलक ज्ञान उत्पन्न होऊं लागतें. श्रद्धेला तिचा विषय मिळतो आणि हाच संसार सुखमय आहे असा ज्ञानी मुमुक्षूचा निश्चय होतो. भोगदृष्टीनें संसार दुःखमय आहे, पण आत्मज्ञानदृष्टीनें तो सुखमय आहे, असें येथें श्रद्धेचा ज्या क्रमानें उल्लेख झाला आहे, त्यावरून मला वाटतें.

दुसरी एक गोष्ट माझ्या समजुतीनें विशेष ध्यानांत ठेवण्यासारखी आहे ती ही–प्रजापतीनें अन्न उत्पन्न केलें आणि अन्नापासून वीर्य, तप, मंत्र, कर्म लोक आणि नामरूपें उत्पन्न झालीं असें सांगितलें आहे. वेदमंत्र कर्मप्रवर्तक आहेत व कर्म–निवर्तकही आहेत. कर्म या शब्दाचा अर्थ येथें अमळसा संकुचित करून वेदोक्त कर्म असा मात्र मी घेतला आहे. 'कर्म' याचा व्यापक अर्थ घेतला, तथापि माझ्या म्हणण्याला फारसा बाध येईल असें मला वाटत नाहीं. वेदानें विहित केलेलें किंवा निषिद्ध केलेलें किंवा वेद ज्याविषयीं उदासीन आहे असा तीन स्वरूपांत मात्र कर्म असणें शक्य आहे. तेव्हां लोकहितकारक अथवा लोकहितविघातक कर्म मंत्रापासूनच उत्पन्न होतें असें म्हणण्यास हरकत दिसत नाहीं. अस्तित्वांत असणाऱ्या वस्तूचें विधान वेदमंत्र करितात किंवा जीवानें कसें वागावें हें सांगतात. अर्थातच वेदमंत्रापासून कर्म उत्पन्न झालें, असें वैदिकदृष्टीनें तरी होतें. आपल्यास ज्या लोकीं वास्तव्य करावें लागतें, तो लोक कर्मानें उत्पन्न होतो, यासंबंधानें प्राचीन व अर्वाचीन, पौरस्त्य व पाश्चात्य पंडितांत एकमत आहे. मंत्रानें कर्म होतें, कर्मानें

वसतिस्थानाचें भुवन ठरतें, अन्नापासून वीर्य उत्पन्न होतें, हें अनुभवसिद्ध आहे. यावरून वीर्यापासून तप, तपापासून मंत्र, मंत्रापासून कर्म, कर्मापासून, वसतिस्थान आणि स्थानापासून नामरूपें उत्पन्न होतात. असें वर जो थोडासा क्रम स्पष्ट केला, त्यावरून सिद्ध होतें.

प्रजापतीनें प्राण व अन्न (Force) And (Matter) या वस्तु उत्पन्न केल्या आणि प्राणापासून श्रद्धा, श्रद्धेपासून आकाश अशीं आकाशादि पंचमहाभूतें, कर्मेन्द्रियें, ज्ञानेंद्रियें आणि मन या वस्तु परंपरेनें उत्पन्न झाल्या. प्राणादि सर्व वस्तु अमूर्त आहेत, पंचमहाभूतें येथें स्थूलरूपांनीं घेण्याचीं नसून त्यांच्या तन्मात्रा मात्र घ्यावयाच्या आहेत. या तन्मात्रांचें ज्या वेळीं पंचीकरण होतें त्या वेळीं त्यांस स्थूलरूप येऊन तींच आकाश, वायुआदि स्थूल पंचमहाभूतें होतात. असो; केव्हां सर्वदा आंदोलनस्थितींत राहणारा जो प्राण—याला च हल्लीं इलेक्ट्रॉन म्हणतातसें वाटतें—याचीं आंदोलनें जसजशीं कमी होत जातात, त्या त्या मानानें शब्दादि अष्टक निर्माण होतें आणि ज्या ज्या मानानें अन्न घनदाट होत जातें, त्या त्या मानानें वीर्यादिषट्क उत्पन्न होतें. प्राणसृष्टि अमूर्त आहे आणि अन्नसृष्टि मूर्त आहे; तथापि प्राण व अन्न यांचें अव्यभिचारी (कधींही व्यभिचार न करणारें) मिथुन झालें असल्यामुळें दोन्ही सृष्टींचा मिलाफ होऊन हें विश्व उत्पन्न होतें. आपणांस दिसणाऱ्या या विश्वोत्पत्तीची अशी कहाणी आहे. हें सर्व विश्व प्राण आणि अन्न या मिथुनापासून उत्पन्न झालें आहे. पण प्राण हा आत्म्याची छाया आहे. सूर्यापासून छाया उत्पन्न होते म्हणून छायारूपी प्राण ही सद्वस्तु नाहीं. सूर्यप्रकाश नसेल तर छाया दृश्य होणार नाहीं म्हणजे छाया उत्पन्न होणारी व नष्ट होणारी आहे, सारांश कांहीं कालपर्यंत टिकणारी वस्तु आहे. अन्न ही वस्तु विकारी आणि विकार्य आहे हें सिद्ध करावयाचें कारणच नाहीं. तेव्हां प्राण आणि अन्न या वस्तु व्यवहारकालीं जरी खऱ्या असतातसें व त्यांचा सांठा केव्हांही कमी जास्त होत नाहीं असें जरी प्राचीन व अर्वाचीन शास्त्रें सांगतात, तरी त्या वस्तु परमार्थदृष्टीनें खऱ्या नाहींत, सद्वस्तु नाहींत, असें या उपनिषदांतील 'छाया' या पदानें स्पष्ट होतें. सारांश पारमार्थिक दृष्टीनें ही सर्व सृष्टि व तिचीं उपादान कारणें (प्राण व अन्न) हीं असत् आहेत, एक आत्मा-मात्र सत्य आहे; असा या उपनिषदाचा अभिप्राय दिसतो. व्यवहारकालीं ही सृष्टि व तिचीं कारणें सत्य आहेत. हें सर्व पक्षांस म्हणजे केवल अद्वैतमतप्रति-स्थापक श्रीमच्छंकराचार्यांपासून तों शुद्ध द्वैतमतप्रणायक श्रीमध्वाचार्यांपर्यंतच्या सर्व आचार्यांस संमत आहे. परमार्थदृष्टि व्यवहारदृष्टीहून निराळी आहे कीं नाहीं, हा प्रश्न वेगळा आहे. पण परमार्थ वस्तु एकच आहे. असें ज्या आचार्यांस वाटतें ते मात्र म्हणतात कीं परमार्थांत सृष्टीचा किंवा तिच्या कारणांचा विचार करण्याचें कारण नसतें. कांकीं ह्या वस्तु परमार्थांत नसतातच. परमार्थवस्तु (Absolute) ज्यांस मान्य नाहीं ते लोक मायावादाचा अंगीकार करीत नाहींत

हें नीट आहे; पण जेथें प्राणाला छाया असें म्हटलें व पुरुषाला निष्कळ आणि अमृत अशीं विशेषणें उपयोजिलीं आहेत, त्या मंत्रांची ठीकशी व्यवस्था अनाद्वैत-वाद्यांस लावितां येईल असें मला वाटत नाहीं. असो; व्यवहारांत अवश्य असणाऱ्या विहित कर्मांचा व एक-निष्ठ उपासनेचा ज्याप्रमाणें अनाद्वैतवादी गौरव* करितात, तसाच गौरव श्रीमच्छंकराचार्यही करितात. येथें म्हणावें व्यवहारांत कोणत्याही मंत्राचा आपण स्वीकार केला तरी त्यापासून नीतीची, वैदिक कर्मांची व उपासनेची कोणत्याही प्रकारें हानि होत नाहीं. असो; तेव्हां कर्मांला' किंवा उपासनेला क्षणमात्रसुद्धां लघुत्व न आणण्याविषयीं दक्ष असणारें व ज्ञानाला पूर्णत्व देऊन सर्व शास्त्रांस, सर्व विद्यांस व सर्व कलांस एकवट करून त्यांचा संघटित संग्रह करणारें केवलाद्वैत, विचारी पुरुषांस कां मान्य होऊं नये, हें मला समजत नाहीं. जीव मुक्त झाल्यावर तो निष्कळ व अमृत होतो, असें जर म्हणावयाचें, तर परमात्मस्वरूपापासून जीवात्मस्वरूपास वेगळें कसें काढावयाचें! शिवाय पांचव्या प्रश्नांतील नवव्या मंत्रांत उल्लेखिलेला विज्ञानात्मा जर शेवटीं परमात्मस्वरूपातच प्रतिष्ठापित होतो, तर तो स्वरूपतः परमात्मा आहे असें आपल्यास म्हणावयास नको काय! आपली समुद्राकडे वाहात जाणाऱ्या नद्या समुद्रांत प्रवेश करून तदनुरूप झाल्यावर जर त्यांची नामरूपें नाहींशीं होतात, आणि समुद्राचें पाणी कोणतें व नद्यांचें पाणी कोणतें, हें जर आपल्यास संगत झालेलें जल घेऊन सांगतां येत नाहीं, जर सहाव्या मंत्रांत सांगितलेल्या पुरुषगामी कला पुरुषांत जाऊन मिळाल्यावर एकत्र होतात, एकवट होतात व त्यांचें नामरूप मावळून जातें, तर आपल्यास असें म्हणावयास नको काय! कीं या कलांचें मूळ स्वरूप, अंतिम स्वरूप आणि म्हणून मध्य कालीन स्वरूप पुरुषात्मकच असतें आणि आपल्यास जो भेद दिसतो तो पारमार्थिक नसून केवळ मायिक आहे.

तात्पर्य, या उपनिषदांत केवल-अद्वैत-सिद्धांताचें मात्र प्रणयन करून हेच सिद्धांत व्यावहारिक गोष्टींचा व्यवस्थित उलगडा करितात, असा अत्यभिप्राय आहे असें मला वाटतें.

---

# चार उपनिषदांचा सामान्य विचार व उपसंहार.

---

( १ ) येथपर्यंत चार उपनिषदांचा मनोरंजक कारभार आटपला. त्यांत ईश, केन आणि कठ या उपनिषदांच्या मूळासह, चार भाष्यांचें अवतरण मीं केलें आहे. नवीन व्यवस्थेनुसार प्रश्नोपनिषदावर श्रीमच्छंकराचार्यांचें जें भाष्य आहे, तें मात्र दिलें आहे. पण माझी पूर्वपद्धति अजाचाल सुटू नये म्हणून विशिष्टाद्वैताचें व द्वैताचें विशिष्ट म्हणणें काय आहे, त्याचें तात्पर्य मीं आपल्या शब्दांत देऊन सर्व वाचकांची सोय केली आहे. असो; पहिल्या तीन उपनिषदांच्या भाष्यसरणीवरून कोणत्या भाष्यकाराचें म्हणणें श्रुतीची प्रणालिका धरून असतें, याचा आपल्यास बराच अदमास करितां येण्यासारखा आहे. वेद अथवा वेदांत या पवित्र ग्रंथांतील मंत्रांचा अर्थ करावयाचा तो उपक्रम, उपसंहार, अभ्यास, अपूर्वता, फल, लिंग, उपपत्ति— इत्यादिकांच्या बलाबलाच्या साहाय्यानें करावयाचा असतो, हें तत्त्व ध्यानांत ठेवून पुढील विवेचन करण्याचें मीं योजिलें आहे.

( २ ) या चारी उपनिषदांच्या उपक्रमादि चिन्हांवरून कोणता अर्थ निर्माण होतो हें ठरविणें, युक्ति, आधुनिक शास्त्रें व अनुभव यांचें साहाय्य कोणत्या पक्षास मिळतें हें पाहणें, आणि या चार उपनिषदांच्या सरणीवरून श्रुतीला कोणते सिद्धांत अभिमत होते, हें ठरविणें या तीन गोष्टींच्या साहाय्यानें मला काय म्हणावयाचें आहे तें म्हणतों.

( ३ ) या महाभारती व प्रचंड उद्योगाला हात घालतांना प्रथमतः श्रीमच्छंकराचार्य, श्रीमद्रामानुजाचार्य, श्रीमन्मध्वाचार्य, श्रीमद्वल्लभाचार्य आणि श्रीमद्भुपानंद स्वामी या पाचही भाष्यकर्त्यांस कोणकोणते सिद्धांत अभिमत होते, त्याचें दिग्दर्शन वाचकांच्या व माझ्या सोईसाठीं मीं केलें होतें, तें वाचकांच्या स्मरणांत असेलच. प्रस्तुत प्रसंगीं ही गोष्ट नमूद करून ठेवणें मला इष्ट वाटतें की, या पांचही आचार्यांस वेद प्रमाण आहेत, वेदांचें प्रामाण्य सर्वांस सारख्या रीतीनें कबूल आहे, इतकेंच नव्हे पण पांचही जण असें म्हणतात की, वेदप्रमाणाविरुद्ध प्रत्यक्ष अनुमान उपमान, ऐतिह्य, अर्थापत्ति इत्यादिपैकीं कोणतेंही एक प्रमाण किंवा हीं सर्व प्रमाणें प्रबल असलीं तरी वेद-प्रमाणाचें बल अप्रतिहत असल्यामुळें अर्थनिर्णयाच्या व तात्पर्य-निर्णयाच्या उपयोगी एक वैदिक प्रमाण मात्र पडेल. सारांश, सर्वांस वेदप्रामाण्य संमत आहे. तसेंच वेदांमध्यें, उपनिषदांमध्यें किंवा गीतेसारख्या स्मृतींमध्यें चित्त-शोधन करणाऱ्या नीतीचीं जी तत्त्वें आढळतात तींही सर्वांस मान्य आहेत. व्यवहारांत आचरण कसें करावयाचें, हें सांगणारें वैदिक अथवा लौकिक नीतिशास्त्र व त्याचे नियम सर्व-संमत आहेत. परमार्थाच्या राज्यांत कितीही तीव्र विरोध असो; वैयक्तिक किंवा सामाजिक नीति-बंधनासंबंधानें सर्वत्र सुसंवादता [ ऐकमत्य ] आहे. आणखी ज्या वेळीं तीव्र

वैराग्य प्राप्त होईल, त्यावेळीं कर्म-मार्गाचा वेग मंदतर होतो, असें ही कर्मी अधिक प्रमाणानें हे आचार्य म्हणत असतात. याप्रमाणें वेदप्रामाण्याविषयी व व्यावहारिक नीतीविषयीं मी वर उल्लेखिलेल्या कोणत्याही दोन आचार्यांत मतविरोध नाही. परमेश्वराच्या उपासनेसंबधानें हा सर्वजण आपापला अभिप्राय अनुकूल असाच देतात, म्हणजे परमेश्वराची उपासना ही चित्ताची निर्मळता संपादन करणारी आहे किंवा अप्रत्यक्षतः मोक्ष देणारी आहे, म्हणून ती अवश्य केली पाहिजे, चित्त निर्मल करण्याला उपासनेइतकें समर्थ दुसरें साधन नाही, असें शंकराचार्य म्हणतील तर इतर आचार्य *चित्त-निर्मलता स्थिर रहाण्यासाठीं मुक्त स्थितींतही परमेश्वराचें भजनपूजन जीवानें* सदैव केलें पाहिजे असें म्हणतील. वेदानें विहित केलेली नित्य नैमित्तिक कर्मे निष्काम असतील तर तीं ही चित्ताचें शोधन करितात असें केवलाद्वैती आचार्य म्हणतील, तर इतर आचार्य *चंचल चित्ताच्या निर्मलतेला अखंड स्थिरता असावी म्हणून* कर्ममार्गाचा उपदेश नित्य करतील. कर्म वैदिक असो वा लौकिक असो, तें सकामत्वानें करण्याची प्रेरणा झाली तर ता परमार्थाच्या कामीं सर्वथैव त्याज्य आणि गर्हणीय आहे, असें सर्व आचार्यांचें म्हणणें आहे. त्याचप्रमाणें व्यवहारकाली वैदिक कर्म आणि वैदिक उपासना यासंबधानेंही वरील आचार्यांच्या विचारसरणीत मतभेदाला फारसा अवकाश नाही, असा या वरील गोष्टींसंबधानें सर्वत्र सुसंवाद आहे. वरील गोष्टी प्रमुखतेनें सांगण्याचा उद्देश इतकाच आहे की, वाचणारे वाचकानें व जिज्ञासूनें केवलाद्वैतापासून तों शुद्ध द्वैतापर्यंतच्या कोणत्याही मताचा स्वीकार केला तरी त्याच्या कर्माला, नीतीला, परमेश्वरी उपासनेला किंवा वेदनिष्ठेला कोणत्याही प्रकारें धक्का पोहोचत नाहीं, आणखी एक गोष्ट सांगून हें सुसंवादाचें प्रकरण आटपतें घेतों. जीवास मुक्ति मिळाली म्हणजे तो अमर होतो, निर्भय होतो, सुखदुःखातीत होतो, जन्म-मरणाची यातायात त्याला करावी लागत नाही, त्याला निर्मल सुख प्राप्त होतें, असें सर्वही आचार्यांस कबूल आहे. तसेंच, योगाचा दृढ अभ्यास केला असता, तपाचरण दृढ निश्चयानें चालविलें असतां, ब्रह्मचर्याचें नैष्ठिक अनुष्ठान केलें असतां आणि सत्यव्रताची कांस दृढ धरिली असतां *मोक्षाचा मार्ग सुकर होतो,* असेंही सर्व आचार्यांचें म्हणणें आहे. श्रवण मनन आणि निदिध्यास ही मोक्ष मिळविण्याची साधनें आहेत, हेंही सर्व आचार्यांस संमत आहे. शेवटीं हा संसार ( सकाम दृष्टीनें उत्पन्न होणाऱ्या वासनेनें व अभिमानानें सिद्ध झालेला संसार ) सर्वदा दुःखमय आहे. ब्रह्मनिष्ठ झाली तरच या दुःखाचा शेवट होईल, असें ही सर्व आचार्य म्हणत असतात; आणि म्हणूनच सर्वांस मुक्ति प्राप्त होणें *ही अत्यंत इष्ट वस्तु आहे, असें प्रत्येक अधिकारी आचार्यांचें सांगणें आहे.*

( ४ ) आता हे व्यावहारिक नभ सोडून देऊन अति-व्यवहाराच्या ( व्यवहाराच्या पलीकडच्या, Metaphysics ) नभासंबधानें मात्र अत्यंत मत-वैभिन्न्य आहे. हे मी ईशोपनिषदाचे वैभिन्न्य दाखवून दिलें आहे. श्रुतीला काय सांगावयाचें आहे ? या

प्रश्नाला पाची आचार्यांकडून पाच निरनिराळी उत्तरें येतात, श्रीमच्छंकराचार्य म्हणतात की परमार्थ दृष्टीनें सर्वत्र केवलाद्वैत आहे, एक ब्रह्म मात्र सत्य वस्तु आहे, असें ज्ञानकांडात्मक उपनिषदांत सांगावयाचें आहे. तसेंच परमार्थतः जीव आणि ब्रह्म या दोन्ही वस्तु भिन्न नसून एकात्मक आहेत, हें दिसणारें विश्वही परमार्थतः ब्रह्म आहे; दिसणारें व भासणारें स्वरूप मायामय आहे, मिथ्या आहे, असें श्रुतीस सांगावयाचें आहे. हें *ब्रह्म केवळ ( निर्गुण, अद्वितीय आणि अगोचर असें ) आहे, साराश तें* नित्य, बुद्ध, शुद्ध आणि मुक्त अशा स्वरूपाचें आहे. हें ज्ञानरूप आणि आनंदरूप आहे, आपल्यास येथें जो भेद दिसतो, तो मायिक म्हणजे मिथ्या आहे, जीवांस होणारें उपाधिजन्य दुःख स्वरूपगत नाही, आणि ब्रह्माचें पूर्ण ज्ञानविज्ञान होऊन साक्षात्कार झाला म्हणजे सर्व औपाधिक व त्रिविध दुःखाचा निरास होतो व जीव सुखरूप, आनंदरूप, अमर म्हणजे ब्रह्म होतो, फार काय सांगावें ! तो सर्वदा ब्रह्मरूपच होतो, ब्रह्मरूप आहे आणि ब्रह्मरूप राहील सूर्यास आच्छादित करणारे कृष्णमेघ वितळून गेले असतां सूर्यबिंब जसें आपल्या स्वप्रकाशानें पूर्ण प्रकाशित झालेलें दिसतें, हें खरें, पण सूर्याला आवरण करणारे मेघ होते म्हणून मूळच्या सूर्यबिंबस्वरूपांत कोणताही विकार झाला नाही व होत नाही. याचप्रमाणें अज्ञानानें घातलेलें आवरण नाहींसें झालें ( नाहींसे झालें असें जीवांस समजलें ) म्हणजे आपण मुक्त झालों असें जीवास वाटतें; पण वस्तुतः तो कधींही अज्ञानानें बद्ध झाला नव्हता, तो सर्वदा मुक्तच असतो आगंतुक. आलेलें अज्ञान नाहींसें झालें म्हणजे अथवा तें अज्ञानही *ब्रह्मरूपच आहे* असें समजलें, म्हणजे जीवाला मी मुक्त झालों असें वाटतें. इतकेंच कायतें.

श्रीमद्रामानुजाचार्य एकच एक व अद्वितीय ब्रह्म आहे असें म्हणतात. पण त्याचें ब्रह्म सर्व मंगलगुणांनी सुशोभित झालेलें आहे. ब्रह्माचे मंगळगुण अनंत आहेत, व त्याची शक्ति अपार आहे, जीव आणि जगत्, चर आणि अचर हे दोन ब्रह्माचे प्रकार असून त्या उभयतांचेंही नियामकत्व ब्रह्माकडे असतें. येथें माया नाहीं. आपल्यास विश्वासंबंधी व आपल्या अंतरंगासंबंधी जें जें ज्ञान प्रमाणशुद्ध रीतीनें होतें, तें तें सर्व सत्यात्मक असतें. सकाम कर्म केलें असतां जीव अज्ञानवश होतो व जन्ममरणाच्या फेन्यांत सांपडतो हें खरें, तथापि जीवानें वेदाध्ययन करून नित्य नैमित्तिक कर्म निष्काम बुद्धीनें करण्याचा अखंड परिपाठ ठेविला, भगवान् नारायणाचें वेदांनें जें स्वरूप सांगितलें आहे तें समजून घेऊन त्याची अखंड उपासना केली म्हणजे दयाघन परमेश्वर प्रसन्न होतो आणि जीवाला जो सत्यबंध प्राप्त झाला होता त्यापासून त्याला मुक्त करितो. बंध सत्य आहे व मुक्तिही सत्य आहे, ब्रह्म हें ज्ञानरूप असून ज्ञानी असतें, तसाच जीवही ज्ञानरूप आणि ज्ञानी असतो. पण जीवाचें ज्ञान मर्यादित असतें. परमेश्वराचें ज्ञान अमर्याद असतें. जीव अणु आहे, परमेश्वर विभु आहे. जीव अणु आहे म्हणून त्याला निर्गुण ब्रह्माचें ज्ञान केव्हांही होणें शक्य नाहीं, निर्गुण

वस्तु असुर्प्रा शक्य नाही, आणि ज्या ज्या वेळी वेदमन्त्रांत निर्गुणत्वाचा उल्लेख होतो, त्यावेळी निर्गुणत्वाचा अर्थ, दोषाचा सर्वथा अभाव असा असतो परमेश्वर सगुण आहे इतकेंच नव्हे, पण त्याला आपल्याप्रमाणेंच शरीरही असतें मात्र जीवांचें शरीर भौतिक असतें आणि परमेश्वराचें शरीर दिव्य म्हणजे चिन्मय असतें जगत् हाही परमेश्वराचा प्रकार आहे, आणि विश्वप्रलयाच्या वेळी हें जगत आपल्या मूळ स्वरूपानें परमेश्वरी स्वरूपांत अचिद्रूप होऊन राहतें सृष्टीला आरंभ झाला म्हणजे जगताचा विकास होतो, आणि सृष्टि प्रकट होते.

श्रीमन्मध्वाचार्य हे शुद्ध द्वैतवादी आहेत जीव आणि ब्रह्म हे परस्परविरोधी असून उभयतांमध्ये सेव्यसेवकत्वाचा भाव अखंड व अभंग राहणार आहे, अणुपरिमाण जीवानें ब्रह्माची म्हणजे श्रीविष्णूची नित्य उपासना वैदिक मार्गानें केली पाहिजे विष्णूच्या स्वरूपाचें ज्ञान करून घेऊन त्याचें निरंतर ध्यान केलें पाहिजे, आपण व परमेश्वर अत्यंत भिन्न आहोंत, असें ज्ञान झाल्यानंतर त्याच्या अखंड उपासनेनें मात्र आपल्यास मुक्ति मिळेल, असा यांचा सिद्धांत आहे यांस मायेची कल्पना कोणत्याही बाजूनें संमत नाही श्रीविष्णूनें आपल्या चित्त-रंजनासाठीं जगताचा उत्पात केला आणि जीवास तेथें पाठवून त्याच्या दुःखविमोचनाची सोय केली, असे यांचे म्हणणें आहे परमेश्वर सगुण असून तो भक्तांचें संरक्षण करण्यासाठीं वेळोवेळां अवतार घेतो, व दुष्टांचा संहार करून भक्तांचें कल्याण करितो जीवानें सदैव भक्ति व कर्मे करावीं असें रामानुजाचार्यांप्रमाणे हे ही म्हणतात परमेश्वर शरीर-धारी आहे, पण त्याचें शरीर चिन्मय आहे असा यांचाही अभिप्राय आहे

श्रीमद्वल्लभाचार्यांचें उपनिषद्भाष्य मला उपलब्ध झालें नाही म्हणून त्यांच्या सिद्धांतासंबंधानें येथें उल्लेख करण्याचें कांहीं कारण नाही विषयव्यवस्थेसाठी जे सिद्धांत मला अवश्य वाटले त्यांचा अवतार या मासिक पुस्तकाच्या मुख्य प्रस्तावनेंत मी केला आहे.

श्रीमद्दयानंद स्वामी यांना कांही सिद्धांत रामानुजाचार्यांचे व कांही मध्वाचार्यांचे स्वीकारले आहेत केवलाद्वैती आचार्यांविरुद्ध त्यांचाही कटाक्ष आहे. मायावाद यांस संमत नाही तसेंच ईश्वर वेळोवेळी अवतार घेतो, हीही कल्पना यांस मान्य नाही अवतारकल्पना एका बाजूस ठेविली म्हणजे श्रीमद्रामानुज व श्रीमन्मध्वाचार्य यांच्या सिद्धांतांत व श्रीमद्दयानंद स्वामींच्या सिद्धांतांत फारसा विरोध नाहीं मात्र यांस जातिभेद व हिंसात्मक यज्ञ मान्य नाहींत, ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे

(५) याप्रमाणें या मासिक पुस्तकांत उद्धृत केलेल्या आचार्यांच्या मतांचें संक्षेपानें पुनः दिग्दर्शन केलें आतां यापुढें उपनिषदांतीलमंत्र ध्यानांत आणून त्यांच्या सरळ भाषासरणीनें कोणते सिद्धांत श्रुतीला मान्य होते, हें ठरविण्याचा मी प्रयत्न करणार आहे हा प्रयत्न माझा आहे म्हणून येथें दोषाला पुष्कळच अवकाश मिळाल्यामुळें माझ्याविरुद्ध

पुष्कळ आक्षेप येतील हें मी जाणून आहें, तथापि आपल्या झालेल्या समजुतीस साक्षी ठेवून तिच्या समक्ष मला जें काय म्हणावयाचें आहे तें मी आतां म्हणतों.

( ६ ) प्रथमतः उपक्रम कसा आहे तें पाहूं या. ईश, केन, कठ, या उपनिषदांत जेथें ब्रह्मविचारालाच प्रारंभ झाला आहे तेथें सामान्यतः ब्रह्म निर्गुण आहे, असाच उपक्रम आहे. ईशावास्यांतील पहिला मंत्र घ्या, केनांतील दुसरा मंत्र घ्या, कठोपनिषद्गत दुसऱ्या वल्लींतील बाराव्या व चौदाव्या मंत्रापासून प्रायशः वल्लीच्या शेवटपर्यंतचा उपक्रम पहा, प्रश्नोपनिषद्गत चौथ्या प्रश्नांतील नववा, दहावा, व अकरावा मंत्र पहा, सामान्यतः उपक्रम निर्गुण ब्रह्मपर झाला आहे, असें निराग्रही वाचकास आढळून येईल, असें मला वाटतें. सर्व चराचर विश्व आत्मस्वरूपानें व्यापून टाकावें, असा आज्ञापर ईशावास्यांतील पहिल्या मंत्राचा अर्थ करा, किंवा परमेश्वरास राहण्याला हें अनंतरूप गुणात्मक विश्व योग्य आहे असें म्हणा, सर्व चराचर पदार्थांच्या अंतर्यामी वास्तव्य करणाऱ्या परमात्म्याला आकार नसला पाहिजे, रूप नसलें पाहिजे, तात्पर्य, इंद्रियास गोचर होणारे कोणतेही गुण नसले पाहिजेत. तो सुंदर वस्तूंत राहणार त्याचप्रमाणें कुरूप अथवा गलिच्छ वस्तूंतही राहणार. तो परमात्मा साधूंस पुण्य कर्म करण्याची प्रवृत्ति करणार व पापी लोकांस पाप करण्याचें प्रोत्साहन देणार, असा सर्व गुणांस सामावून टाकणारा व सर्व ठिकाणीं सर्व तऱ्हेनें प्रकाशित होणारा पदार्थ निर्गुण आणि निर्धर्मक मात्र असला पाहिजे. याचप्रमाणें केनोपनिषदांतील डोळ्याचा डोळा, कानाचा कान असणाऱ्या परमात्म्याचें प्रधानें निर्णयपर विवेचन करितां येईल. कठोपनिषदांतील पहिल्या वल्लींत तर ऐतिहासिकच भाग आहे, तथापि त्याच वल्लींतील विसाव्या मंत्रांत मनुष्य मेला असतां तो जगतो कीं नाहीं असा प्रश्न नचिकेत्यानें उत्पन्न केला आहे आणि बाकीच्या सर्व वल्लींमध्यें बहुतेक यमधर्मानें नचिकेत्याच्या प्रश्नाला सर्व बाजूंनीं उत्तर दिलें आहे. मूळ विषयाला सुरुवातच दुसऱ्या वल्लींतील सातव्या मंत्रापासून म्हणा किंवा बाराव्या मंत्रापासून म्हणा झाली, असें न म्हणतां तरी सुरुवात आठव्या मंत्रापासून झाली आहे. येथें तो अनादिनंत, स्वयंभु, अविकारी, नित्य, अकर्ता, अभोक्ता आहे असें म्हणण्यास सुरवात झाली आहे व या म्हणण्याचें पर्यवसान शेवटीं निर्धर्मक ब्रह्माच्या वर्णनामध्यें झालें आहे. प्रश्नोपनिषदांतील पहिल्या तीन प्रश्नांत प्राणाचें वर्णन, त्याचें कार्य, त्याचें विभाजन, त्याचें श्रेष्ठत्व इत्यादिकांचें वर्णन करण्यांत समर्पित झालें आहे. चौथ्या प्रश्नाच्या शेवटीं शेवटीं ब्रह्मवादाला सुरवात झाली तेथें सर्व वस्तु परब्रह्मामध्यें आश्रय पावतात, या म्हणण्यानें ब्रह्माचें निर्गुणत्व सिद्ध होतें. उपसंहाराचीही दिशा पाहिल्यास मी म्हणतों असाच प्रत्यय येईल. ईशावास्यांतील पंधरावा मंत्र पहा. केनोपनिषदांतील दुसऱ्या खंडाचा विचार करा (येथें उपनिषदाचा विषय संपला आहे), कठांतील सहाव्या वल्लींतील बारावा व तेरावा मंत्र पहा, प्रश्नोपनिषद्गत शेवटच्या प्रश्नांतील पांचवा मंत्र पहा, सर्वत्र ब्रह्म हें

निर्गुण आणि निर्धर्मक आहे असें ठरण्यास अडचण पडणार नाहीं. याचप्रमाणें अभ्यासचेंही वर्णन देतां येईल. ब्रह्म निर्गुण आहे, निर्धर्मक आहे, अशा अर्थाचे अनेक मंत्र अनेक स्थळीं केनांत, कठात, व प्रश्नात दाखवून देतां येतील. विस्तारभयास्तव मी येथें त्यांचें समग्र अवतरण करीत नाहीं. या उपनिषदात सांगितलेल्या विषयाची अपूर्वता पाहिली, ज्ञानी पुरुषास साक्षात्कार झाल्यानंतर मिळणाऱ्या मोक्ष नामक फलाचा विचार केला म्हणजे कोणत्याही वाचकाचा असा निश्चय होईल की श्रुतीला निर्गुण ब्रह्मच प्रतिपादन करावयाचें आहे. 'श्रुत्या प्रतिपादनीयमेद्वैतम्' अशी एक लोकप्रसिद्ध असलेली आर्या मी म्हणतों यांचें मात्र समर्थन करीत आहे. आतां उपपत्तीच्या दृष्टीनें थोडासा विशेष विचार करून प्रस्तुत विषयाचा हा भाग मी आटपता घेतों.

( ७ ) सर्व वेद आपल्या अंगोपांगासह परमेश्वराचें किंवा परब्रह्माचें वर्णन करण्यात समर्पित झाले आहेत, सर्वास परब्रह्माचें वर्णन मुख्यतः करावयाचें आहे, सर्व वेदाचा व विशेषतः सर्वोपनिषदाचा परमेश्वराचें एकत्व स्थापन करावें असा उद्देश आहे, या विश्वामध्ये किती तत्त्वें आहेत, त्या तत्त्वांचा स्वामी कोण, विश्वाची उत्पत्ति कोणी केली, त्याचें परिपालन कोण करितो, संहार करणें कोणाचें कर्म आहे ? इत्यादि तात्त्विक प्रश्नाचा विचार निश्चित करण्यासाठी उपनिषदांची योजना आहे. तत्त्वाचा विचार करितां करितां कोणत्याही विचारी पुरुषाचा असा निश्चय होतो की, या विश्वाच्या मुळाशीं एकच तत्त्व असलें पाहिजे. आणि त्या मूळ तत्त्वापासून निर्मित होऊन म्हणा, परिणत होऊन म्हणा, किंवा विवर्त होऊन म्हणा हें विश्व उत्पन्न झाले आहे असें म्हणावें लागतें. श्रीमन्माध्व म्हणतात की, हें विश्व परमेश्वरानें निर्माण केलें म्हणजे निर्माणकर्ता व निर्माण केलेली वस्तु ही निरनिराळ्या असतात. त्यांच्या मतें आरंभीं दोन वस्तु आहेत. एक नित्य-सिद्ध परमेश्वर आणि दुसरी त्याची शक्ति. या शक्तीच्या उपादान कारणापासून परमेश्वरानें हें विश्व निर्माण केलं आणि हें निर्माण केलेलें विश्व पाहण्यास जीव प्रकट केले परमेश्वर एक खरा, पण त्यांचें विश्व पाहण्याला जीव हवा आणि ईश्वर-विलक्षण गुण असणारें पण ईश्वरसामर्थ्य प्रकट करणारें विश्वही हवें. याप्रमाणें माध्वांच्या तत्त्वज्ञानांत तीन मूलभूत गोष्टींचा विचार करावा लागतो. पण तीन गोष्टींचा विचार एकदम करता येणें ही जीव-सामर्थ्याच्या बाहेरची गोष्ट आहे. म्हणून भक्तीची मनोवृत्ति दृढ असणाऱ्या जीवास जरी हें माध्वमत संमत होतें, शास्त्राच्या व धर्माच्या प्रारंभीं जरी हें मत कल्याणावह असतें, तथापि तीन गोष्टींच्या परस्परसंबंधाचा विचार एककालीं परिच्छिन्न जीवास केव्हाही करता येत नाहीं, म्हणून शुद्ध तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें निर्माण वादाची किंवा आरंभवादाची महती फारशी नसते. भक्तीचा भाग अवश्य आहे. भक्ति असल्याशिवाय व भक्तीच्या साहाय्यानें वैदिककर्माचें अनुष्ठान केल्याशिवाय मोक्ष-तीर्थाला जातां येत नाहीं, हें पहाट झाल्याशिवाय सूर्य उगवत नाहीं असें म्हणण्याइतकें उघड आहे. तथापि आरंभवादांमध्यें भक्तीला तात्त्विक पूर्णता

येत नाहीं, कारण तेथ तीन वस्तूंचें निदान द्वैताचें तरी भान असतें. म्हणून तत्त्व-जिज्ञासु मोक्षपाथ आपलें मार्गक्रमण येथें न थांबवितां पुढें चालू ठेवितो.

निर्माणवादापेक्षां परिणामवाद, उत्क्रांतिवाद, आधुनिक शास्त्राला जास्त संमत आहे. उत्क्रांति-वादात कारण हेंच आपल्या कार्यात समर्पित होतें, असें म्हटलेलें असतें. अर्थात् येथें विश्व हें शून्यापासून निर्माण झालें, असें समजावें लागत नाही. परमेश्वरच परिणत होतां होतां या विश्वस्वरूपामध्यें समर्पित झाला, असें वैदिक परिणाम-वाद्यांचें म्हणजे श्रीमद्रामानुजाचार्य व श्रीमद्वल्लभाचार्य यांचें म्हणणें आहे. हें म्हणणें हलीच्या शास्त्राला अभिमत आहे. येथें असें समजावयाचें असतें की परमेश्वराच्या चिद्भागापासून जीवरूपी परिणाम झाला व अचिद्भागापासून जड विश्व परिणत झालें. दुधाचें जसें दहीं होतें, त्याप्रमाणें परमेश्वराच्या विशिष्ट भागापासून जीव-जगताची उत्पत्ति झाली, असें हे तत्वज्ञ म्हणतात. 'जीव-जगताच्या कार्यत्वानें परमेश्वराच्या स्वरूपात बदल झाला व तो जीव-जगत् स्वरूपानें दिसतो, असें रामानुज म्हणतात. व जीव-जगत जरी परमेश्वरी कारणाचे परिणाम आहेत, कार्ये आहेत, तथापि या कार्यांच्या घटनेनें परमेश्वरी स्वरूपांत यत्किंचितही विकार झाला नाही.' असें श्रीवल्लभ म्हणतात. रामानुजास विकृत परिणाम वादी म्हटलें तर वल्लभास अविकृत परिणामवादी म्हटलें पाहिजे उभयतांसही परमेश्वराचें एकत्व, त्याचें परम गतित्व, त्याची अखंड उपासना इत्यादि सर्व गोष्टी संमत आहेत. श्रीमाध्वांस उपासना प्रिय आहे. त्या प्रमाणेच श्रीमद्रामानुजास व श्रीमद्वल्लभास ही उपासना अत्यंत प्रिय आहे. तिघेही आचार्य शक्य तितकें पूर्ण ज्ञान झाल्यानंतरही भक्ति असावी असें म्हणत असतात. ज्ञानप्राप्तीसाठी उपासना करणें आणि ज्ञान प्राप्त होऊन स्वरूप प्राप्त होईपर्यंत ती उपासना जागृत ठेवावी असें म्हणणें ठीक आहे. निष्काम कर्म आणि दृढ उपासना यांनी चित्तातील अभिमान आणि वासना यांचा नाश केल्याशिवाय तें ज्ञान (आपलें स्वरूप) निर्मल व्हावयाचें नाहीं, आणि चित्तनैर्मल्याशिवाय भगवत्-स्वरूप प्राप्त होण्याची आशाच नको. एवंच कर्म व उपासना यांचें आवश्यकत्व निर्विवाद आहे. आतां पुरुष (ब्रह्म) हा जीव आणि जगत् (चिद् व अचिद्) वस्तूंचा नियामक आहे. परब्रह्म हा एक भाग, चिद् व अचिद् हा दुसरा भाग व दुसऱ्या भागाचा पहिला भाग हा आत्मा, असें जरी विभाजन केलें तथापि विचार-प्रक्रियेला त्याचा फारसा उपयोग होईल असें वाटत नाहीं. ज्ञाता आणि ज्ञेय, ईश आणि ईशित् हें द्वैत जोपर्यंत कायम आहे, सेव्यत्व आणि सेवकत्व असा स्पष्ट भेद जोपर्यंत जिवंत आहे, तोंपर्यंत ज्ञानाच्या पूर्णतेला व उपासनेच्या निष्कुशलतेला केव्हांही फलप्राप्ति होण्याचा संभव नाहीं. वैदिक मानस-शास्त्राचा असा नियम आहे कीं, ज्याचें ध्यान आपण करितो त्याचें स्वरूप आपल्यास प्राप्त झाल्याविना त्या वस्तूचें पूर्ण ध्यान करितां येणार नाहीं. किंवा तिचें ज्ञानही पूर्ण होणार नाहीं. ज्ञानाला काय, भक्तीला काय, एकत्व हवें। तन्मयत्व पाहिजे. तादात्म्य-स्थितीचा अवतार अवश्य आहे. म्हणून रामानुजाचार्यांचा सिद्धांत किंवा

-वल्लभाचार्यांचा सिद्धांत हे तत्त्वज्ञान शोधण्यास निघालेल्या व लागलेला शोध नक्की करण्यास सिद्ध असलेल्या उपनिषदांस कसे सहन होतील ? तत्त्वज्ञानाला एक, शुद्ध आणि केवल ऐक्य हवें असतें. परिणाम वादात केवल ऐक्याचा लाभ होत नाही. यद्यपि हे दोन्ही आचार्य परब्रह्म एक आहे असें म्हणतात; तथापि तें परब्रह्म एकरस स्वरूपाचें आहे असें त्यास म्हणतां येणार नाहीं. उदाहरणार्थ सर्व विश्वभर परब्रह्म पसरलें आहे. येथें दुसरें काहीं सजातीय नाहीं व विजातीय नाहीं, असें हे आचार्य म्हणतील, पण स्वगत भेद नाहीं असें यास म्हणतां येणार नाहीं. साराश, यांच्या ब्रह्म-स्वरूपात एक-रसता नाही. भिन्न-रसता आहे असें होतें; पण तत्त्वज्ञानाला ही भिन्न-रसता खपत नाहीं. त्याला सजातीय काय विजातीय काय किंवा स्वगत काय ? या सर्व भेदांचा तीव्र तिटकारा आहे. सामान्यतः आपण मानवी दृष्टीनें विचार करीत असलों, म्हणजे आपल्यास विचार करणारा व विचार्य-वस्तु ही द्वयी अवश्य असावी लागते. विचार्य-वस्तूशी विचार-कर्त्याचा जो विचार-संबंध त्यालाच विचार असें म्हणतात. हा नित्य संबंध आहे, म्हणून तर मानवी विचाराला द्वैत अवश्य आहे. तत्त्वज्ञानाची मात्र तशी गोष्ट नाही. तेथें केवल-ऐक्याचेंच वास्तव्य असावें लागतें. ऐक्य होणें, ऐक्य-ज्ञान होणें ही तत्त्वज्ञानाची परमावधि आहे. या परमावधीच्या कसाला रामानुज व वल्लभ यांचे सिद्धांत लागत नाहीत असें मला वाटतें व जे वाटतें ते भीत भीत म्हणावें लागतें.

आता निर्माणवाद व परिणामवाद हे दोन्हीही परब्रह्मांचें पूर्ण ऐक्य स्थापित करू शकत नाहीत. म्हणून विवर्त वादाची उत्पत्ति झाली आहे. विवर्त म्हणजे भ्रांति. वस्तूचें अन्यथास्वरूप दिसणें याला विवर्त म्हणतात. विश्व दिसणें हा एकंदर परमेश्वराच्या अधिष्ठानावर एक भ्रांतिमूलक विवर्त आहे. याची उत्पत्ति कशी ? हा विवर्त जीवास जी ज्ञानसाधनें प्राप्त झाली आहेत व ज्यांनी उपलब्ध होतात, त्यांच्या संयोगानें उत्पन्न होतो. आपल्यास व्यवहारात जें वस्तुज्ञान होतें, तें आपल्यास आपलीं ज्ञानेंद्रियें, मन व बुद्धि जसें वस्तूचें स्वरूप सांगतील तसें ज्ञान होतें. आपल्यास वस्तूचें पारमार्थिक ज्ञान होत नाही. तर इंद्रियांनीं सांगितलेल्या बातमीचें ज्ञान होतें. पण इंद्रियें दाखवितात तशी वस्तु असत नाही व असणें शक्यही नाहीं वाटेल्या नळातून येणारें पाणी वाटोळें झालेलें आपल्यास दिसतें किंवा चौकोनी पन्हा-ळ्यांतून आलेलें पाणी चौकोनी दिसतें. म्हणून पाणी वाटोळें आहे किंवा चौकोनी आहे, असें जसें आपल्यास म्हणतां येत नाही, त्याप्रमाणें वस्तूचें मूळ स्वरूप इंद्रियांच्या साह्या-य्यानें यथार्थ कळणें संभवनीय नाहीं. फार तर इंद्रियास वस्तूचे गुणधर्म दिसतात, तसे तीं सांगतील, पण गुणांच्या पलीकडे गुणांचें अधिष्ठान असणारा कोणी आहे किंवा नाहीं, हें ज्ञानेंद्रियांस किंवा मनोबुद्धीस सांगतां यावयाचें नाहीं. येणेंप्रमाणें वस्तूचें यथार्थ-ज्ञान होत नाहीं, गुणधर्मांच्या पलीकडे काय आहे तें समजत नाहीं, असें झालें. असें असतांही आपण वस्तूच्या अयथार्थ ज्ञानालाच ' यथार्थ ज्ञान ' म्हणतों ! हीच भ्रांति

होय. शांकरमतानें विश्व आणि जीव हे भ्रांतीनें उत्पन्न झालेले पदार्थ आहेत वस्तुतः एकच ब्रह्म आहे. त्याला गुणधर्म कांही नाहीत. तें ब्रह्म एकरस आणि घनदाट आहे. हा वैदिक धर्म-सिद्धांत जर स्थापन व्हावयाचा असेल, वेद प्रमाण मानावयाचे असतील तत्त्वज्ञानाची पराकाष्ठा व्हावयाची असेल, तर विवर्त मानल्यासेरीज गत्यंतरच नाहीं. ब्रह्म एक आहे, एकरस आहे, तें घनदाट आहे, इत्यादि वाक्यें सुद्धां व्यावहारिकच होत. एकत्व किंवा एकरसत्व किंवा घनत्व हे निरनिराळे गुण नसून सर्व शब्द एकाच स्वरूपाचे वाचक आहेत. एकत्व म्हणजे एकरसत्व, एकरसत्व याचाच अर्थ दृढघनत्व आणि हे सर्व शब्द ब्रह्माचे अपरपर्याय आहेत. हें ज्याला संमत असेल त्याला सांगावयास नकोच कीं, ब्रह्म हें निर्गुण आहे गुण म्हणजे भेदक वस्तु. ह्या वस्तु एकरस ब्रह्मांत कोठून सांपडणार? जीव अथवा जीवांतील चैतन्य-शक्ति अथवा जीवाचें ज्ञानरूप, हें ब्रह्म होय. शक्तीचा विवर्त आहे. जगताचाही प्रकार तोच. सारांश वास्तविक रीतीनें जीव नाहीं किंवा जगत् नाहीं. एक ब्रह्म मात्र आहे. असा ईश, कठ, केन आणि मुंड या चार उपनिषदांच्या सांगण्याचा आशय आहे, हें या ग्रंथाच्या अल्प परिचयानें मला वाटतें ज्यांनी ज्यांनी म्हणून तत्त्वज्ञानासंबंधानें विचार केला आहे, ते ते पुरुष पाश्चात्य असोत वा पौरस्त्य असोत, ख्रिस्ती असोत वा महमदी असोत, आर्य असोत किंवा अनार्य असोत, ते वैदिक असोत किंवा अवैदिक असोत, हे पारमार्थिक विचारी पुरुष तत्त्वज्ञानाच्या साम्राज्यांत एकछत्राशिवाय बाकीच्या सर्व वस्तूंवर बहिष्कार घालतील. ग्रीक ह्लेटो, प्लोटिनस, स्पायनोझा, अज्ञेयवादी स्पेन्सर किंवा हक्स्ले, मुसलमानी सुफी इत्यादि प्राचीन किंवा अर्वाचीन कोणीही तत्त्वजिज्ञासु घ्या, तो ऐक्याचा, निःशब्द ऐक्याचा, निष्कलंक ऐक्याचा भक्त आहे असें तुम्हांस दिसून येईल. तत्त्वज्ञानाला शुद्ध ऐक्य हवें मग तें ऐक्य चिद्रूप असो किंवा अचिद्रूप असो, चिद्रूप आणि अमर्त परमार्थाचें ऐक्य सर्व वैदिक आचार्यांनीं कबूल केलें आहे. तथापि मध्व, वल्लभ, रामानुज, यांचें हें ऐक्य द्वैतात्मक आहे. या ऐक्यांत एकाकडून अनेक गोष्टी येतात कोठें निर्माणशक्ति, कोठें परिणामवाद घेऊन परमेश्वर सृष्टि उत्पन्न करितो (त्याकडे कर्तृत्व येतें, तो सृष्टीमध्यें परिणत होतो, तो विकृत होतो त्याला भोक्तृत्व प्राप्त होतें.) निदान तो जीव-जगतामध्यें परिणत होऊन ही विकृत होत नाहीं, असा कांही तरी पूर्ण ऐक्यस्वरूपामध्यें नसलेला, कर्तृत्वाचा, भोक्तृत्वाचा-निदान कालस्थलाचा-तरी अंतर्भाव करावा लागतो. विवर्तवादांत (मायावादांत) ही अडचण उरत नाहीं जीव आणि जगत् ही भ्रांतिगत आहेत असें श्रुतींच्या, युक्तीच्या व अनुभवाच्या मार्गांनीं दाखविलें म्हणजे विवर्तवादाचें समर्थन झालें.

याप्रमाणें शुद्ध व्यवहारांत अंतर्भूत असलेल्या धार्मिक वृत्तीवर श्रद्धा ठेवणाऱ्या निर्माण वादाची (आरंभ वादाची), शास्त्रीय पद्धतीनें शोध लावून परमतत्त्व शोधून काढणाऱ्या परिणामवादाचा व व्यवहारांत परिणामवाद सत्य मानून परमार्थ दृष्टीनें मात्र तो वाद अथवा निर्माणवाद हे दोन्हीही विवर्त आहेत असें ठरविणाऱ्या मायावादाची

हकीकत आहे. तात्त्विक ज्ञानाची अशी हाव असते की, असें एक ज्ञानशास्त्र आपल्या हस्तगत व्हावें कीं, ज्याच्या योगानें विश्वाचा, अनाद्यनंत कालस्थलांतील सर्व चराचरांचा, उलगडा करून आपल्यास सर्वज्ञत्व देईल. सारांश एक वस्तु समजली असतां सर्व समजावें अशी तात्त्विक ज्ञानाची मनीषा आहे हें वैदिक तत्त्वज्ञाचें म्हणणें आहे. सर्व ज्ञानाचा (पर आणि अपर विद्याचा) अंतर्भाव करणारें जें ज्ञान त्याला मात्र तत्त्वज्ञान म्हणावयाचें, असें तत्त्वज्ञानाचें लक्षण आहे. अलीकडे पाश्चात्य देशांत तत्त्वज्ञानाचीं जीं काय अनेक लक्षणें झालीं, त्या सर्वांत प्रो० सिज्विक् साहेबानीं केलेलें लक्षण वैदिक-लक्षणाजवळ जवळ येतें, हें सांगण्यास मला अभिमानपूर्वक आनंद वाटतो. ज्याला मृत्यु नाहीं, जें अक्षर आहे, अविकारी आहे, जें सर्वाधिष्ठान आहे, तें खरें तत्त्व होय. तेंच सत्य वस्तु आहे, तीं स्वतंत्र वस्तु होय, असें कठ, केन आणि प्रश्न या उपनिषदांवरून स्पष्ट होतें. तेथें अंतर्बाह्य भेद नाहीं, ती वस्तु अक्षर आणि अविनाशी असते, हें सर्वमान्य आहे. यावरून अंतर्बाह्य भेदशून्य अशी सद्वस्तु, अक्षर, अविनाशी, आणि सर्वाधिष्ठान असते, हेंच सहज सिद्ध होतें. यापासून एकच सिद्धांत निष्पन्न होतो तो हा की, सर्व वैदिक आणि अवैदिक तत्त्वज्ञान्यांस ज्या एका सर्वगामी, सर्वाधार आणि स्वतंत्र अशा वस्तूची सारांश, ब्रह्मवस्तूची स्थापना व्हावयास पाहिजे आहे ती वस्तु म्हणजे तें ब्रह्म एकरस असावयास पाहिजे या ब्रह्माची ओळख झाली असतां व साक्षात्कार झाला असतां सर्व वस्तु विदित झाल्याचें आणि 'त्या सर्व वस्तु आपण झाल्याचें' श्रेय प्राप्त होतें हें ब्रह्म, पारमार्थिक तत्त्व, यौगिक किंवा लौकिक इंद्रियांस अगोचर आहे. या सिद्धांताचें मंडन येथें आणि कठ उपनिषदांत अनेक प्रकारांनीं झालें आहे. तेव्हां ब्रह्मवस्तु अमूर्त असली पाहिजे. इतकेंच नव्हे तर ती मनःकृत संकल्प-विकल्पाच्या पलीकडे आणि बुद्धिगत कल्पनेच्या पलीकडे असली पाहिजे. म्हणजे ती केवल स्वरूपाची (Absolute) असली पाहिजे असें ठरतें यामार्गानें केवल, सत्य, अक्षर, अविनाशी, अविकारी, एकरस, असें जें गृहीत करावें लागणारें तत्त्व तें ब्रह्म होय येथपर्यंतचे माझे विचार मान्य होतील तर एक आणि अद्वितीय स्वरूपाचें केवल ब्रह्म मात्र वेदांस व उपनिषदांस अभिमत होतें, हें ठरेल. आणि हें ब्रह्म समजून घेण (कठिणच आहे म्हणा, पण त्याचा शुद्ध चित्ताच्या स्थितींत अनुभव होणें असें म्हणणें बरोबर होईल ) इष्ट असेल तर, आपली समजूत यथार्थ व्हावी आणि आपल्या व्यक्तिविषयक व सामाजिक ज्ञानाचा आणि व्यक्तिगत आणि समाजगत कर्मांचा सर्वकालीन उलगडा व्हावा, हें मत आदरणीय वाटेल तर, आपल्यास मायावादाचा स्वीकार केलाच पाहिजे वस्तुतः मायावादाचा स्वीकार करा, असें म्हणण्याचें कारणच नाहीं कारण आपलें सर्व ज्ञान मायिक असतें इंद्रियांनीं सांगितलेलें, इंद्रियद्वारा झालेलें हें ज्ञान असतें इंद्रियांची ठेवण व सामर्थ्य असेल त्याप्रमाणें ताऱ्यापासून तो मर्त्यापर्यंत सर्व इंद्रियें आपल्यास अनंत पदार्थांचा वृत्तांत कळवितील; परंतु तो वृत्तांत यथाभूत असेल, वास्तविक असेल असें

म्हणण्यास कांहीं कारण नाहीं, वास्तविक नसेल असें म्हणण्यास मात्र पुष्कळ कारणें आहेत. तात्पर्य इंद्रियद्वारा झालेलें सर्व ज्ञान व्यवहारांत मात्र खरें, पण परमार्थांत मिथ्या किंवा असत् असतें. आपल्यास होणारें सर्व ज्ञान जर मिथ्या आहे, ज्ञानाच्या उत्पत्ती संबंधानें ज्यानीं शास्त्रपूर्वक शोध अनेक वर्षें तपश्चर्या करून केले, त्या पाश्चिमात्य तत्त्वज्ञांसही जर व्यवहारज्ञानांत अवास्तविकत्व दिसतें, वेदांतास ज्ञान-ज्ञेय-ज्ञाता आभासिक आहेत, हे जर मान्य आहे, आपल्यास जर अनुभव तसा येतो, तर ज्ञान आभासिक आहे, मिथ्या हें मायिक आहे असें परमार्थाचा विचार करणाऱ्या पुरुषांनीं म्हणण्यास काय हरकत आहे? नव्हे त्यांनी तसें म्हटलेंच पाहिजे. त्याशिवाय गत्यंतर नाहीं. म्हणून मला वाटतें कीं, आरंभवाद हा विचाराच्या प्रथम भूमिकेंत आदरणीय आहे. याच्या आश्रयानें प्रथम चालून पुढें पुष्कळ थोडीशी चाउलगाडा स्वतंत्रतेनें करणारा परिणामवाद हाही आदरणीय आहे. भक्तीला ( आपलें जें इष्ट आहे त्याच्याकडे आपल्यास नेणाऱ्या पूज्य बुद्धीला ) पुष्टि देणारा, कर्मांना सौष्ठव देणारा, नीतीचें मंडन करणारा आणि इष्ट वस्तूच्या अन्वयाच जवळ जाण्यास साधनीभूत होणारा परिणामवाद अत्यंत इष्ट आहे. या दोन्ही वादांमध्यें कर्मांची आणि भक्तीची पराकाष्ठा होण्याचा संभव आहे. व्यवहारामध्यें सत्कर्म आणि सदुपासना यांचें सर्वगामित्व असणें हें सर्वथा इष्ट आहे. यापेक्षाही पुढें जाण्याची ज्या जीवाची तयारी असते, त्या जीवाकरितां विवर्तवादाची स्थापना आहे. येथें बुद्धीपासून तों शरीरापर्यंतचीं सर्व ज्ञानसाधनें व कर्ममार्गें आणि स्वर्गलोकापासून तों नरकलोकापर्यंतच्या यच्चयावत् ज्ञेय आणि भोग्य वस्तु परिच्छिन्न अथवा मर्यादित असल्यामुळें त्या अपरिच्छिन्न अथवा केवल स्वराज्याच्या ( केवल अस्तित्व, केवलज्ञान आणि केवल आनंद यांच्या ) कक्षेत येतच नाहीत. म्हणून कर्तव्यकर्मांचा, नीतीचा, भक्तीचा किंवा ज्ञानाचा प्रश्न येथें उत्पन्न होत नाहीं. 'एक आणि अद्वितीय मात्र तत्त्व आहे' आणि तें सर्व व्यवहाराचें अधिष्ठान आहे, इतकेंच वस्तुस्थितीचें ज्ञान असतें. पहा कीं, दोन समांतर रेषा दोन्ही बाजूंनी कितीही वाढविल्या असतां एकमेकांशीं संगत होत नाहीत असें सांगणारें व्यावहारिक भूमितिशास्त्र अनंताच्या स्वराज्यांत नेलें म्हणजे तेंच शास्त्र सर्व समांतर रेषा एकत्र मिळतात, असें सांगतें! अत्यंत स्वच्छ प्रकाशाचे दोन स्थिर किरण एकत्र मिळाले असतां गर्द अंधकार उत्पन्न होतो, हा जर आपल्यास अनुभव आहे तर अनंताच्या साम्राज्यांत सांत वस्तूंस ( कर्मांस किंवा उत्पन्न होणाऱ्या ज्ञानास ) अवकाश मिळत नाहीं, हें समजण्यास अडचण कां पडावी बरें? असो, अनंत महांत सांतज्ञान नाहीं. जीव स्वरूपतः अनंत आहे. त्याला व्यवहारांत सांत ज्ञान उत्पन्न होतें, तें मायिक अथवा व्यावहारिक असतें. त्याची कर्म करण्याची वासना आणि कर्मांपासून उत्पन्न होणारें फल हीं सर्व मायिक असतात, हेंच म्हणणें योग्य आहे. असा तात्पर्यार्थ निघतो. या दृष्टीनें ज्ञानकांडांतील उपनिषदांचा विचार केला असतां हीं अपौरुषेय उपनिषदें एक

पारमार्थिक सत्याचा म्हणजे केवल ब्रह्माचा अनुवाद करून व्यवहार मिथ्या म्हणजे मायिक म्हणजे सादि, सान्त व अनिर्वचनीय आहे असें ठरवितात.

या विवेचनावरून असें स्पष्ट होईल कीं, विवर्तवादाचा आश्रय केल्याशिवाय उपनिषद् वचनांची संगति लागत नाहीं; आपल्या मनाचें समाधान होत नाहीं; विश्वाची व्यवस्था समजत नाहीं; आणि परमार्थांत कोणत्या सिद्धान्ताचें चिंतन करावें, व्यवहारांत काय समजून घ्यावें; आणि कसें वागावें; याचा उलगडा होत नाहीं. माझी सर्व निराग्रही व सत्यान्वेषी मोक्षार्थी जिज्ञासूंस अशी विनंति आहे कीं, त्यांनीं वादविषयक चार उपनिषदांचा योग्य रीतीनें विचार करावा, आणि तदनुसार आपापला निश्चय ठरवावा. येथें दुसरा तिसरा कोणताही प्रश्न नसून स्वतःचें व इतरांचें कल्याण घडवून आणण्याचा प्रश्न आहे. आपल्यास प्राप्त झालेला जीव ही कांहीं थट्टेची गोष्ट नव्हे, कीं तिचा आपण आपल्या लहरीनुसार विनियोग करूं. तेव्हां कोणता वाद खरा आहे, या भानगडींत न पडतां आपल्या ज्ञानक्रमानुसार कोणती विचार-प्रणालिका प्राप्त आहे, हें आपलें आपण सद्गुरूच्या साहाय्यानें ठरवावें. आपलें 'ज्ञात' ज्ञान नित्य वृद्धिंगत होत जाईल, अशी तपश्चर्या आणि आपली आत्मिक योग्यता वाढेल, असा आपला योगाभ्यास नित्य ठेवावा. म्हणजे आपल्यास प्रारंभ वादाची किंवा परिणाम वादाची किंवा विवर्तवादाची स्थानिक योग्यता कळूं लागून आपला पुरुषार्थ साध्य होईल आणि मनाचें पूर्ण समाधान होईल.

या मनःसमाधानाच्या स्थापनेंबद्दल अनेक पाश्चात्य विद्वानांनीं, धर्मभक्तांनीं आणि वेदांत मीमांसकांनीं पौरस्त्य आर्य लोकांच्या वेदवेदांतासंबंधानें एक विलक्षण कल्पना करून ठेविली आहे. हे लोक एकसारखें आम्हांस असें सांगतात कीं तुम्ही हिंदुलोक दुःखवादी ( Pessimists ) आहां. हें त्यांचें म्हणणें एका दृष्टीनें खरें ही आहे. हा संसार दुःखमय आहे. हें विश्व, स्थानिक वस्तु, तेथील समाज, सर्व मिथ्या आहेत, धर्म, कर्म, नीति, भक्ति, इत्यादि सर्व साधनें तुच्छ कामाचीं आहेत, असें आमचे साधु, सद्गुरु वेदान्ताचे उपदेशक, म्हणत असतात, तें कांहीं खोटें नाहीं; पण अद्वैत दृष्टीनें अनंताच्या भावनेनें, हा उपदेश होत असतो, हें या लोकांच्या किंवा आमच्या लोकांतील आधुनिक पण अवैदिक सुधारकांच्या लक्षांत येत नाहीं. दुःख-वादाचाच प्रश्न घेतला तर कोणती नीति किंवा जगांतील कोणता धर्म असा आहे कीं, ज्याचा उपदेश हें सर्व जगत् आहे तसेंच चांगलें आहे अशा प्रकारचा आहे! मला तर असें वाटतें कीं, सर्व नीतिशास्त्रांची, सर्व धर्मपंथांची आणि सर्व वेदान्तमीमांसांची एकच कहाणी आहे. हें जगत् दिसतें तसें नाहीं, क्षणभंगुर सुखाचा त्याग करून चिरकालिक सुख मिळेल, असें कर्म करा; सुखसर्वस्व येथें नाहीं, अन्यत्र आहे, परमेश्वर हा मात्र एक ज्ञानाचा आणि सुखाचा सागर आहे, [illegible] श्रेयाचें कल्याण होणें नाहीं; असाच उपदेश सर्व पंथांतून [illegible] होत आहे.

फार काय सांगावें ? आपली बुद्धि, आपलें मन ही शुद्ध स्वरूपाची नसून घातकारक आहेत, त्यांना संस्कृत करून शुद्ध केलें पाहिजे, हें प्रत्येक पौरस्त्य अथवा पाश्चात्य नीतिग्रंथाचें सार आहे तात्पर्य आपलें ज्ञान व आपल्या वासना पूर्ण व शुद्ध नसताल तर हे विश्व दुःखमय आहे, असेंच प्रत्येक उपदेशाचें यथार्थ सारसर्वस्व आहे आहे ती बुद्धि ठेवा आणि दिसतात तशा विश्वविषयाचा उपभोग घ्या, असें कोणीहि हितकारी ग्रंथकार आपल्यास सांगत नाहीं तेव्हां पौरस्त्य वेदांतज्ञान केवळ दुःखवादी आहे, अशा व्यर्थ हाकाटी करण्यांत काय तात्पर्य आहे ? परमार्थाचा विचार करू लागलें असतां हें जगत असावें तसें नाहीं, आपणहि असावें तसे नाहीं, असें सांगण्याचा इतर धर्मांचा किंवा इतर वेदांतग्रंथांचा संप्रदाय आहे त्याप्रमाणेंच आमच्या वेदवेदांताचा नित्यक्रम आहे परमार्थदृष्टीनें आपण सर्वजण दुःखवादी असतों येथें काळे-गोरे पौरस्त्य पाश्चात्य, असा भेदाभेद नाहीं आणखी, हें विश्व जसें असावें तसें असतें, किंवा जीव जितका शुद्ध असावा तितका असता, तर नीतिग्रंथ, धर्मशास्त्र, कर्ममीमांसा, भक्तिसूत्र इत्यादि उत्पन्न होण्याचें कारणच नव्हतें पण त्या अर्थी या ग्रंथांचें अस्तित्व, सर्व काळीं व सर्व देशीं दृग्गोचर होतें, त्या अर्थी एका दृष्टीनें हें विश्व दुःखमय आहे असा सर्वकालीन समज असतो, हें अनुमानानें सिद्ध होतें मात्र परमार्थदृष्टीनें, सर्व सुखमय असावें अशा दृष्टीनें आपण विचार करीत आहों हें पर्यें गहाळ कल आहे आत्यंतिक कल्याण कोठें तरी दुसरीकडे आहे अशा मनाची भावना येथील दुःख पाहून होत असते ही समजूत सार्वत्रिक आहे मला सांगावयाचें इतकेंच आहे की, दुःखवादाचा मक्ता केवळ भरतवर्षांतील लोकांनीच घेतला आहे असें नाहीं परमेश्वराच्या कृपाळुत्वानें या दुःखाचा वाटा सर्वत्र सारसार वाटलेला आहे

आतां एवढें मात्र खरें कीं कागच्या सपाट्यांत आमचे व्यावहारिक ग्रंथ म्हणजे आमचीं व्यावहारिक शास्त्रें परंपरेशीं लुप्त झालीं, पण आमच्या पारमार्थिक ग्रंथांपैकीं कांहीं ग्रंथ मात्र जिवंत राहिले आहेत म्हणून आम्ही किंवा इतरांनी आमच्या सारस्वताचें आलोडन केलें असतां आम्ही केवळ दुःखवादीच आहोंत, असें सरकुर्शनीं कोणासही वाटण्याचा संभव आहे पण ही समजूत यथार्थ नव्हे आहे व्यवहारदृष्टीनें पाहिलें असतां हिंदु शास्त्र दुःखवादी नाहींत, हें वैद्यशास्त्र, ज्योतिष, व्याकरण, अलंकार, धनुर्वेद, अश्वशास्त्र, स्थापत्य, इत्यादि अनेक शास्त्रें आणि अनेक कला यांच्या उद्घाटनावरून सहज सिद्ध होईल आतां एक गोष्ट मात्र विसरतां कामा नये ती ही पौरस्त्य देशांत कित्येक कारणांमुळें ह्या लोकाच्या सुखापेक्षां परलोकाचें सुख विशेष आदरणीय आहे, अशी दृढ समजूत होऊन ऐहिक सुखाविषयीं इकडचे लोक उदासीन झाले, ऐहिक शास्त्रकलांची प्रगति स्तब्ध झाली, मानवी महत्त्व आणि मानवी पौरुष याची किंमत वाजवीपेक्षां जास्त कमी होऊन पूर्वसंचितावर, प्रारब्धावर किंवा देवावर इतका हवाला आम्ही ठेवूं लागलों का, त्यायोगें इकडील मनुष्याच्या स्वयंभू कमाला हरताळ लागली, ही गोष्ट ठीक झाली नाहीं परमार्थापेक्षां व्यवहार कमी दर्जाचा आहे हें खरें,

पण व्यवहार अगदींच स्तब्ध केला किंवा झाला तर भगवान् म्हणतात त्याप्रमाणें ' शरीर यात्राही पूर्ण व्हावयाची नाहीं, ! ' मग मोक्षयात्रेची कथा कशाला बोलावी ! व्यवहाराकडे सर्वथा गुंतणें हें ठीक नव्हे; पण व्यवहार अगदीं नाहींसा करणें हेंही ठीक नाहीं. जीवाला पूर्ण-स्वातंत्र्य असो वा नसो; हा तात्त्विक प्रश्न अमळशा एका बाजूला ठेवला, तरी एक गोष्ट अगदीं उघड दिसते कीं मनुष्यजीवापुढें परस्परविरोधी दोन कर्तव्यें प्राप्त झालीं असतां त्यापैकीं कोणतें कर्तव्य अंगीकृत करावयाचें, याचें स्वातंत्र्य जीवास असतें, निदान तें आहे अशी त्याची समजूत तरी असते; तेव्हां या वस्तुस्थितीचा किंवा समजुतीचा फायदा घेऊन आपण आपलीं व्यावहारिक शास्त्रें पुनः सस्कृत करून त्यांस इतर नवीन शास्त्रांच्या मतानें पुष्ट केलें पाहिजे. मात्र ही पुष्टि विश्वकल्याणाच्या, मोक्षाच्या, तात्त्विक परमार्थाच्या आड येणार नाहीं, नव्हे ती परमार्थाच्या मार्गाला पुष्ट करील, अशीच असली पाहिजे. भलत्या समजुतीनें सांसारिक व्यवहाराकडे आपल्या येथील लोकांचें लक्ष कमी गेल्यामुळें आपल्या संसाराचा तर नाश झालाच आहे आणि परमार्थही फारसा विशेष वृद्धिंगत झाला नाहीं. परमार्थाच्या नांवावर स्वार्थ मात्र विशेष फैलावून जाऊन जिकडे तिकडे वैराग्याच्या फुकट गोष्टी, भजनाचा सुकाळ, गुरूंची समृद्धि, इत्यादि गोष्टि सर्वत्र दिसतात. असो, परमार्थास पुष्ट करणारा व्यवहार प्रायः नष्ट झाला म्हणून ' तेल गेलें, तूप गेलें आणि धुपाटणें हा गेलें. ' या म्हणीप्रमाणें आमचा व्यवहार नष्ट झाला; परमार्थ साधला नाहीं; आणि या रीतीनें हिंदुस्थानविषयी नुकसान मात्र झालें। असो, गत गोष्टीस उपाय नाहीं. आतां तरी आपण सावध होऊन समाजाची, सामाजिक संस्थांची, व्यक्तीस आणि समाजास योग्य नियम संस्कृत करतील, अशा शास्त्रकारांची देण्यारस्था, मोडून त्याच्या अभिवृद्धीनें परमार्थाचा अधिकार प्राप्त होण्याला विशेष भर पडेल अशी आपल्या विवेकी, आपल्या कार्याची आणि आपल्या संस्कृतीची शिक्षा पाहिजे. हा सर्व पसारा केवळ मायिक आहे, आपला यांत कांहीं एक संबंध नाहीं असें म्हणून व्यवहारांत चालावयाचें नाहीं संबंध नाहीं असें म्हटल्यानें संबंध तुटत नाहीं. तो आपल्या ज्ञानानें व आपल्या उन्नतिकारक कर्मानीं आपण अधिकारानुसार तोडित गेलें पाहिजे

असो, हा विस्तार करण्याचें कारण श्रुतीस सर्वथा प्रिय असणाऱ्या अद्वैत सिद्धांताच्या विरुद्ध पश्चिमेकडील विद्वानांनीं आणि पूर्वेकडील आधुनिकांनी उद्भूत केलेला उत्साह-भंजक उपहास हें होय. आजपर्यंत अज्ञानानें, दुराग्रहानें अद्वैत सिद्धांताची विलक्षण विटंबना झाली आहे; इचा कांहींतरी झनीकरण व्हावा, एतदर्थ प्रयत्न करणें हें प्रत्येक नैष्ठिकाचें कर्तव्य आहे. पारमार्थिक सत्तेचे नियम सार्वत्रिक आहेत, हें खरें, पण ते सिद्धांत समजून घेण्याची योग्यता, व्यावहारिक सत्ता समजून घेऊन व बुद्धि-पूर्वक आचरणांत आणून, व्यवहारांत आणिली पाहिजे. म्हणजे नीति आणि उपासना यांची आवश्यकता व मोक्षकालीन जितक्या उत्कटतेनें इतर सिद्धांतवादी प्रचार करितात तितक्या किंबहुना त्यापेक्षा जास्त उत्कटतेनें व तळमळीनें प्रचारकार्य व त्यांचे सारे

अनुयायी नीतिवैराग्यादि साधनांची आवश्यकता प्रकट करितात, हें समजून घ्यावें. तेव्हां अद्वैत–वेदान्त हा नीतीच्या किंवा उपासनेच्या विरुद्ध आहे, असें कोणासही प्रमाणशः म्हणतां यावयाचें नाही. आतां जीवाचें स्वरूप काय? आणि ब्रह्माचें स्वरूप काय, या विषयी सर्व पंथांमध्यें प्रचंड वादकदन सिद्ध होऊन राहिलें आहे. जीव हा ज्ञानस्वरूप आहे हें सर्वांस संमत आहे. पण अनेकवादी हे जीवाला अणुस्वरूपी परिच्छिन्न आणि अज्ञानी असें समजतात, परंतु काल, स्थल, परिमाण, कार्यकारण इत्यादि सर्व उपाधी आहेत, आणि त्या जडात्मक आहेत; असें जर एकदां कबूल झालें तर जीवस्वरूपाच्या संबधानं वाद उत्पन्न होण्याचें कारणच राहणार नाहीं. रामानुज जीवाला ज्ञानरूप मानतात, पण त्याचें स्वरूप अणुपरिमाण आहे, जीव परिच्छिन्न आहे, असें ते समजतात. आतां कालस्थलादिकांस जर उपाधि असें समजावयाचें तर जीवाच्या ज्ञानस्वरूपाला ही उपाधि कशी जाऊन चिकटणार? आपण स्वतः आपल्या स्वरूपाचा विचार केला असतां व शरीर, प्राण, इंद्रियें, मन, बुद्धि, श्रद्धा, अहंकार इत्यादि जड उपाधींचा व कालस्थल इत्यादि मानसिक उपाधींचा त्याग केल्यावर बाकी जें जीवस्वरूप राहतें, त्याला अणुपरिमाणाची म्हणजे स्थलाचा उपाधि कशी लाविता येईल? व्यवहारकालीं जीव अल्पज्ञ आहे, हें म्हणणें नीट आहे. कारण तो यावेळीं जड उपाधींनीं परिच्छिन्न झालेला असतो. पण या सर्व उपाधींचा लय झाला, कठ व प्रश्न उपनिषदांत सांगल्या-प्रमाणें सर्व जडाचा परमात्म्यामध्यें विलय केला म्हणजे अणुपरिमाणत्व अथवा अल्पज्ञत्व अथवा अज्ञानीपणा ही अवरोध राहत नाहीत, न राहणें शक्य नाही; असें मला वाटतें. श्रुतींचा उपदेशही असाच आहे. हें केन, कठ आणि प्रश्न हीं उपनिषदें वर वर चाळून पाहिलीं असतांही समजून येण्यासारखें आहे. ईशावास्यांत "ज्याच्या मध्यें सर्व भूतें सामावलीं आणि सर्व भूतांमध्यें जो सामावून राहिला" इत्यादि गूढ रहस्य सांगणारे मन्त्र जीवाचें अथवा आत्म्याचें निरुपाधिकत्व सिद्ध करितात, योग्यांचा अनुभव पाहिला असतांही हीच गोष्ट सिद्ध होते. तेव्हां श्रुतीनें, युक्तीनें व अनुभवानें जीवाच्या निरुपाधिकत्वाची वस्तुस्थिति जर सिद्ध होत आहे, तर व्यवहारकालीं जीव अल्पज्ञ दिसतो म्हणून तो सर्वदा अल्पज्ञ असतो, असें म्हणण्याला व्यवहारांशिवाय दुसरें कोणतें प्रमाण आहे? बरें, व्यवहारांतीलच अनुभव जर सत्य मानावयाचा तर विश्वांतील बहुतेक सर्व जीव संसारग्रस्त आहेत म्हणून उत्पत्तीच्या आधी व मुक्तस्थितीनंतर ते संसारांतच राहतील, त्यांनी संसारांतच असलें पाहिजे, त्यांचा संसार सुटणें शक्य नाहीं, असें कां म्हणू नये? तात्पर्य, आधिभौतिक दृष्टीनें विचार करावयाचा झाला म्हणजे सर्व जड आणि मनःकल्पित वस्तू यांचा त्याग करून केवळ शुद्ध जीवस्वरूपाचा, निरुपाधिक जीवाचा विचार केला पाहिजे. हा विचार केला असतां एक ज्ञानरूप ब्रह्म मात्र सत्य आहे, जीव आणि ब्रह्म ह्यांत भेद नाही. असें सिद्ध होईल. असो. हा वाद जगाच्या आरंभापासून आतांपर्यंत कमीजास्त तीव्रतेनें सगळा गेला आहे आणि जोंवर कालपर्यंत बुद्धिवैचित्र्य जिवंत आहे, तावत्कालपर्यंत हा वाद तसाच जिवंत राहील. मला आतां

इतकेंच सांगावयाचें आहे कीं, ज्या कारणासाठीं अद्वैतवेदान्त घातकारी आहे असें सांगितलें जातें, तीं कारणें शुद्ध भ्रमात्मक आहेत. नीतीचा, उपासनेचा किंवा कोणत्याही श्रेष्ठ ध्येयाचा विनाश अद्वैत सिद्धांत करीत नाहीं इतकेंच नव्हे तर अद्वैत-सिद्धांताचें शुद्ध स्वरूप योग्य रीतीनें समजेल तर विहित कर्म, नीति, अथवा उपासना यांच्या आचरणास अनेकपट जोर येऊन आपल्या या सर्व बाजूंनीं पंगु झालेल्या अनाथ राष्ट्रांत सत्कर्म, सदाचार आणि सद्-उपासना यांचें साम्राज्य होऊन सुखवाद (Optimism) वाढेल व अद्वैतसिद्धांताला मूर्त स्वरूप प्राप्त होईल. आणि या सिद्धांताचें मूर्तिमंत अस्तित्व राजा रामचंद्रासारखे, राजा जनकासारखे, पितामह भीष्मासारखे वसिष्ठ, याज्ञवल्क्य इत्यादि ऋषींसारखे, विदुरासारखे ज्ञाते व कर्ते सदाचारी पुरुष आणि मैत्रेयीसारख्या, सावित्रीसारख्या, सदाचारी साध्वी उत्पन्न होऊन आपल्या या राष्ट्रास पंक्ति-पावन करतील। असो; याप्रमाणें मला या चार उपनिषदांसंबंधानें जे कांहीं सामान्य विचार सुचले, ते मी यथामति निर्दिष्ट केले आहेत. यापुढें प्रत्येक आचार्यांनं आपला सिद्धांत सिद्ध करण्यासाठीं उपनिषन्मंत्रांच्या अर्थांची कांहीं ओढाताण केली आहे की काय। या विषयाकडे वळावयाचें, परंतु सध्यां स्थलावकाश नसल्यामुळें व सर्व उपनिषदांचें समालोचन झाल्यानंतर या विषयाचा विचार करणें ठीक होईल, असें मला वाटत असल्यामुळें या विषयाचा मी येथें विचार करीत नाहीं. आतांपर्यंत जो अनुभव आला आहे, त्यावरून मात्र मला असें दिसतें कीं उपनिषत्काली प्रत्यक आत्मस्थितीला योग्य (–जीवाची उन्नति होत असतां त्याला अनेक भूमिकांतून जावें लागतें. प्रत्येक भूमिकेला विशेष कर्मांची आणि विशेष ज्ञानसंपादनाची योग्यता नियमित असते. या योग्यतेला मी आत्मस्थिति असें म्हटलें आहे–) असा उपदेश आहे. त्याप्रमाणें प्रत्येक आत्मस्थितीचें चित्रही प्रसंगोपात्त रेखाटलेलें आहे. मुक्तस्थितींत आत्म्याचें स्वरूप काय असतें याचें वर्णन करण्याचा श्रुतीचा कटाक्ष आहे. हें मुक्तस्थितीतील स्वरूपवर्णन मात्र केवळ अद्वैतपर आहे. येथें शंकराचार्यांनीं बिलकुल ओढाताण केलेली नाहीं, असेंही मला वाटतें.[1]

असो, विस्तार विशेष झाला, पण तो विषयस्पष्टतेसाठीं अत्यंत अवश्य होता अशी मनाची समजूत करून घेऊन मी आतां लिहिणें येथें पुरें करितों.

ता. ५, सप्टेंबर १९१२
भाद्रपद वद्य ११, १८३४
७८२ सदाशिव पेठ, पुणें,

चिंतामण गंगाधर भानु.

# शब्दांचें सूचीपत्र.

## प्रथमः प्रश्नः

## द्वितीयः प्रश्नः

तृतीयः प्रश्नः

चतुर्थः प्रश्नः

## प्रश्न सहावा.